


आंतरभारती : पुष्प पहिले

# गुजराती-मराठी शब्दकोश

संपादक

श्री. स. ज. धर्माधिकारी







पहिली आवृत्ती : मार्च १९६७

**किंमत पंधरा रुपये**

प्रकाशक :
अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृति मंडळ
सचिवालय, मुंबई ३२

मुद्रक :
वि. पु. भागवत
मौज प्रिंटिंग ब्यूरो, खटाववाडी, मुंबई ४

# निवेदन

भारत हे बहुभाषी राष्ट्र आहे. कमीत कमी १६ ते २२, कमीजास्त प्रमाणात लेखनिविष्ट व लोकांच्या दैनंदिन व्यवहारात वापरल्या जाणाऱ्या भाषा भारतात आहेत. भारतीय १४ भाषा भारताच्या संविधानातील अनुसूचीत मान्य केलेल्या आहेत. हिंदी, उर्दू, बंगाली, पंजाबी, काश्मिरी, सिंधी, आसामी, उडिया, गुजराती, मराठी, तेलगू, कानडी, तामीळ व मल्याळम् या तर संघराज्यमान्य भाषा आहेतच. त्याशिवाय भोजपुरी, मैथिली, राजस्थानी, कोंकणी, तुळू, नेपाळी इत्यादी भारतीय भाषाही लेखनिविष्ट भाषा म्हणून समजल्या जातात. शिवाय उपभाषा किंवा बोलीभाषा म्हणून परिगणन केल्यास त्यांची संख्या २०० ते २५० च्या दरम्यान उपलब्ध होते.

भारताची राष्ट्रीय एकात्मता ही पश्चिमी देशांतील एकराष्ट्र व एकभाषा अशा समीकरणाची नाही. अपवादात्मक स्वित्झर्लंड, कॅनडा इत्यादी छोटी राष्ट्रे सोडल्यास बाकीच्या पश्चिमी राष्ट्रांची एकात्मता ही भाषिक एकात्मतेशी समांतर आहे. उदयाला आलेल्या व वाढीस लागलेल्या वा महनीय परिणतपदास पोहोचलेल्या जगातील राष्ट्रांत भारत हेच एक राष्ट्र एकात्मक असून त्याच्यातील प्रत्येक एकभाषिक प्रदेश युरोपातील मोठ्या प्रगत राष्ट्रांएवढा आहे. येथे वैविध्यपूर्ण, वैचित्र्यपूर्ण व साहित्यसंपन्न अशा १२ तरी भाषा आहेत.

या सर्व भारतीय भाषांच्या व साहित्याच्या देवघेवीची प्रक्रिया व सांस्कृतिक व वैचारिक विनिमयाची प्रक्रिया संस्कृत भाषेच्या द्वारे व धर्मांच्या द्वारेच आजपर्यंत झाली आहे. इंग्रजी राज्य झाल्यानंतरच्या काळात पश्चिमी संस्कृतीच्या व पश्चिमी ज्ञानाच्या व पश्चिमी आधुनिक शिक्षणाच्या द्वारा विचार व भावना यांचे संवादित्व या भारतीय भाषांमध्ये निर्माण होऊ लागले आहे. स्वातंत्र्याच्या आंदोलनाने व राजकीय एकात्मतेमुळे या भाषांचे वैचारिक संबंध अधिक निकटचे बनले आहेत.

परंतु या भाषांचा भाषिक सीमाप्रदेश सोडल्यास अन्योन्यसंबंध आवश्यक तितका प्रभावी स्वरूपात निर्माण होत नाही. वैचारिक, भावनात्मक व सांस्कृतिक मूल्यांची देवघेव, परंपरागत धर्म व इंग्लिश भाषा यांच्या द्वारेच राखला जात आहे. हिंदी, गुजराती, मराठी, बंगाली, पंजाबी, आसामी, उडिया, नेपाळी, काश्मिरी व उर्दू यांच्यामध्ये, त्या इंडो-आर्यन भाषा असल्यामुळे, बरेच सादृश्य आहे म्हणून त्यात शब्दांची व कल्पनांची देवघेव आपोआप जितकी होते त्यापेक्षा दक्षिणेकडील तेलगू, तामीळ, मल्याळम् व कानडी या द्राविडी भाषा व वर उल्लेखिलेल्या इंडो-आर्यन भाषा यांच्यामध्ये त्या मानाने फारच कमी देवघेव होते. ही परस्पर देवघेव विपुल प्रमाणात होणे आपल्या सांस्कृतिक प्रगतीचा वेग वाढविण्याच्या दृष्टीने आवश्यक आहेच. परंतु त्याहीपेक्षा भारताची राष्ट्रीय एकात्मता दृढ व अभेद्य बनविण्याकरिता अधिक आवश्यक आहे.

याकरिता महत्त्वाचा उपाय म्हणजे प्रादेशिक मातृभाषा बोलणाऱ्या लोकसमूहामध्ये लगतच्या किंवा दूरच्या भारतीय प्रदेशांच्या भाषा उत्तम रीतीने अवगत केलेले, त्यांपैकी एक किंवा अनेक भाषा उत्कृष्ट रीतीने लिहू व बोलू शकणारे आणि त्याचप्रमाणे त्या त्या अन्यप्रदेशीय भाषांतील प्रथितयश लेखांचे, ग्रंथांचे व

ग्रंथकारांचे साहित्य स्वतःच्या प्रादेशिक मातृभाषेत चांगल्या रीतीने, भावार्थ न गमावता, भाषांतरित व रूपांतरित करण्यास समर्थ झालेले सुशिक्षित निर्माण होण्याची मोठी निकड आहे.

ही निकड भागविण्याची पहिली पायरी म्हणून महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृति मंडळाने आंतरभारती योजना आखली आहे. या योजनेप्रमाणे मराठी सुशिक्षित मनुष्यास गुजराती, उर्दू , बंगाली, कानडी, इत्यादी इंडो-आर्यन वा द्राविडी भाषा स्वप्रयत्नाने शिकता याव्यात म्हणून प्रत्येक भाषेचे द्विभाषिक कोश (दोन्ही प्रकारे—म्हणजे गुजराती-मराठी आणि मराठी-गुजराती असे), भाषाप्रवेश आणि वाचनपाठमाला अशी चार पुस्तके प्रकाशित करण्याचे ठरविले आहे. या कार्यक्रमानुसार उर्दू-मराठी शब्दकोशाचे मुद्रण पुरे होत आले आहे व बंगालीभाषाप्रवेशाचे मुद्रण सुरू झाले आहे. कानडी-मराठी शब्दकोश, कानडी भाषाप्रवेश व कानडी वाचनपाठमाला मंडळापाशी मुद्रणप्रतींच्या रूपाने आल्या आहेत. तसेच तामीळ भाषाप्रवेश, मल्याळम्‌भाषाप्रवेश, गुजरातीभाषाप्रवेश इत्यादिकांच्या मुद्रणप्रती तयार झाल्या आहेत.

याच आंतरभारती योजनेपैकी श्री. स. ज. धर्माधिकारी संपादित "**गुजराती-मराठी शब्दकोश**" छापून वाचकांच्या हाती देण्यास आम्हांस समाधान वाटत आहे. अन्य भाषांप्रमाणेच गुजरातीचेही भाषाप्रवेश व वाचनपाठमाला मराठी वाचकांच्या हाती देण्यास लवकर संधी मिळेल अशी कार्यवाही आम्ही करीत आहोत. त्याचप्रमाणे, मौज प्रिंटिंग ब्यूरो, मुंबई यांनी काळजीपूर्वक या कोशाच्या छपाईचे काम करून दिले त्याबद्दल त्यांचे आम्ही ऋणी आहोत.

**लक्ष्मणशास्त्री जोशी**
अध्यक्ष,
महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृति मंडळ

सचिवालय, मार्च १९६७

# प्रस्तावना

सुमारे २८ वर्षांपूर्वी श्री. यशवंत रामचंद्र दाते यांनी श्री. चिं. ग. कर्वे, श्री. आबा चांदोरकर आदी समर्थ सहकाऱ्यांच्या मदतीने "महाराष्ट्र शब्दकोश" हा बहुमोल ग्रंथ ८ विभागांत प्रसिद्ध केला, त्यांतील पहिल्या विभागाच्या प्रस्तावनेत त्यांनी एकूण कोशवाङ्मयाची तावत्कालपावेतोची माहिती देऊन पुढे म्हटले होते की, "अद्यापपर्यंत 'गुजराती-मराठी' अगर 'मराठी-गुजराती' शब्दकोश तयार करण्याकडे कोणी लक्ष दिलेले आढळत नाही...मुंबईसारख्या शहरात या दोन्ही भाषा परस्परांस शिकण्यास फार सुलभ असल्यामुळे व इंग्रजी या भाषेच्या सामान्य माध्यमामुळे कदाचित असा प्रकार घडला असावा..."

कितीतरी वर्षांपूर्वी श्री. दाते यांनी अशा प्रकारच्या कोशाची अपेक्षा नमूद करून ठेवली होती. तसा कोश मराठीत आता या ग्रंथाच्या रूपाने पहिल्याप्रथमच अस्तित्वात येत आहे हे सांगताना साहजिकच मनाला आनंद वाटतो.

वास्तविक गुजरात आणि कर्णाटक हे दोन भाषिक प्रदेश महाराष्ट्राच्या उशा-पायथ्याशी असल्यासारखे आहेत. स्वातंत्र्यपूर्व काळात तर गुजरात, महाराष्ट्र (म्हणजे पश्चिमेकडील महाराष्ट्राचे १२ जिल्हे) आणि कर्णाटक हे तीन्ही भाषाप्रदेश एका मुंबई इलाख्यातच नांदत होते आणि एका भाषाप्रदेशातील सरकारी नोकर हे दुसऱ्या भाषाप्रदेशात बदलून जाण्या-येण्याची क्रिया नित्य चालू असे. तसेच, व्यापारी, व्यापारी कंपन्या, वकील, डॉक्टर, इंजीनियर या धंदेवाईक मंडळींचीहि ये-जा या ना त्या निमित्ताने सदोदित होत असे. त्यातून एकमेकांचे सामाजिक स्नेहसंबंधही बांधले जात असत; एकमेकांविषयी आपुलकीची व आदराची भावना स्वाभाविकपणेच पोसली जात असे. कचेरीची भाषा जरी इंग्रजी असली तरी आपापसांत ही मंडळी एकमेकांच्या भाषेत एकमेकांशी बोलण्याचा प्रयत्न आवर्जून करीत. स्वातंत्र्योत्तर काळात कानडी भाषेचे चार जिल्हे मुंबई राज्यापासून अलग होऊन म्हैसूर राज्यात सामील झाले. तथापि गुजरात आणि महाराष्ट्र हे काही काळ द्विभाषिक राज्य म्हणून एकाच अमलाखाली नांदले. तेही पुढे भाषावार राज्यरचनेच्या तत्त्वानुसार विभक्त झाले. तथापि आज 'पश्चिम भारत' या नावाने गुजरात व महाराष्ट्र हा एक देशविभाग मानण्यात आला आहे.

"यो वै भूमा तत् सुखम्" असे ऋषीचे वचन आहे. व्यापकता–विशालता ही माणसाच्या आत्म्याला प्राणदायी हवेसारखी आहे. लोकशाहीत राज्यकारभार स्वाभाविकपणेच लोकभाषेत चालणार–चालला पाहिजे. म्हणून इंग्रजी अमलाच्या काळात त्यांच्या गरजेप्रमाणे भाषेच्या दृष्टीने अस्ताव्यस्तपणे पडलेल्या प्रांतांची भाषावार पुनर्रचना स्वातंत्र्योत्तर काळात होणे अपरिहार्यच होते. तसे भाषावार प्रांत म्हणजे राज्ये आज बनली आहेत. ही बनताना राजकीय व इतर अनेक कारणांनी खळखळ झाली त्यामुळे शेजारीशेजारी असणाऱ्या भिन्नभिन्नभाषिकांतील संबंध तंग झाले, त्यातून एकमेकांविषयी मनोमालिन्यही काहीसे निर्माण झाले. परंतु एकदा भाषिक राज्ये बनण्याची प्रक्रिया पूर्ण झाल्यानंतर हा आलेला दुरावा दूर झाला पाहिजे आणि शेजाऱ्याशेजाऱ्यात आता पूर्वीपेक्षाही एकमेकांच्या निकट येण्याची ओढ निर्माण झाली पाहिजे. ही प्रक्रियासुद्धा स्वाभाविक अशीच आहे. या प्रक्रियेला मदत म्हणून एकमेकांनी एकमेकांच्या भाषेचा, साहित्याचा, कलांचा परिचय व आस्वाद घेऊ लागले पाहिजे, रसग्रहण केले पाहिजे.

आजच्या महाराष्ट्र राज्यात मराठी बोलणाऱ्यांची संख्या ३ कोटींच्या वर आहे. त्याखेरीज म्हैसूर, गुजरात, मध्यप्रदेश, आंध्र अशा शेजारच्या राज्यांत वस्ती करून राहिलेल्या मराठीभाषिकांची संख्याही काही लाखांपर्यंत मोजता येण्यासारखी आहे. म्हैसूरमधील बेळगाव व कारवार या दोन जिल्ह्यांत तर मराठी-

भाषिकांची बहुसंख्या असल्याचा दावा आहे. अगदी अलिकडच्या खानेसुमारीअनुसार म्हैसूर राज्यात मराठी बोलणाऱ्यांची संख्या १० लक्ष ५६ हजार आहे, मध्यप्रदेशात ८ लक्ष ६० हजार आहे आणि गुजरातेत ६ लक्ष १६ हजार आहे. महाराष्ट्रातल्या मराठीभाषी लोकसंख्येशी गुजरातमधल्या मराठीभाषी लोकसंख्येचा अनुपात साधारणतः ३३२ : ५ असा पडतो. याउलट गुजरात राज्यातील गुजरातीभाषिकांची संख्या २ कोटी ३० लक्ष आहे व महाराष्ट्रातील गुजरातीभाषिकांची संख्या १० लक्ष ७० हजार आहे. म्हणजे हा अनुपात २३ : १ असा पडतो. याचा अर्थ मराठीभाषिकांची गुजरातेत जेवढी वस्ती आहे त्याहून गुजरातीभाषिकांची महाराष्ट्रात वस्ती कितीतरी जास्त प्रमाणात आहे असा आहे. आणि ते साहजिक आहे. गुजराती लोक हे प्रामुख्याने व्यापारी पेशाचे आहेत आणि त्या निमित्ताने जगभर सर्वत्र फिरण्याची व वस्ती करण्याची त्यांची वृत्ती आहे. अर्थात शेजारच्या प्रदेशात ते अधिक संख्येने येऊन राहतात यात नवल नाही. मुंबई शहर हे प्रामुख्याने मराठी-गुजराती-भाषिकांचेच आहे. पारशी समाज हा गुजरातीभाषी समाज आहे. यामुळे एक परिणाम असा घडला आहे की मराठी माणसाला गुजराती माणूस म्हणजे व्यापारी–'शेटजी'–अशाच स्वरूपात परिचित आहे. याच्या मानसिक प्रतिक्रिया मराठी माणसाच्या अंतःकरणात तशाच स्वरूपाच्या होतात. पण गुजराती शेजाऱ्याची ही ओळख अगदीच अपुरी आहे आणि म्हणून त्याला अन्याय करणारी आहे. महाराष्ट्राची जशी एक विशिष्ट विलोभनीय संस्कृती आहे, त्याला एक अभिमानास्पद इतिहास आहे, त्याची एक राहणीकरणीची 'शान' आहे, तशीच सौराष्ट्रसहित गुर्जरदेशाची एक विशिष्ट आदरणीय संस्कृती आहे, त्याचाही एक प्रतिष्ठापूर्ण इतिहास आहे, त्याचीही एक राहणीची शोभनीयता आहे, ती महाराष्ट्राने समजून घेणे अवश्य आहे. तसे प्रयत्नसुद्धा झाले पाहिजेत. 'आंतरभारती'सारखी लोकसंस्था आणि महाराष्ट्र राज्याचे 'साहित्य आणि संस्कृति मंडळ' या दिशेने करीत असलेली कामगिरी फार मोलाची आहे, यात शंका नाही.

गुजराती लोक हे केवळ व्यापारी वृत्तीचेच नाहीत, तें केवळ दुकानदार, कारखानदार किंवा 'शराफ'च नाहीत तर त्यांच्यात उत्कृष्ट 'साक्षर' (साहित्यकार) आहेत, कलाकार आहेत, राजकारणी मुत्सद्दी आहेत, शिक्षणशास्त्रज्ञ आहेत, उच्च प्रतीचे संशोधक आहेत. गुजराती साहित्याला गांधीयुगापासूनच ओप चढत गेला आहे ही गोष्ट खरी असली तरी, नाटक आणि संगीत या कलांत गुजरात अजून बराच मागसलेला असला तरी, गुजराती साहित्यकारांनी जगाच्या वाङ्मयात आपला झेंडा फडकविला आहे हेही लक्षात घेतले पाहिजे. जुन्या गुजराती साहित्यात जुन्या मराठी साहित्याप्रमाणेच काही उत्कृष्ट संतवाङ्मय आहे. आजची गुजराती भाषा मराठीप्रमाणेच नव्या युगाच्या आकांक्षा, ध्येये व कर्तृत्व झेलण्याची, पेलण्याची आणि उमटविण्याची शक्ती धारण करण्याचा प्रयास करीत आहे, आणि मराठी साहित्यिकांनी आणि वाङ्मयप्रेमी लोकांनी आपल्या या भाषाभगिनीला त्या कामी आपलेपणाने साहाय्य करण्याची वृत्ती आणि शक्ती ठेवली पाहिजे. गुजरातीला आणखी 'कालेलकर' जर मिळाले तर त्यांना 'गरवी गुजरात' 'आवकार'च देईल अशी मला खात्री वाटते.

गुजरातीच्या मराठी वाचकाला–अभ्यासकाला–काही मर्यादेपर्यंत या कामी मदत व्हावी म्हणून हा 'गुजराती-मराठी शब्दकोश' बनविण्याला मी प्रवृत्त झालो आहे. माझी शक्ती अल्प आहे, त्यामुळे माझा आवांकाही मी अल्पच ठेवला आहे. ४२ वर्षांपूर्वी जेव्हां माझा पहिल्याप्रथम गुजराती भाषेशी खुद्द गुजरातच्या (त्यावेळच्या अनभीषिक्त) राजधानीत (अहमदाबादमध्ये) संबंध आला त्यावेळी मला ती अपरिचित अशी वाटली नाही, काही थोड्या दिवसांच्या काळातच मी ती आत्मसात करू शकलो. याचे कारण गुजराती ही मराठीशी पुष्कळ प्रमाणात मिळतीजुळती आहे. एकतर, मराठीतल्याप्रमाणेच गुजरातीत संस्कृत शब्दांचा जवळजवळ ३०–३५ टक्क्यांइतका भरणा आहे, त्याचप्रमाणे मराठीत आहे त्याच राजकीय व कोर्टकचेऱ्यांशी संबंधित असलेल्या अरबी-फारशी शब्दांचाही तिच्यात भरणा आहे. पोर्तुगीज आणि इंग्रजी शब्द हे सुद्धा दोन्ही भाषांत समान आहेत. राहता राहिले जवळजवळ निम्मे तद्भव व 'देश्य' शब्द. गुजराती ही 'शौरसेनी' प्राकृत भाषेतून बनलेली आहे, तर मराठी ही 'महाराष्ट्री' या प्राकृत भाषेच्या शाखेची आहे. त्यामुळे तद्भव शब्द बनवण्याची त्या दोहोंची हातोटी वेगवेगळी आहे. या

दोहींत येणारे 'देश्य' शब्दही क्षेत्रविभागानुसार वेगवेगळे आहेत. परंतु व्याकरण या दोहोंचे सारखेच आहे. वाक्यरचनेची पद्धतही एकच आहे. लिंगे तितकीच आहेत आणि बऱ्याच शब्दांच्या बाबतीत लिंगाची समानताही आहे. विभक्ति-प्रत्यय मात्र भिन्न आहेत, आणि कारकांत काहीसा फरक आहे.

गुजरातीचा एक विशेष चटकन लक्षात येतो तो म्हणजे गुजराती पुल्लिंगी नामे बहुशः 'ओ'कारान्त असतात व बनवितानाहि 'ओ'कारान्त बनवितात, आणि नपुसकलिंगी नामे 'उं'कारान्त असतात व तशीच बनवितात. उदाहरणार्थ, मराठी 'ताबा' हा पुल्लिंगी शब्द गुजरातीत 'ताबो' म्हटला जातो आणि मराठीतील 'नाके' हा नपुंसकलिंगी शब्द गुजरातीत 'नाकुं' म्हटला जातो.

उदाहरणादाखल वर दिलेले दोन्ही शब्द मराठीत व गुजरातीत समान अर्थाचे म्हणून दिले. पण गुजराती व मराठी शब्दांच्या बाबतीतली आणखी एक गंमत आहे. मराठीच शब्द गुजरातीत तसाच किंवा किंचित फरकाने असलेला तुम्हांला आढळला तरी त्याचा अर्थ समान असेलच असे नाही. मराठीतला 'पटका' तुम्ही गुजरातीत घ्यायला गेलात तर छोटासा 'फडका'च तुमच्या हाती येईल; मराठीतली 'हालहवाल' गुजरातीत बोललात तर 'दुर्दशा' होईल; मराठीतली 'अक्का' गुजरातीत 'अबोला' धरील, 'अडसर' 'आडे' बनेल आणि 'अभाव' 'अरुचि' होईल.

कणकीत आपण जे तेल घालतो त्याला आपण 'मोहन' म्हणतो. मुळात तो शब्द 'मोवण' किंवा 'मोण' असा आहे व तो 'मोवुं' या धातूवरून बनलेला मूळ गुजराती शब्द आहे. 'मोवुं' म्हणजे मऊ करणे किंवा तेलकट करणे ('मऊ' या शब्दाचे सुद्धा 'मोवुं'शी साधर्म्य नाही का?); 'मोवण' म्हणजे तेल-पदार्थ. एखाद्या खरेदीचा आपण जो तात्पुरता लेखी करार करतो त्याला मराठीत 'साटेखत' म्हणतात. हा मूळ 'साटाखत' असा गुजराती शब्द आहे. 'साटुं' म्हणजे बोली-करार; 'साटवुं' म्हणजे बोली करणे. असे कितीतरी शब्द गुजरातीतून मराठीत अपभ्रष्ट होऊन तर काही अर्थांतर होऊन आलेले आपल्याला आढळतात.

अशा रीतीने गुजराती भाषेचे मराठी भाषेशी फार साधर्म्य आणि सहकार्य आहे. त्यामुळे गुजराती शिकणे मराठी माणसाला कठीण जात नाही. इतकेच काय, पण मराठी माणसे ही गुजराती भाषा जास्त लवकर आपलीशी करू शकतात असा अनुभवच आहे.

हा 'गुजराती-मराठी शब्दकोश' सर्वच्या सर्व गुजराती शब्द घेऊन बनविलेला नाही. शाळा-कॉलेजे व सर्वसामान्य वाचकवर्ग यांना उपयोगी पडावा अशा स्वरूपाचा हा कोश आहे. गुजराती शब्दसंख्या एकूण ६० हजारांच्या आसपास आहे. पण यात अजमासे १७–१८ हजारच शब्द घेतले गेले आहेत व वर त्या शब्दांना धरून असलेले वाक्यप्रयोग घेतले आहेत; मिळून जवळजवळ २६००० शब्द-वाक्प्रयोगांचा हा कोश झाला आहे. या कोशाची घडण पुढील गोष्टी लक्षात ठेवून करण्यात आली आहे :

१. मांडणी करताना (१) मूळ गुजराती शब्द, (२) त्याचे गुजराती वर्णलेखन, (३) त्याचे व्याकरण, आणि (४) अर्थ, अशी केली आहे. लिपी नागरीच सर्वत्र वापरली आहे.

   वर्णलेखन करताना 'गुजराती जोडणी कोशा'ने घालून दिलेले नियमच पाळले आहेत; कारण तेच आज गुजरातीचे सर्वमान्य नियम आहेत.

२. शब्दसंख्या मर्यादित ठेवण्याची असल्यामुळे काही प्रकारचे शब्द वगळले आहेत ते पुढीलप्रमाणे :

   (अ) समानार्थी संस्कृत तत्सम शब्द. उदा०, 'गर्व', 'नैमित्तिक', 'प्रकाश', 'महिला' इ.

   (आ) समानार्थी अरबी, फारसी, इंग्रजी व पोर्तुगीज या विदेशी भाषांतील शब्द. उदा०, 'कलगी', 'बारदान', 'टॉर्च', 'अल्मारी' इ.

   (इ) समानार्थी समान शब्द. उदा० 'कापाकापी', 'निलाजरा' (गु. 'निलाजरो') 'गांठ', 'कलकलाट', 'ठसणे' (गु. 'ठसवुं') इ.

   (ई) 'अकबर', 'गीता', 'राम' अशा प्रकारची विशेषनामे. मात्र समास होऊन बनलेल्या शब्दांत उपर्युक्त वर्ज्य शब्द आलेला असला आणि समासामुळे अर्थ भिन्न होत असला तर तो शब्द घेतला आहे. उदा० 'अकबरदिली', 'रामकहाणी', 'रामायण' इ.

(उ) काठियावाडी, कच्छी, चरोतरी असे विशिष्टविभागीय शब्द.

(ऊ) पारिभाषिक म्हणजे काव्य, विज्ञान, गणित, तर्कशास्त्र, इ. शास्त्रीय परिभाषांचे शब्द. ते संस्कृतोद्भव असतात, व निरनिराळ्या भाषांत ते निरनिराळ्या रीतीने बनविले जातात.

(ए) संख्यावाचक शब्द.

पण ते स्वतंत्रपणे एकत्र शेवटी परिशिष्टात दिले आहेत.

३. गुजरातीत व मराठीत रूपाने समान पण अर्थाने भिन्न असे असलेले शब्द घेतले आहेत. उदा० 'अजोळ', 'अकस्मात', 'सांथ', 'लाकडी', इ.

४. प्रत्येक शब्दाचे जेवढे अर्थ व्यवहारात रूढ आहेत तेवढे देण्याचा प्रयत्न केला आहे. गुजराती शब्दाला शक्य तो मराठी प्रतिशब्द त्या अर्थाचा देण्याचा प्रयत्न केला आहे. पण जेथे तसा योग्य शब्द मिळाला नाही तेथे अर्थ स्पष्ट होण्याकरिता खुलासा केला आहे.

५. ज्या शब्दापासून किंवा शब्दाला धरून वाक्प्रयोग रूढ झाला असेल त्या शब्दाच्या खालीच तो वाक्प्रयोग देऊन त्याचा मराठीत अर्थ दिला आहे. शक्य तेथे मराठीतील तत्सम वाक्प्रचार देण्याचा प्रयत्न केला आहे.

अशी ही थोडक्यात या कोशाची घडण आहे.

हा कोश तयार केला तो 'नवजीवन प्रकाशन मंदिर' अहमदाबाद, या संस्थेने प्रकाशित केलेला उत्कृष्ट कोश 'सार्थ गुजराती जोडणी कोश' पुढे ठेवूनच. त्यामुळे शब्दांच्या व वाक्प्रचारांच्या अर्थाच्या बाबतीत जी शास्त्रशुद्धता व 'चोकसाई' (नेमकेपणा) असावी लागते ती आपोआप पाळली गेली आहे. असा एखाद्या कोशाचा आधार घेतल्यावाचून द्विभाषिक कोश बनविणे फारच कठीण आहे. या कोशाप्रमाणेच श्री. लल्लुभाई गोकळदास पटेल यांच्या 'शालोपयोगी गुजराती शब्दकोशा'चीही मी मदत घेतली आहे. या सहायकांचा मी अतिशय ऋणी आहे.

फार दिवस मनात असलेले हे कोशाचे काम प्रत्यक्षात आणणे 'महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृति मंडळ'च्या मदतीने शक्य झाले याबद्दल त्या मंडळाचाही मी अतिशय आभारी आहे. पुढचा 'मराठी-गुजराती शब्दकोश' प्रसिद्ध करण्यालाही मंडळ हातभार लावील याची मला खात्री आहे.

आणखी एका सन्मित्राचा उल्लेख मला या ठिकाणी कृतज्ञतापूर्वक केला पाहिजे. ते म्हणजे 'कांति मुद्रणालय, पुणे'चे मालक श्री. कांतीभाई परीख हे होत. त्यांनी जी कोणती पुस्तके मी मागितली त्यांतील मिळतील ती आणून देण्याची खटपट करून मला उपलब्ध करून दिली. त्यांच्या स्नेहाबद्दल त्यांचे काय आभार मानावेत!

या कोशाचा वापर करताना ज्या उणिवा, जे दोष, ज्या चुका अभ्यासूंना आढळतील त्या जर त्यांनी खालील पत्त्यावर मला कळविण्याची कृपा केली तर पुढे त्यांचा विचार होऊन सुधारणा होण्यास मदत होणार आहे. म्हणून अभ्यासूंनी तसे करण्याची तसदी घ्यावी अशी मी विनंती करतो व आढळलेल्या चुकांबद्दल, पहिलाच प्रयत्न म्हणून, क्षमा याचितो.

'निवारा', ६०।१३ भारती निवास
सहकारी वसाहत, एरंडवन, पुणे ४

विनीत
**भाऊ धर्माधिकारी**

# कोश वापरण्याबाबत सूचना

१ मराठी व गुजराती वर्णमाला सारखीच आहे. स्वरमालिकेतील 'अं' हा स्वर मालिकेच्या अनुक्रमानुसार कित्येक कोशांत 'औ'च्या नंतर स्वतंत्रपणे घेऊन 'अं'ने आरंभ होणारे शब्द एकत्र दिले गेले आहेत. आम्ही संस्कृत-इंग्रजी कोशाचे कर्ते प्रो. वामन शिवराम आपटे यांचा दाखला घेऊन 'अं' हे अनुनासिक मानले आहे व 'क' वर्गापासून 'प' वर्गापर्यंत प्रत्येक वर्गाच्या शेवटी जी अनुनासिके (ङ्, ञ्, ण्, न्, म्) येतात तो अनुक्रम धरून त्या त्या वर्गाच्या अनुनासिकाचे शब्द त्या वर्गात दिले आहेत. उदाहरणार्थ, 'अङ्ग' (अंग) हा शब्द 'अ घ'च्या मालिकेतच शेवटी घातला आहे.

२ 'क्ष्' आणि 'ज्ञ्' ही गुजरातीत स्वतंत्र व्यंजने मानलेली नसून जोडाक्षरे मानली आहेत. म्हणून आम्ही 'क्ष' ने आरंभ होणारे शब्द 'क' गटात व 'ज्ञ'ने आरंभ होणारे 'ज' गटात दिले आहेत.

३ मराठीत विशेषणवाचक शब्द स्वतंत्रपणे सामान्यतः पुल्लिंगात उच्चारण्याचा प्रघात आहे; उदा०, 'चांगला'; गुजरातीत तो नपुंसकलिंगात उच्चारतात; उदा० 'सारुं'. या कोशात मराठीच्या व गुजरातीच्या या वैशिष्ट्यांचा भंग केलेला नाही. गुजराती विशेषणवाचक शब्द देतांना गुजरातीच्या प्रथेप्रमाणे तो नपुंसकलिंगातच दिला आहे आणि त्याचा मराठी प्रतिशब्द बहुधा नपुंसकलिंगात पण कोठे कोठे पुल्लिंगातही दिला आहे. खास स्त्रीलिंगी विशेषणे स्त्रीलिंगी प्रतिशब्द देऊनच मराठीत दिली आहेत. उदा० 'अनुभवियण' = अनुभवी (स्त्री); 'अलवाई' = एक दोन महिन्यांचे वत्स असलेली (गाय किंवा म्हैस).

४ व्युत्पत्ती म्हणजे शब्दाचा मूळ उगम. दिलेला शब्द मूळ कोणत्या भाषेचा ते सांगण्याकरिता त्या भाषेचा फक्त नामोल्लेख तिचे प्रथमाक्षर चौकोनी कंसात घालून केला आहे. या रीतीने संस्कृत, प्राकृत, अरबी, फारसी, हिंदी, इंग्रजी, पोर्तुगीज, तुर्की या भाषांचे उल्लेख केले आहेत.

५ प्रत्येक शब्दापुढे त्याचे व्याकरण दिले आहे; म्हणजे तो शब्द नाम असेल तर फक्त त्याच्या लिंगाचा, म्हणजे (पु.), (स्त्री.), किंवा (न.) असा, सर्वनाम असेल तर (सर्व.) असा, विशेषणाचा (वि.) क्रियापद असेल तर (स. क्रि.) असा, म्हणजे सकर्मक क्रियापद किंवा ('अ. क्रि.') म्हणजे अकर्मक क्रियापद असा, आणि तो शब्द अव्यय स्वरूपाचा म्हणजे क्रियाविशेषण, उभयान्वयी इ. अव्ययवाचक असेल तर (अ.) असा संकेताने उल्लेख केला आहे.

६ काही शब्द नाम म्हणून वापरले जातात, काही नाम व विशेषण म्हणून आणि काही नाम, विशेषण व अव्यय स्वरूपात असे वापरले जातात. प्रत्येक अर्थ देण्याकरिता त्याच्या अर्थाच्या प्रारंभी संकेताने तसातसा उल्लेख केला आहे. उदा० 'ठेलवुं' = (१) (स. क्रि.) ठोकर मारणे (२) (न.) लाथ.

७ काही शब्दांचे वाच्यार्थ एक व लक्ष्यार्थ भिन्न असतात. तो लक्ष्यार्थ (लाक्ष.) असा संकेत करून पुढे दिला आहे. उदा० 'छींडुं' = (१) कुंपणाला ठेवलेले भोक (२) (लाक्ष.) पळवाट

८ वाक्प्रचार ज्या शब्दावरून बनला आहे त्या शब्दाच्याच खाली आडवी रेघ (डॅश '–') घालून तो व त्याचा अर्थ दिला आहे. त्या डॅशचा अर्थ 'वरील शब्द जसाच्या तसा घेणे' असा करावयाचा आहे; उदाहरणार्थ,

**घांटो** (पु.) – साद, कंठ

**–काढवो** – तारस्वराने बोलणे.

जेथे वरच्या शब्दात विकृती झाली असेल तेथे विकृत वर्णच तेवढा डॅशच्या पुढे देऊन वाक्प्रचार जोडला आहे; उदा०

**तडाको** (पु.) – गप्प, थाप.

**–की दास** (पु.)–गप्पिष्ट, थापेबाज.

# शुद्धिपत्र

[खालीलप्रमाणे अशुद्ध शुद्ध करून घेऊन मगच कोशाचा उपयोग करावा—ग्रंथकर्ता]

| पृष्ठ | स्तंभ | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|---|
| २ | २ | ३ | અકે–કે–કકું | અકે–કકે–કું |
| | | १० | (પણુ) | (પણું) |
| | | ३५ | अक्कलक (–ग–रो) | अकल्क (–ग) रो |
| ३ | २ | २ | –फुड | –फुडं |
| ४ | १ | १७ | अगडबगडं | अगडंबगडं |
| | २ | १ | (१) न जाण्यासारखा | (१) न जाणण्यासारखा |
| ५ | १ | २७ | अग्नि मुकवो | अग्नि मूकवो |
| ६ | १ | ६ | अति भयायक | अति भयानक |
| ७ | १ | ३० | अंगूठा | अंगूठो |
| | २ | ३६ | अचव्यु | अचव्युं |
| ८ | २ | २८ | घसणे | घासणे |
| ९ | १ | ३ | स्वरात | स्वरान्त |
| | | ६ | झाकळलेला | झाकलेला |
| १० | २ | १६ | (२) साप्ताहिक पत्र | (२) (न.) साप्ताहिक पत्र |
| | | १९ | आठवावु | अठवावुं |
| ११ | १ | ११ | अडकावबु | अडकावबुं |
| १२ | २ | ३७ | अडयुं | अडयुं |
| | | ३९ | अडयुंखडयुं | अडयुं खडयुं |
| ३१ | १ | ३३ | आवाळु | अवाळु |
| ३३ | २ | १६ | अळवीतळे | अळावातळे |
| ५९ | २ | ३३ | (५) काठी | (५) काठीं–काठावर |
| ६७ | २ | १८ | ऊधुं | ऊंधुं |
| ६८ | १ | ३१ | ઉભટ | ઊભટ |
| ८७ | १ | २१ | (स. क्रि.) | (अ. क्रि.) |
| | २ | ३६ | कणोनुं | कणोतुं |
| ८८ | १ | २ | (न.) काटेरी | (१) काटेरी |
| ९० | २ | ३३ | ढोल | ढोली |
| ९४ | २ | १५ | अंकुर | अंकुश |
| ११२ | १ | ९ | કાવો | કાવું |
| ११४ | २ | ३१ | [म] | [अ.] |
| ११९ | २ | २९ | केढ | केड |
| १२६ | १ | ६ | ख(–ड)खडाडवुं | ख(–ड)खडाववुं |
| | १ | ११ | ( ) | (४) |
| | २ | २ | (ખંખ–ગ–ળવવું) | ખંખ–ગ–ળાવવું |
| १२७ | २ | ९ | ખટમસી | ખટમાસી |
| | २ | २९ | (ખટાશ) | (ખટાશ) (स्त्री.) |
| १२८ | १ | १६ | छिद्रदोप | छिद्र, -दोप |
| | १ | ३२ | त्याचा वेळ | त्यांचा वेळ |
| | २ | ८ | वाह्राण | (वाह्राण) |
| | २ | २९ | ખડં | (ખડું) |
| १२९ | १ | ८ | ખણખાજ | ખણખોજ |
| | १ | १९ | द्वेपभावनेने करणे | द्वेपभावनेने भरणे |
| १३३ | १ | २७ | [म.] | [अ.] |
| | २ | २९ | –खळां | खळां |
| | २ | ३० | –खळुं | खळुं |
| १३४ | १ | ६ | ખક-ખ | ખાક-ખ |
| | १ | ८ | ખકસાર | ખાકસાર |
| | १ | १८ | ખખસૂસ | ખાખસૂસ |
| | १ | ३४ | (पुं. स. व.) | (पुं. ब. व.) |
| १३४ | २ | ९ | (ખજું) | (ખાજું) |
| १३५ | १ | ३ | खडुंबडु | खडुंबडुं |
| | १ | २८ | (ખટીમીઠી) | (ખાટીમીઠી) |
| | | २९ | (ખાટુ) | (ખાટું) |
| | २ | ५ | जाजरुं | जाजरू |
| | २ | ६ | (ખડાળું) | (ખાડાળું) |
| | २ | १९ | (ખ ળું) | (ખાળું) |
| | २ | ३६ | मनाचा उच्चार | मनाचा उच्चाट |
| १३६ | १ | ११ | (ખાંડું) | (ખાંડુ) |
| १३८ | १ | ३ | (ખમણો) | (ખામણો) |
| | १ | ४ | (ખમી) | (ખામી) |
| | १ | ३४ | (ખર) | (ખાર) |
| | १ | ३८ | (ખરપાટ) | (ખારપાટ) |
| | २ | ३ | (ખરસ્તી) | (ખારસ્તી) |
| | २ | ७ | (ખરું) | (ખારું) |
| १४० | १ | ६ | (ખિલવું) | (ખિલાવું) |
| | १ | ३१ | –खींटीए...होवुं | खींटीए...होवुं |
| | १ | ३३ | –खींटीए मूकवुं | खींटिए मूकवुं |
| | २ | १० | –ठाकवी | –ठोकवी |
| | २ | ३१ | –खीसामां | खीसामां |
| | २ | ३३ | –खीसा तर करवा | खीसा तर करना |
| | २ | ३४ | –खीसा खाली | खीसा खाली |
| | २ | ३७ | (ખુટમણ) | (ખુટામણ) |

| पृष्ठ | स्तंभ | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|---|
| १४२ | १ | ३६ | (ખૂચાવવું) | (ખૂંચાવવું) |
| | २ | २२ | (ખૂટડું) | (ખૂંટડું) |
| १४३ | २ | ३३ | –ढीलो थवो | –ढीलो थवो |
| १४४ | २ | ३ | (ખેરીયો) | (ખેરીયો) |
| १४५ | १ | २५ | (३) बेर | (३) (न.) बेर |
| | २ | ७ | (ખોટબોલું) | (ખોટાબોલું) |
| १४८ | २ | ३ | गजरूं | गजरुं |
| १५० | २ | २१ | (ગધ્ધા ભરણી) | (ગધ્ધાભરતી) |
| | २ | २६ | (ગધેયું) | (ગધ્ધેયું) |
| १५१ | २ | १५ | (ગભ–ભરુ) | (ગભ–ભ–રુ) |
| १५५ | २ | २४ | (२) न सुधर | (२) न सुधरणे |
| १५६ | १ | ३९ | (गाढ-डुं) | गाढ–डुं |
| १५७ | १ | ३३ | (गांधिवडुं) | गांधीवडुं |
| | १ | ३७ | –मारवी, –मारवुं | –मारवी, –चुं मारवुं |
| १५८ | २ | २८ | (ગળિયું) | (ગાળિયું) |
| १६१ | १ | २५ | (ગલિસ્તાન) | (ગુલિસ્તાન) |
| | २ | ३७ | (ગૂંડું) | (ગુંડું) |
| १६२ | १ | ७ | गूणसूं | गूणसुं |
| | १ | १७ | थुं | –थुं |
| १६४ | २ | २२ | गोदनणी | गोदवणी |
| १६५ | १ | १२ | गोवववुं | गोपववुं |
| १७० | २ | २२ | –आगणुं | –आंगणुं |
| १७४ | १ | २५ | र) र | गाळणे |
| | १ | २६ | ('घ) | ('घर |
| १७५ | १ | २१ | (धुसाडववुं) | (धुसाडवुं) |
| १७७ | १ | २१ | (ધોંચાટવું) | (ધોચાટવું) |
| १७७ | २ | १७ | खुटी | खुंटी |
| १७९ | १ | २६ | वर्तुळाकर | वर्तुळाकार |
| १८० | १ | १८ | (ચગોટી) | (ચંગોટી) |
| | १ | २१ | (१) चार चरणे | (१) चरचरणे |
| १८४ | २ | ३३ | चहटालि(–लि)युं | चहटालि(–लि)युं |
| १८५ | २ | १८ | (ચાગાલું–ળું) | (ચાગલું–ળું) |
| १८७ | २ | ३ | –लोकमा | –लोकमां |
| | २ | २७ | –चलाववो, पाडवो, बांधवो | –चलाववो, –पाडवो, –बांधवो |
| | २ | २७ व २८च्या मध्ये | | चाल्वुं (ચાલવું) (अ. क्रि.) — चालणे, (मराठीतील सर्व अर्थी) |
| १८८ | २ | १३ | चळा | चाळ |
| १९१ | २ | ३१ | –पहोंचना | –पहोंचवा |
| १९२ | १ | २६ | चोकठु | चोकठुं |
| १९४ | १ | ९ | चोप(–पा) | चोप(–पा)ट |
| | २ | ५ | (ચોકૂલું) | (ચોફૂલું) |
| | २ | ६ | (ચોકૂલો) | (ચોફૂલો) |
| १९५ | १ | ११ | (છચોટ) | (છચોર) |
| | २ | ५ | छठुं (છઠું) | छठ्ठुं (છઠ્ઠું) |
| १९८ | १ | ११ | –डाघ लागवो, रहेवो | –डाघ लागवो, –रहेवो |
| | १ | १३ | (२) इष्टी 'छातीमां घालवुं' | पहा 'छातीमां घालवुं' |
| २०० | १ | २४ | उभयवचनी रूप आहे, आहेत | उभयवचनी रूप–आहे... |
| २०४ | २ | २३ | अवजरा | अवजार |
| २०५ | २ | २५ | (જલત) | (જસત) |
| २१० | २ | १ | धैर्य. जुलपु | धैर्य शब्द गाळणे |
| | २ | ३३ | (१) पहा 'जु' | पहा 'जुठ्ठुं' |
| २११ | १ | ६ | जूंलहवुं | जूंहलवुं |
| | २ | २१ | –मां उतरवुं | –मां ऊतरवुं |
| | २ | ३० | (व.) | (न.) |
| २१३ | १ | ११ | (-ब) | (-प) |
| | २ | २० | झ(–ण)णी | झ(–ण)झणी |
| २१४ | २ | ३८ | झळझळीयुं | झळझळियुं |
| २१५ | २ | २ | –णी | –कणी |
| | २ | ४ | –वुं | –कवुं |
| | २ | २४ | झपाडुं | झापडुं |
| २१६ | १ | ३५ | (ઝીંધરાં) | (ઝીંથરાં) |
| २१७ | १ | १८ | कटवुं | टकवुं |
| | २ | २ | (ઝો) | (ઝોડ) |
| २२३ | २ | ३९ | (ડૂંશ–રું) | (ડૂંશ–સ) |
| २३१ | २ | ३५ | (ઢૂંઢણ–ણ–સું) | (ઢૂંઢ–ણ–સું) |
| २३२ | १ | २ | (ઢેકાળો) | (ઢેખાળો) |
| | २ | ३० | (તકા–ગ–વી) | (તકા–ગા–વી) |
| २३३ | १ | ३६ | (તડકાવ) | (તડકાવવું) |
| | २ | १२ | (ત–ર–ફડિયાં) | (તડ–ર–ફડિયાં) |
| | २ | २१ | ततकीर | तपकीर |
| २३४ | १ | ४ | तडुश तडुश | तडूश तडूश |
| २३६ | १ | २३ | (તરેફણ) | (તરફણ) |
| २३७ | २ | २४ | आशाळधून | आशाळभूत |
| २३९ | १ | ३५ | [म.] | [अ.] |
| | २ | १ | (दस्त्याला) | (दस्त्यातला) |
| २४१ | १ | ३८ | (તુરા) | (તૂરા) |
| २४१ | २ | १५ | (उदा नववधूला) | (उदा० नववधूला) |
| | २ | १८ | (તેડવવું) | (તેડાવવું) |

| पृष्ठ | स्तंभ | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|---|
| २४२ | १ | १८ | –तेवडुं | –तवंडुं |
| | १ | १९ | (તે વારે–રે) | (તે વાર–રે) |
| | १ | ३४ | (તોજડું) | (તોછડું) |
| २४३ | १ | ४ | बदामनुं | –बदामनुं |
| | २ | २१ | त्रूट | त्रुट |
| २४६ | २ | २४ | दंडे (रो દંડેરો) | दंडरो (દંડેરો) |
| २५१ | १ | १४ | –दाणो | दाणो |
| | १ | २३ | (દાડિયું) | (દાંડિયું) |
| | १ | २७ | –नीचोरीप होवुं | –नी चीरीप होवुं |
| २५४ | २ | १९ | (ઢૂંગો) | (ઢૂંગો) |
| | २ | २७ | दूघ | दूध |
| २५५ | २ | ४ | (દેડકો) | (દેગ) |
| २५६ | २ | १९ | दोढि | दोढी |
| २५८ | १ | २२ | (ધડુકાવું) | (ધડુકાવવું) |
| | १ | २२ | (२) गाजलेसे | (२) गाजेल से |
| | २ | २६ | (ધંધદાર) | (ધંધાદાર) |
| | २ | ३२ | थीं | –थीं |
| २५९ | १ | ३० | धमधमववुं | धमधमवुं |
| | २ | ३९ | –वु | ० वुं |
| २६१ | २ | १ | धारालुं | धाराळुं |
| २६३ | १ | २० | धुंधळ्वुं (ધુંધળવું) | धूंधळवुं (ધૂંધળવું) |
| | १ | २२ | धुंधळावुं (ધુંધળાવું) | धूंधळावुं (ધૂંધળાવું) |
| | १ | २३ | (ધુંધળું) | (ધુંધળું) |
| | १ | २४ | (ધુંધી) | (ધૂંધી) |
| | १ | २५ | (ધુંવાંપૂવાં) | (ધૂંવાપૂંવાં) |
| | १ | २७ | (ધૂપ) | (ધૂપ) |
| | १ | ३६ | (ધુમર–સ) | (ધૂમર–સ) |
| | २ | २६ | मेंगुं करवुं | –मेंगुं करवुं |
| २६४ | २ | १४ | (ધોલાણ) | (ધોવાણ) |
| २६५ | १ | २७ | (નકસ) | (નકર) |
| | १ | ३२ | (નકસ) | (નકલ) |
| | १ | ३३ | (નકલિઓ) | (નકલિયો) |
| २६६ | २ | १० | नंस्वाई | नंखाई |
| २६७ | २ | ८ | (નનધફ્કું) | (નધફ્કું) |
| २६८ | २ | २६ | नवघर | नवथर |
| २६९ | १ | २३ | (નવઈ) | (નવાઈ) |
| | २ | ३७ | नशीब | नसीब |
| २७३ | १ | १५ | ।મુના–સિ–બત) | (નામુનાસ–સિ–બ) |
| २७४ | १ | १४ | (१) ।श्चिंत होणे | निश्चिंत होणे |
| | १ | १५ | (३ ) पैशा रिकामें | पैशानें रिकामें |
| | १ | १६ | (નાહિમત) | (નાહિંમત) |
| २७७ | १ | २ | (નીચણ) | (નીચાણ) |
| | १ | २३ | –कांगलण | –भांगलण |
| २७९ | १ | ९ | नोक (–स्व) | नोक(–ख) |
| | १ | २६ | (નોંઝજણું) | (નોંજણું) |
| | २ | ६ | (નાધલું) | (નોંધલું) |
| | २ | १४ | (१) पद्य 'कर' | (१) पद्य 'नूर' |
| २८१ | २ | ३६ | –मरवुं | –भरवुं |
| २८२ | १ | २१ | –जियुं | –गियुं |
| | १ | २६ | (५) निश्चितपणे | (५) निश्चितपणे |
| २८६ | २ | २० | तळठीप | तळटीप |
| २८७ | १ | २५ | पंधरापंधेरांचा | पंधरापंधरांचा |
| २८८ | २ | २९ | (પરસ્તી) | (પરસ્તી) |
| २९१ | २ | ४१ | श्रम (झाझात) | श्रम |
| २९३ | २ | १६ | करवुं | –करवुं |
| २९४ | १ | ४ | (९) (व.) | (९) (न.) |
| २९५ | १ | ३४ | (પાળીયારી) | (પાળિયારી) |
| २९६ | १ | ४१ | –लियो | –ळियो |
| २९९ | २ | १९ | (१) चुलत भावंडे | (१) चुलत भावंड |
| ३०५ | १ | १७ | (પેતરો) | (પેંતરો) |
| ३०७ | २ | १९ | (પોવ–વું–) | (પો–વ–વું) |
| ३०९ | १ | ३५ | (ફડફવું) | (ફડફડવું) |
| ३११ | २ | ३५ | (ફાડ) | (ફાંટ) |
| | २ | ३८ | फाटियो | फांटियो |
| ३१३ | १ | ३० | (ફુફૂવારો) | (ફુવારો) |
| | १ | ३७ | (ફુલારા) | (ફુલારો) |
| | २ | १० | (ફુગ) | (ફૂગ) |
| | २ | ३६ | (ફુર્તી) | (ફૂર્તિ) |
| ३१४ | १ | ३९ | (ફેકર) | (ફેફર) |
| ३१५ | २ | १३ | (ફાર) | (ફોર) |
| ३१६ | १ | ११ | ढोल | ढोली |
| | १ | २४ | (બચલ) | (બગલ) |
| | २ | १९ | (બચકું) | (બચકું) |
| ३१९ | २ | १४ | (७) हवेत से | (७) हवे तसे |
| ३२० | १ | १७ | (બલગમ) (अ.) | (બલગમ) [अ.] |
| ३२२ | २ | ३ | (બાઠ) | (બાંઠ) |
| | २ | ३३ | विरोध घेणे | विरोध येणे |
| ३२३ | १ | १६ | बानु | बानुं |
| | १ | २२ | (१) बांधण्याचाक | (१) बांधण्याचा |
| ३२६ | २ | २८ | (બુઝૂર્ગ) | (બુઝુર્ગ) |
| ३२८ | २ | ८ | (બેહોડું) | (બેહાડું) |
| ३२९ | २ | २१ | बे मिसल | बेमिसल |
| ३३० | १ | २८ | प्रमाने | प्रेमाने |
| ३३१ | २ | १ | शिवून ओळे | शिवून ओवळे |

| पृष्ठ | स्तंभ | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|---|
| ३३३ | १ | ४१ | (क) | (न.) |
| ३३४ | १ | १५ | भकिडयुं | भडकियुं |
| ३३७ | २ | २४ | – बडाई | – बटाई |
| ३३८ | १ | १० | कटीण | कठिण |
| ३४१ | १ | १६ | अनजार | अवजार |
| | २ | ४० | (काडीच्या… | (काठीच्या…… |
| ३४४ | १ | २४ | चत्था | जत्था |
| ३४६ | २ | ८ | न्यून ठेवणे | न्यून ठेवणे |
| | २ | १३ | – वो ढीले करवो | – यो ढीले करवो |
| | २ | २७ | – बिवुं | – बियुं |
| ३४७ | १ | २४ | – मन उपर | मन उपर |
| ३४९ | १ | ३२ | (१) मृयु | (१) मृत्यु |
| ३५१ | २ | ३ | – चोपडवुं लगाववुं | – चोपडवुं, – लगाववुं |
| ३५२ | १ | ६ | (ભાઝ) | (ભાઝા) |
| ३५५ | १ | ९ | – आववु | – आववुं |
| | १ | २५ | – ती | – ली |
| | १ | ३३ | मार (वि.) | मार (पु.) |
| | २ | १५ | मार्यु मार्यु | मार्यु मार्यु |
| | २ | २८ | मार्यु | मार्यु |
| ३५८ | २ | ३३ | – तियुं, ती | – तियुं, – ती |
| ३५९ | २ | ७ | बांधलेले | बांधणे |
| | २ | ११ | मसद्दी | मुसद्दी |
| ३६१ | १ | २६ | – खाडी | – खाड |
| ३६२ | २ | २८ | – बेसवुं | – रे बेसवुं |
| ३६५ | २ | ३ | मोरमण | मोरवण |
| ३६८ | १ | २ | – कियुं | – छियुं |
| | २ | ३७ | रडयुं खडयुं | रड्यु खड्यु |
| ३७५ | १ | ४ | (રિખણું) | (રીખણું) |
| ३७६ | १ | ४ | રેખભલ | રેખભાલ |
| | १ | ११ | રેકવું | રૈંકવું |
| ३८० | २ | ५ | – (ठिं–ठींगुं) | – ठिं( – ठीं)गुं |
| | २ | १६ | લડક–કુ | લડાક–કુ |
| ३८२ | २ | ३० | લળરવું | લળકવું |
| ३८६ | २ | २६ | – लेवो | – खो लेवो |
| ३९० | २ | ६ | वचाववुं | वंचाववुं |
| ३९३ | १ | १६ | વલુર | વલૂર |
| | १ | २९ | बल्लु | बल्लुं |
| | २ | २७ | जवा | जवां |
| ४०२ | १ | २२ | वेंठ | वेठ |
| | १ | ३२ | – वेडा | वेडा |
| ४०३ | १ | १९ | વેળાવેળ | વેળોવેળ |
| | २ | ३ | વઈં | વૈદું |
| ४०४ | १ | ३८ | – वी | – बी |
| ४०५ | १ | ३० | (શળ) | (શાળ) |
| ४०९ | २ | २८ | सपरामण | सथरामण |
| ४११ | २ | १५ | समुळणुं | समूळगुं |
| ४१३ | २ | ३९ | (સલક્ષ–ખ–તુ) | (સલક્ષ–ખ–ણું) |
| ४१४ | १ | ११ | (સલેપાર) | (સલેપાટ) |
| ४१६ | १ | २ | साजु | साजुं |
| | १ | ८ | सांच्यं | सांच्युं |
| ४१८ | १ | ३० | सांबेल (સાંબેલ) (स्त्री.) – पाहा 'समोल' | सांबेल (……) जूं अडकविण्याची खीळ |
| ४२१ | २ | २२ | निजन | निर्जन |
| ४२५ | १ | २८ | (હથેલી-લી) | (હથેલી–હથેળી) |
| | २ | १४ | (હપડી) | (હમડી) |
| | २ | १८ | (હમ રાહી) | (હમરાહી) |
| | २ | १९ | (હમ વનની) | (હમવતની) |
| ४२६ | २ | ५ | (હલક) | (હલાક) |
| | २ | ८ | धम्य | धर्म्य |
| | २ | १७ | (હલેલું) | (હલેસું) |
| ४३४ | | | २. महिने व तिथ्यांची नावे | हा मजकूर 'टीप' या मजकूराच्या खाली पाहिजे, तसा वाचावा. |

# गुजराती-मराठी शब्दार्थ कोश

## अ (અ)

अ (અ) [सं.] (पुं.) – (१) (संस्कृतप्रमाणे) अभावदर्शक – नकारार्थी पूर्वग; उदा० 'असुख'.
(२) 'अति' या अर्थी; उदा० 'अघोर'.
(३) 'अयोग्य' या अर्थी; उदा० 'अकाळ'.
(४) निरर्थक; उदा० 'अमुझावुं'.

अउ (અઉ) (न.) – (१) चावणारे एक जिवाणू (२) साप (३) कास (गायी – म्हशीची).

अऋणी (અઋણી) [सं.] (वि.) – निष्कर्जी.

अक (અક) [सं.] (न.) – (१) दुःख (२) पाप.

अकच (અકચ) [सं.] (वि.) – केस नसलेला - ली - ले.

अकटोविकट (અકટોવિકટ) (वि.) – (१) अति बिकट (२) भयानक.

अकडाअकडी (અકડાઅકડી) (स्त्री.) – (१) चुरस (२) मारामारी.

अकडाई (અકડાઈ) (स्त्री.) – (१) ताठा. (२) ऐटबाजी.

अकडाट (અકડાટ) (पु.) – (१) ताठ्याची वागणूक (२) सांधे धरणे.

अकडावुं (અકડાવું) (अ. क्रि.) – (१) सांधा – अंग – आखडणे (२) तोऱ्यात – दिमाखात फिरणे.

अकतो (અકતો) (पु.) – कामाच्या सुटीचा दिवस (याला कोठे 'पाळक दिवस'ही म्हणतात).
– कांतवो – बाहेर सुट्टी घरात खूप कामात गुंतणे.
– पाळवो – सुट्टी पाळणे.

अकथ (અકથ) वि. – (१) न सांगितलेले (२) अवर्णनीय.

अकपट (અકપટ) [सं.] (न.) – कपटाचा अभाव.

अकबर (અકબર) [अ.] (वि.) – सर्वश्रेष्ठ.
– दिली (– દિલી) (स्त्री.) – मनाचा उमदेपणा, दिलदारपणा.

अकबंध (અકબંધ) (वि.) – अखंड, 'पॅकबंद', न खोललेले, जसेच्या तसे.

अकरण (અકરણ) [सं.] (वि.) – (१) इंद्रिय नसलेले (२) (न.) नाकर्तेपण.

अकराकेर (અકરાંકેર) (पु.) – (१) हाहाःकार (२) सत्यानाश.

अकराम (અકરામ) [अ.] (न.) – (१) बक्षीस, इनाम (२) सन्मान.

अकरांतियुं (અકરાંતિયું) (वि.) – खादाड, हावरे.
– यावेडा (पु. ब. व.) – खादाडपणाची वागणूक.

अकरुं (અકરું) (वि.) – (१) उकिडवे बसलेले (२) अस्थिर, चुळबुळे.

अकर्तव्य (અકર્તવ્ય) [सं.] – (वि.) न करण्यासारखे (२) (न.) दुराचरण.

अकर्म (અકર્મ) [सं.] – (१) कर्माचा अभाव (२) दुष्कर्म.

अकर्मण्य (અકર્મણ્ય) [सं.] (वि.) – (१) काम करण्याला नालायक (२) न करण्यासारखे.
(न.) – कर्म न करणे, निरुद्योग.

अक(-क)र्मी (અક-ક્ક-ર્મી) (वि.) – (१) दुर्दैवी, (२) कर्म न करणारा – री – रे (३) दुराचारी.
– ना पडिया काणा – अभाग्याचे लक्षण खोटे.
– निशाळियाने वतरणा घणा – नाचता येईना अंगण वाकडे.

अकर्मण (અકર્મણ) (स्त्री. वि.) – (१) अभागिनी (२) कुलटा.

अकल (અકલ) [अ.] (स्त्री.) – बुद्धी, अक्कल.
– मंद (वि.) – बुद्धिमान.
– लकडियुं (वि.) – प्रत्युत्पन्नमती असलेला – ली – ले, समयसूचक.

अकल(-ळ) (અકલ-ળ) (वि.) – अगम्य, न कळण्यासारखे.
– कला(- ा) (स्त्री.) – अगम्य लीला, माया.

अकला(-ळा) (અકલા-ળા) (स्त्री.) – (१) कलाशून्यता (२) वाईट कारागिरी.

अकलि(-ळि)त (અકલિ-ળિ-ત) (वि.) – न कळलेले, न कल्पिलेले.

अकली (અકલી) (वि.) – अक्कलवान, हुषार.

अकल्पित (અકલ્પિત) [सं.] (वि.) – (१) कल्पित नव्हे – खरे असे (२) अनपेक्षित.

अकविता (અકવિતા) (स्त्री.) – काव्यगुणविहीन कविता.

अकस (અકસ) [अ.] (पु.) – आकस, वैर.
– खोर (वि.) – द्वेषी.

अकसर (અકસર) [अ.] (अ.) – प्रायः, बहुतकरून.

अकसीर (અકસીર) [अ.] – (१) (वि.) रामबाण, अचूक इलाज करणारा-री-रे. (२) (स्त्री.) रामबाण औषध – इलाज.

अकस्मात (અકસ્માત) [सं.] (पु.) – अनपेक्षित घटना (२) नशिबात असेल तें, होष्यमाण.

अकळविकळ (અકળવિકળ) (वि.) – घाबराघुबरा.

अकळावुं (અકળાવું) (अ. क्रि.) – (१) जीव घाबरा होणे, बावरून जाणे (२) उबगणे (३) चिडणे.

अकळामण (અકળામણ) (स्त्री.) – (१) घबराट (२) उबग (३) चीड.

–(कोईनी उपर) काढवी –(कोणावर) राग काढणे, रागाने बोलणे किंवा मारणे.
अकंटक (અકંટક) [सं] (वि.) – निष्कंटक, निर्विघ्न.
अकंपित (અકંપિત) [सं.] (वि.) – स्थिर.
अकाक (અકાક) (वि.) – सुखदुःखाच्या पलीकडे.
अकाज (અકાજ) (वि.) – निरर्थक (२) असहाय, दीन.
अकातर (અકાતર) (वि.) – भेकड नसलेला-ली-ले, धैर्यवान.
अकाबर (અકાબર) [अ.] (पु.) – (१) प्रतिष्ठित-शिष्ट माणूस (२) अधिकारी, अमलदार.
अकाम (અકામ) (न.) – अयोग्य काम.
अकाम-मी (અકામી) (वि.) – वासनारहित, कामवासनारहित.
अकार (અકાર) (अ.) – निष्कारण, फुकट.
अकारज (અકારજ) (न.) – (१) अयोग्य काम (२) (अ.) व्यर्थ.
अकारण (અકારણ) (वि.) – विनाकारण.
अकारत (–थ) (અકારત–થ) (अ.) – व्यर्थ, निष्फळ.
–जवुं – वाया जाणे.
अकारुं (અકારું) (वि.) – अप्रिय, नावडते.
–पाडवुं – (१) अप्रिय होईलसे करणे (२) खोटे पाडणे, लाज आणणे.
अकाल(–ळ) (અકાલ–ળ) [सं.] (१) (वि.) – अकाली आलेले (२) (पु.) – अयोग्य काळ, वाईट काळ. (३) दुष्काळ. (४) काळातीत – परमेश्वर.
अकालिक (અકાલિક) [सं.] (वि.) – भलत्या वेळी आलेले.
अकालीनता (અકાલીનતા) (स्त्री.) – कालविपर्यास (ॲनॅक्रॉनिझम्).
अकाली (અકાલી) (पु.) – शीख धर्माच्या एका शाखेचा अनुयायी, किंवा ती शाखा.
अकांड (અકાંડ) [सं.] (वि.) – (१) आकस्मिक, अनपेक्षित. (२) पेरा (कांडे) नसलेला – ली – ले.
अकीक (અકીક) (पु.) – एक गुळगुळीत चकाकणारा दगड, काचमणी.
अकीकियो (અકીકિયો) (पु.) – काचमण्याच्या वस्तू बनविणारा कारागीर.
अकुटिल (અકુટિલ) [सं.] (वि.) – सरळ, निखालस.
अकुशल(-ळ) (અકુશલ–ળ) (वि.) – (१) गैरवाकबगार, (२) (न.) अनिष्ट, अशुभ.
अकुंठ–अकुंठित (અકુંઠ–ઠિત) [सं.] (वि.) – (१) मागे न पडणारे, कार्यसाधक, अप्रतिहत (२) तीक्ष्ण, बोथट नसलेले.
अकूपार (અકૂપાર) [सं.] (पु.) – समुद्र.
अकृत (અકૃત) – (वि.) (१) न केलेले (२) अयोग्य वा वाईट केलेले, (३) (न.) पाप.
अकृतात्मा (અકૃતાત્મા) [सं.] (वि.) – (१) अज्ञानी (२) निष्फळ (३) ईश्वरदर्शन न झालेला – ली – ले.
अके(-क्के)क(-कुं) (અકે–કે-કકું) (वि.) – एकेक (२) एका मागून एक (३) दरेक.
अकोट [सं.] (અકોટ) (पु.) – (१) सुपारीचे झाड (२) सुपारी.
अकोटी(-टो) (स्त्री.) (અકોટી–ટો) (पु.) – (१) सुपारी घाटाचा बायकांच्या कानांतला एक अलंकार (२) घुंगुराच्या आकाराची लोळी.
अकोणुं (અકોણું) (वि.) – (१) एकलकोंडे (२) तुसड.
अकोणाई(-पणु) (स्त्री) (અકોણાઈ–પણું) (न) – एकलकोंडेपणा.
अक्कड (અક્કડ) (वि.) – (१) कडक, ताठर, न वळणारे (२) ताठ (३) गर्विष्ठ.
–बाज (वि.) – अक्कडबाज, नटवेखोर.
अक्करचक्कर (અક્કરચક્કર) (अ.) – अचानक – अकल्पितपणे (२) वाटेल त्या रीतीने, वेडेवाकडे भरवून देऊन.
अक्कल (અક્કલ) (स्त्री.) बुद्धी.
–नुं आंधळुं
–नुं ऊंधुं
–नुं बारदान
–नो ओथमीर
} – मूर्ख, अकलेचा खंदक.
–नो आगळो – दीडशहाणा.
–उछीनी लेवी – अकल उसनी घेणे, दुसऱ्यापासून शिकणे, समजावून घेणे.
–गाम जवी – अक्कल न चालणे.
–चालवी – बुद्धी चालणे.
–फूटवी, फूटी जवी
–बहेर मारी जवी
–मारी जवी
} – प्रसंगी काही न सुचणे, बुद्धीने काम न देणें, बुद्धिभ्रंश होणे.
–बेची खावी – बेअकल बनणे.
–फूटुं (वि.) – बेअकली, मूर्ख.
–बाज (वि.) – युक्तिबाज, बुद्धिमंत.
–मठुं (वि.) – मंदबुद्धी.
–मंदी (स्त्री.) – बुद्धिमत्ता.
–होशियारी (स्त्री.) – अकलहुषारी.
अक्कलक(-ग-रो) (અક્કલક–ગ-રો) (पु.) – अकलखार.
अक्का (અક્કા) (स्त्री.) – अबोला, रुसवा, संबंध तोडणे.
–करवी – फू गट्टी करणे.
–थवी – फू गट्टी होणे
अक्रम (અક્રમ) [सं.] (वि.) – अनियमित. (२) (पु.) – क्रमाचा अभाव.
अक्रिय (અક્રિય) [सं.] (वि.) – (१) निष्क्रिय (२) निरुद्योगी, सुस्त.

अक्ष (અક્ષ) [सं.] (पु.) – (१) फासा (जुगारातील) (२) माळेचा मणी (३) (चाकाचा) आस (४) डोळा (५) ज्ञानेंद्रिय.
–माला (स्त्री.) – रुद्राक्षांची माळ, जपमाळ.
अक्षणिक (અક્ષણિક) [सं.] (वि.) – शाश्वत, स्थिर.
अक्षणुं (અક્ષણું) (न.) – तांदळाने भरलेले पात्र.
अक्षम (અક્ષમ) [सं.] (वि.) – (१) असमर्थ, दुर्बळ (२) असहिष्णू.
अक्षमा (અક્ષમા) [सं.] (स्त्री.) – ईर्ष्या (२) क्रोध.
अक्षय (અક્ષય) [सं.] (वि. – (१) कधी न संपणारा-री-रे. (२) अविनाशी.
–धाम (न.) – वैकुंठ किंवा मोक्ष.
–वाणी (स्त्री.) – (१) कधीं क्षीण न होणारी वाणी (२) सरस्वती.
अक्षर (અક્ષર) [सं.] (वि.) – अविनाशी;
(पु.) – (१) वर्ण (भाषा) (२) बोल
(पु. ब. व.) – (१) सही (२) विधिलेख.
(न.) – ब्रह्म.
–उतारवा – टोमणा टाळणे.
–काढवो – (तोंडाने) बोलणे, किंवा (हाताने) लिहिणे, अक्षर काढणे.
–पाडवो – लिहिणे.
–पडवो – लिहिताना अक्षर गळणे.
–मेळववा – (१) तपासणी करण्याकरितां अक्षरे मिळवून (तुलना करून) पाहणे (२) दोघांची जन्माक्षरे मिळतात का ते पाहणे.
–वाळवा – वळणदार अक्षर काढण्याचा प्रयत्न करणे.
–क्षेत्र (न.) – साहित्यक्षेत्र.
–गणित (न.) – बीजगणित.
–ज्ञान (न.) – लिहितावाचता येणे.
–देह (पु.) – (१) अविनाशी देह (२) कीर्ती (३) साहित्य – कला – कृती.
–धाम (न.) – मोक्ष.
–पद्धति (स्त्री.) – वर्ण लिहिण्याची पद्धती.
–बंध (पु.) – (१) गाढ मैत्री, न सुटणारा संबंध. (२) अक्षरांची रचना. (३) हस्ताक्षर, सही.
–माळा (स्त्री.) – वर्णमाला.
–विन्यास (पु.) – शुद्धलेखनकला.
अक्षरार्थ (અક્ષરાર્થ) (पु.) – (१) शब्दार्थ (२) संकुचित अर्थ.
अक्षि (અક્ષિ) [सं.] (स्त्री.) – डोळा.
–गोलक (पु.) – बुबुळ.
–तारा (स्त्री.) – डोळ्यातली बाहुली.
–पटल (न.) – डोळ्यावर येणारा पडदा (मोतीबिंदू इ. ने).
–फुट्ट (वि.) – आंधळे.
अख(-ख्ख)ड (અખ-ખ્ખ-ડ) (वि.) – (१) नांगरट करता न येणारे, पडीत (शेत) (२) गवतसुद्धा न येणारे, – बरड (३) वापरात नसलेले.
अखड दहाडा (અખડ દહાડા) (पु. ब. व.) – (१) काम करण्याकडे मन न लागण्याजोगे दिवस (२) कंटाळा येण्याजोगे दिवस.
अखडबखड (અખડબખડ), अखडाबखडी (અખડાબખડી) (वि.) – खाचखळगे – उंचसखल – असमान असलेले.
अखडावुं (અખડાવું) (अ. क्रि.) – आपटणे, टक्कर खाणे.
अखत(-त्त)र } अखतरुं (અખતરું) } (અખત-ત્ત-ર) (वि.) – घाणेरडे, द्वाड.
अखतरडाह्युं (અખતરડાહ્યું) (वि.) – दीडशहाणे.
अखतरो (અખતરો) [अ.] (पु.) – प्रयोग
अखतराखोर – राबाज (અખતરાખોર–રાબાજ) (वि.) – प्रयोगशील.
अखत्यार (અખત્યાર) [अ.] (पु.) – (१) अधिकार (२) पसंती.
–नामुं (न.) } –पत्र (पु. न.) } – मुखत्यारपत्र, सनद.
–री (स्त्री.) – सत्ता, अधिकार.
अखबार (અખબાર) [अ.] (पु., न.) – वर्तमानपत्र.
–नवीस [फा.] (पु.) – (१) बातमीदार, पत्रकार.
अखम (અખમ) (वि.) – (१) असहनशील (२) नाजूक (३) असमर्थ.
अखर (અખર) (स्त्री.) – पडित जमीन, गोचर रान.
अखरामण (અખરામણ) (न.) – विरजण्याकरिता घातलेले मुरवण.
अखरोट (અખરોટ) [अ. व फा.] (पु) – अक्रोड
अखंतर (અખંતર) (वि.) (१) गलिच्छ (२) (न.) झपाटणी (भुताची).
अखाद्य (અખાદ્ય) (वि.) (१) अखाद्य, (२) (न.) निषिद्ध अन्न, (मांस इ.).
अखाडा करवा – कानाडोळा करणे, लक्ष न देणे, न मानणे.
अखाडो (અખાડો) (पु.) – (१) आखाडा, व्यायामशाळा (२) बैराग्यांचा अड्डा (३) अड्डा.
–जामवो – (१) कुस्तीचा किंवा व्यायामाचा आखाडा व्यवस्थित चालू राहणे. (२) अड्डा किंवा बैठक रंगात येणे.
अखाडियो (અખાડિયો) (पु.) – व्यायामप्रेमी, कसरतबाज.
अखात (અખાત) [सं.] (वि.) – (१) न खणलेले (२) (पु.) आखात. (३) नैसर्गिकपणे बनलेला तलाव – सरोवर – कुंड.

**अखात्रीज** (અખાત્રીજ) (स्त्री.) – अक्षयतृतीया.
**अखियाणुं** (અખિયાણું) (न.) – वायन (शुभकार्याच्या प्रारंभी भटजीला किंवा सुवासिनीला देतात ते), वाण.
**अखियातुं** (અખિયાતું) (वि.) – (१) सहीसलामत (२) तंदुरुस्त.
**अखूट** (અખૂટ) (वि.) – संपणार नाही असे, अक्षय.
**अखोड** (અખોડ) (न.) – अक्रोड.
**अखोवन** (અખોવન) (वि.) – (१) सगळे (२) (स्त्री.) जिचें एकही अपत्य मेले नाही अशी सौभाग्यवती.
**अख्याति** (અખ્યાતિ) [सं.] (स्त्री.) – (१) अपकीर्ती (२) अप्रतीती.
**अग** (અગ) [सं.] (वि.) – (१) चालू न शकणारे (२) (पु.) झाड, (३) पर्वत.
**–ज** (वि.) – पहाडी.
**अग(-ग्ग)ड** (અગ–ગ્ગડ) (न.) – आगड, साठमारीचे मैदान.
**अगडधूत** (અગડધૂત) (वि.) – (१) अगडबंब (२) (पु.) एक बैराग्याची जात. (अवधूत).
**अगडबगडं** (અગડંબગડં) (वि.) – (१) खरेखोटे, वाटेल तसे (२) (न.) काहीही खरे खोटे – स्पष्टता नसलेले बोलणे.
**अगडो** (અગડો) (पु.) – अमुक, फलाणा ('बगडो' च्या जोडीने अगोदर येणारा शब्द – उदा०, 'अगडे बगडो मार्यो ने बगडे कागडो मार्यो')
**अगण** (અગણ) (वि.) – अगणित.
**अगणुं** (અગણું) (वि.) – तिसरे (पद्यात)
**अगण्य** (અગણ્ય) [सं.] (वि.) – मोजता न येण्याजोगे.
**अगति** (અગતિ) (स्त्री.) – (१) अवगती (२) (अमुक विषयात) गम्य नसणें (३) (वि.) गती नसलेले, स्थिर.
**–क** (वि.) – (१) अवगतीला गेलेले (२) कुंठित.
**अगतियो** (અગતિયો) (पु.) – एक हिरवट रंगाचा काजवा.
**अगत्य आपवी** (पु.) – आवश्यक किंवा महत्त्वाचे मानणे.
**अगथियो** (અગથિયો) (पु.) – अगस्तीचे झाड
**अगद** (અગદ) [सं.] (न.) – औषध
**अगन** (અગન) (स्त्री.) – (१) अग्नी (२) आग, अंगाची लाही.
**–ऊठवी** – एकदम आग व्हावयास लागणे.
**–बेसवी** – आग व्हावयाची बंद होणे.
**अगम** (અગમ) [सं.] (वि.) – (१) अगम्य, इंद्रियांना न कळणारे (२) (न.) भविष्य.
**–चेती** (स्त्री.) – पुढचा विचार करून अगोदर सावध राहणे.
**–निगम** (न.) – (१) भूत-भविष्य (२) वेद आणि शास्त्र (आगमनिगम).
**–निगमवाद** (पुं.) – गूढवाद (मिस्टिसिझम).
**–पच्छम** (स्त्री.) – मागचेपुढचे, भूत आणि भविष्य.
**–पंथ** (पु.) – (१) न जाण्यासारखा, माहीत नसलेला, गूढ मार्ग. (२) ईश्वरप्राप्तीचा मार्ग.
**–बुद्धि** (स्त्री.) – (१) पुढचा विचार अगाऊ करू शकेल अशी बुद्धी (२) (वि.) तशी बुद्धी असलेला–ली–ले.
**–बूधियुं** (वि.) – 'अगमबुद्धि' पाहा.
**–भाखी** (वि.) – भविष्यज्ञानी, भविष्य सांगणारा–री–रें.
**–वाणी** (स्त्री.) – (१) गूढ वाणी (२) भविष्यवाणी (३) वेदवाणी.
**अगमदोरो** (અગમદોરો) (पु.) – घोड्याच्या गळ्यातील शृंगार.
**अगमो** (અગમો) (पु.) – नावड.
**अगम्या** (અગમ્યા) (वि.) – संग निषिद्ध असलेली स्त्री.
**अगम्यागमन** (અગમ્યાગમન) (न.) – निषिद्ध स्त्रीशी व्यभिचार.
**अगर** (અગર) (पु.) – (१) मीठ पिकविण्याचे खाचर – आगर (२) (न.) चंदन.
**अगर** (અગર) [फा.] (अ.) – (१) जर (२) अथवा.
**–चे** (अ.) – जर.
**–जो** (अ.) – यद्यपि, जरी.
**अगरीयण – अगरी** (અગરિયણ – અગરી) (स्त्री.) – मीठ पिकविणारी स्त्री, आगरीची बायको.
**अगरियो** (અગરિયો) (पु.) – आगरी, मीठ पिकविणारा.
**अगराडा** (અગરાડા) (पु. ब. व.) – ज्वारी-बाजरीची हिरवी ताटे.
**अगरु** (અગરુ) [सं.] (न.) – चंदन.
**अगल** (અગલ) (स्त्री.) – गल, सई (विटीदांडूच्या खेळात करतात तो लहानसा खळगा).
**अगलबगल** (અગલબગલ) [फा.] (अ.) – आसपास.
**अगवड** (અગવડ) (स्त्री.) – गैरसोय, अडचण.
**–आववी – थवी – पडवी** – अडचण येणे किंवा वाटणे.
**अगवाडुं** (અગવાડું) (न.) – घरापुढचे अंगण, पुढचा भाग.
**अगवाडो** (અગવાડો) (पु.) – (१) अंगण (२) अंगरख्याचा पुढचा भाग, आगा.
**अगवो – अगुवो** (અગવો – અગુવો) (पु.) – (१) (वाट दाखवण्यासाठी) पुढे चालणारा, वाटाड्या. (२) नेता.
**अगस्त्य** (ऋषी) ना वायदा – दीर्घकाळचे आणि पाळता न येणारे–खोटे–वायदे.
**अगळ** (અગળ) (वि.) – न गळणारे, न ओघळणारे.
**अगाउ** (અગાઉ) (अ.) – अगाऊ, पूर्वी
**–थी** (अ.) – पहिल्यापासून.
**अगाडी** (અગાડી) (अ.) – (१) पूर्वी (२) पहिल्यांदा (३) जवळ, नजीक (४) दूर, पुढे (५) भविष्यकाळी.
**–थी** (अ.) – (१) पहिल्यापासून (२) पुढच्या भागापासून किंवा स्थानापासून.

—पछाडी (अ.)—(१) मागेपुढे (२) (स्त्री.) घोड्याच्या गळ्याला व पायांना बांधण्याच्या दोऱ्या.
अगात (અગાત) (अ.)—(१) अगाऊ (२) (पु.) शिलालेख.
अगार (અગાર) (पु. न.)—घर.
अगाशियुं (અગાશિયું) (न.)—उघडा ओटा.
अगाशी(-सी) (અગાશી-સી) (स्त्री.)—गच्ची.
अगासुं (અગાસું) (वि.)—खुले, झाकण किंवा छप्पर नसलेले.
अगियारमुं (અગિયારમું) (वि.)—(१) अकरावे (२) (न.) मृत्यूनंतरची अकराव्या दिवसाची क्रिया (३) त्या दिवशीची जेवणावळ.
अगियारश(-स) (અગિયારશ-સ) (स्त्री.)—एकादशी.
—करवी—एकादशीचा उपास करणे.
—ऊजववी—एकादशीचे व्रतोद्यापन करणे.
—भांगवी—तोडवी—एकादशीचे व्रत मोडणे.
अगियारा (અગિયારા) (पु. ब. व.)—अकराचा पाढा.
—गणवा, गणी जवा, भणवा—पोबारा करणे, निसटून जाणे.
अगियारी (અગિયારી) (स्त्री.)—(१) अकरकी (२) पारशी लोकांचे मंदिर—अग्यारी.
अगुणी (અગુણી) [सं.] (वि.)—(१) अवगुणी (२) उपकार न मानणारा-री-रे.
अगोचर (અગોચર) [सं.] (वि.)—(१) पाऊल ठेवावेसे न वाटण्यासारखे (२) पाऊल ठेवतां न येण्यासारखे.
अगोप (અગોપ) (वि.)—गुप्त.
अग्नि ऊठवो—एकदम अंगाची आग व्हावयास लागणे.
अग्निने उधई न लागे (वळगे)—(१) सत्याला आंच नाही (२) सत्याला मरण नाही.
अग्नि मुकवो—विस्तव ठेवणे—लावणे.
अग्निकोण–खूणो (पु.)—आग्नेय दिशा.
अग्निक्रिया (स्त्री.)—प्रेताला अग्नी देण्याची क्रिया.
अग्निक्रीडा (स्त्री.)—दारूकाम.
अग्निगर्भ (न.)—चकमक.
अग्निदिव्य (–परीक्षा)—भयंकर कसोटी, भयंकर दिव्य.
अग्निदाता (पु.)—प्रेताला अग्नी देणारा.
अग्निदीपन (न.)—जठराग्नी प्रज्वलित करणारे.
अग्निप्रद (वि.)—जठराग्नीला सतेज करणारे.
अग्रणियो (અગ્રણિયો) (पु.)—(१) अग्रणी, म्होरक्या (२) ब्राह्मण.
अग्रणी (અગ્રણી) (पु.)—नेता.
अग्रधान्य (અગ્રધાન્ય) (न.)—पावसाळ्यातले पहिले पीक.
अग्रशाळा (અગ્રશાળા) (स्त्री.)—ओसरी.
अग्रसर (અગ્રસર) (वि.)—अग्रेसर.
अग्रहायण (–न) (અગ્રહાયણ–ન) (पु.)—मार्गशीर्ष महिना.
अग्रहार (અગ્રહાર) (पु.)—सरकारकडून देवस्थानाला इनाम दिलेली जमीन.
अग्र्य (અગ્ર્ય) (वि.)—सर्वांच्या पुढे असलेला-ली-ले, श्रेष्ठ.
अघओक (અઘઓક) (स्त्री.)—(१) हागओक (२) कॉलरा.
अघटतुं (અઘટતું) (वि.)—अयोग्य, न साजेसे.
अघटित (અઘટિત) (वि.)—न घडणारा-री-रे.
अघड (અઘડ) (वि.)—(१) असंस्कारी, मूर्ख (२) (पु.) चर, खड्डा.
अघय(-र)णी (અઘય–ર–ણી) (न., स्त्री.)—(१) पहिल्या-प्रथमच गर्भधारणा (२) पहिलटकरणीला सातव्या महिन्याला करण्याचा विधी.
अघय(-र)णियात (वि. स्त्री.)—पहिल्याप्रथमच गर्भधारणा झालेली स्त्री.
अघरुं (અઘરું) (वि.)—कठीण.
—पडवुं—कठीण वाटणे किंवा होणे.
अघरेणियात (અઘરેણિયાત) (वि.)—गहाण ठेवून न घेतलेले, स्वतःच्या मालकीचे.
अघवुं (અઘવું) (अ. क्रि.)—(१) शौच करणे, हगणे (२) (लाक्ष.) जोर-जुलमाला वश होणे.
—अघी पडवुं—बेशुद्धीत किंवा भीतीने एकदम शौचाला होणे.
—अघीने उसेडवुं,—वाळवुं—करणे अयोग्य ते केल्यानंतर ते निस्तरण्याचा प्रयत्न करणे.
अघण (न.)—(१) हगवण (२) गुदद्वार.
अघणखाड(-ण) (स्त्री.)—शौचाचा खड्डा, नरककुंड.
अघणियुं (वि.)—हागरे.
अघणशी(-सी) (वि.)—हागरा री-,रे हगवण लागलेला-ली-ले.
अघमूतर (स्त्री.)—(१) हागमूत (२) (लाक्ष.) पराकाष्ठेच्या घबराटाने, त्रासाने किंवा मेहनतीने होणारी दुर्दशा.
अघ(-घा)ववुं (स. क्रि.)—(१) शौचाला करणे (२) खूप मारणे, ठोकणे (३). जोरजुलूम करून हवी ती वस्तू काढणे.
अघवाट (स्त्री.)—गुदद्वार.
अघवाड (स्त्री.) (-डो)(पु.)—हागून केलेली घाण.
अघराळो (અઘરાળો) (पु.)—ओगराळ.
अघाट (અઘાટ)—(वि.) (१) अपार, अनंत (२) (दस्तऐवजांत) सर्व हक्कानिशी. (३) (पु.) शिलालेख (४) (पु.) देवस्थानाला इनाम दिलेली जमीन (५) स्नाना-धुण्याचा घाट.
अघाटियुं (અઘાટિયું) (वि.)—(१) सर्व हक्कानिशी दिलेले (२) निमकहराम.
अघा(-घे)डो (અઘા–ઘે–ડો) (पु.)—आघाडा.
अघाण (અઘાણ)—मळ, विष्ठा.

**अघाणुं** (અઘાણું) (वि.) – सारखी शौचाची सवय असणारे.
**अघामण** (અઘામણ) (स्त्री.) – अतिसार.
**अघायु** (અઘાયુ) [सं.] (वि.) – पापी, दुष्ट.
**अघार** (અઘાર) (स्त्री.) – पाखरांचा – किड्यांचा मळ.
**अघारो** (અઘારો) (पु.) – कचरा – घाण.
**अघोर** (અઘોર) (वि.) – (१) अति भयायक (२) घातकी (३) शुद्ध नसलेले (४) अति कठीण किंवा तीक्ष्ण (५) गाढ (उदा. 'अघोर वन').
**–पंथ** (पु.) – भूतपिशाचांची साधना करणाऱ्या बुवा बैराग्यांचा पंथ
**–विद्या** (स्त्री.) – भूतपिशाच वश करण्याची विद्या.
**–री** (वि.) – (१) ऐदी, झोपाळू (२) कंटाळा – वीट आणण्याइतकें गलिच्छ.
**अघोष** (અઘોષ) [सं.] (पु.) – (व्याकरणात) क, च, ट, त, प आणि ख, छ, ठ, थ, फ या व्यंजनांना 'अघोष' व्यंजने म्हणतात.
**अंक** (અંક) [सं.] (पु.) – (१) आकडा, संख्येचे चिह्न (२) खूण (३) डाग, कलंक (४) मांडी (५) नाटकाचा भाग. (६) ध्रुवद.
**अंकन** (અંકન) (न.) – गायनाचे स्वर लिपिबद्ध करणे (नोटेशन).
**अंकमुख** (અંકમુખ) (न.) – नाटकाच्या ज्या भागात सबंध नाटकवस्तूचे सूचन करण्यात आले असेल असा भाग.
**अंके** (અંકે) (अ.) – रकमेचा आंकडा शब्दांत, अक्षरीं.
**–करवुं, बांधवुं** – (१) रकमेचा आकडा शब्दात (अक्षरीं) लिहिणे (२) पक्कें किंवा सिद्ध करणे.
**–सो करवा** – करार पुरा करणे.
**अंकाई** (અંકાઈ) **अंकामण – मणी** (स्त्री.) – (१) गणण्याचे काम (२) गणण्याची मजुरी.
**अंकाववु** (અંકાવવું) (स. क्रि.) – (१) पारख – कसोटी करविणे. (२) गणायला लावणे. (३) गिरवायला लावणे.
**अंकित** (અંકિત) [सं.] (वि.) – (१) खूण केलेले किंवा छाप मारलेले. (२) प्रसिद्ध (३) स्वाधीन.
**अंकुश** (અંકુશ) [सं.] (पु.) – (१) नियंत्रण, ताबा (२) हत्तीला टोचण्याचे हत्यार.
**–राखवो, अंकुशमां राखवुं** – ताबा किंवा नियंत्रण ठेवणे, ताब्यात ठेवणे.
**–रहेवो, अंकुशमां रहेवुं** – नियंत्रणात राहणे.
**अंकोडी** (અંકોડી) (स्त्री.) – आकडी, गळ.
**अंकोडो** (અંકોડો) (पु.) – (१) कडी (२) पकड, सांडसी.
**–डाबंध** (अ.) – कडीत कडी अडकविल्याप्रमाणे (२) हारबंद (३) मजबूत, पक्के.

**अंग** (અંગ) [सं.] (न.) – शरीर (२) अवयव (३) भाग (४) स्वतः.
**–उधार** वि. – वैयक्तिक पतीवर कर्जाऊ.
**–उपर** – स्वतःच्या जबाबदारीवर.
**–उमंग** (पु.) – मनाचा उल्लास.
**–जोर** (पु.) – अंगबळ.
**अंगत** (वि.) – व्यक्तिगत, व्यक्तिविषयक, खासगी.
**अंगतुं** (वि.) – (१) आपल्या गाठचे, स्वतःचे (२) विश्वासू (३) नजीकचे (नात्याचे).
**अंगभंग** (पु.) – (१) अंग आंबून जाण्याचा अनुभव (२) आळोखे पिळोखे.
**अंगभंगी** (हवी) – अंगविक्षेप.
**अंगभूत** (वि.) – भाग बनलेला – ली – ले.
**अंगमोडा** (पु. ब. व.) – (ताप येण्यापूर्वी) अंग मोडून येणे.
**अंगरक्षणी** (स्त्री.) – (१) लहान अंगरखा (२) एक प्रकारचे चिलखत.
**अंगरस** (पु.) – पाणी न मिसळलेला (फळांचा वगैरे) रस.
**अंगरंग** (पु.) – शरीराची कांती, चेहरा (२) भोगविलास.
**अंगवस्त्र** (१) – उपरणें (२) (लाक्ष.) राख (ठेवलेली बाई).
**अंगसंस्कार** (पु.) – शरीराची टापटीप.
**अंगस्वभाव** (पु) – उपजत स्वभाव.
**अंग आपवुं** – मदत करणे.
**–उपर कूदवुं** – स्वतःच्या हिंमतीवर उडी घेणे, साहस करणे.
**–उपर आववुं** – (१) शरीरावर चालून येणे (२) डोक्यावर येऊन पडणे.
**–उपरथी उतारी नाखवुं** – जबाबदारी पार पाडणे.
**–तळे घालवुं** – अयोग्य रीतीने – दडपून – पचवून टाकणे.
**–तूटवुं, तोडवुं** – शरीरात वेदना उत्पन्न होणे, कळा लागणे.
**–तोडावुं** – खूप श्रम करणे.
**–भरावुं** – शरीर दुखू लागणे, अंग भरून येणे (तापापूर्वी).
**–भारे थवुं** – (१) शरीर जड वाटू लागणे. (२) 'अंग भरावुं' पहा.
**–मरडवुं** – आळोखेपिळोखे देणे.
**–रही जवुं** – (१) अंग धरणे. (२) अंग लटके पडणे.
**–वळवुं** – (१) कसरतींत अवयव पाहिजे तसे वळणे (२) शरीर पुनः भरणे.
**–वाळवुं** – अवयवांना पाहिजे तसे वळविणे.
**–साचववुं** – अंग चोरणे, अंग चोरून वागणे.
**अंगाउ** (અંગાઉ) (वि.) – (१) स्वतःशी खास संबंधित; खासगी. (२) अंगावर उसने दिलेले.
**–खर्च** – (१) हातखर्ची (२) स्वतःसाठी खर्च.

डोळे येणे. (३) (लक्ष.) डोळे उघडणे (समज येणे या अर्थी)
–ऊघडवी–(१) बरोबर समज येणे, डोळे उघडणे (लक्ष.) (२) सावध किंवा सतर्क राहणे.
–ऊँची करवी–(१) निर्भय होऊन पाहणे. (२) गुंतलेल्या कामातून डोळे वर करून पाहणे. (३) डोळे बटारणे. (४) डोळे उघडणे (जसे, आजाऱ्याने).
–ऊठवी–पाहा 'आंख आववी'.
–एकठी थवी–(१) डोळ्यांना डोळे भिडणे. (२) नेत्रपल्लवी होणे.
–करवी–डोळा मारणे.
–काढवी–डोळे बटारून भिवविणे, धमकावणे.
–काणी करवी पण दिशा काणी न करवी–खाल्ल्याघरचे वासे न मोजणे, निमकहराम न होणे.
–खेंचवी, ताणवी–डोळे ताणून पाहणे.
–घेरावी–(झोपेने) डोळे भरणे.
–चडी आववी–डोळे सुजणे, डोळे येणे.
–चळी जवी–(१) उद्धटपणे पाहणे. (२) पाहिल्याने मनात विकार उपजणे.
–चोरवी–नजर चुकविणे. (२) संभ्रमात टाकणे, थाप मारणे.
–चोळतुं(-चोळीने) रहेवुं–(१) डोळे चोळीत–हार खाऊन–रडत बसणे. (२) लाचार, असहाय बनणे.
–टाढी थवी–डोळे निवणे, चिंता मिटणे, पाहून आनंदित होणे.
–ठरवी–डोळे थंड होणे. (२) अतिशय आवडणे, डोळे ठरणे.
–ठरी जवी–डोळे कायमचे मिटणे.
–ठरडावी–(मरतेवेळी) डोळे फिरविणे.
–तरवी–डोळे तळावणे, डोळ्यांना सूज येणे.
–तळे आववुं–देखरेखीखाली येणे.
–तळे काढवुं–तपासून–पाहून घेणे.
–दबाई जवी–लाजेने चूर होणे.
–दबावी–डोळे मिटणे (मरणे).
–देखाडवी, बताडवी–धमकावणे.
–नीकळी पडवी–न पाहवणे, सहन न होणे.
–फरकवी–डोळा उडणे, बरा-वाईट शकुन होणे.
–फरवी, फाटवी–डोळे फिरणे–फाटणे. (एखादे अतिभव्य, अतिक्रूर, अतिभयानक दृश्य पाहून).
–फूटवी–(१) आंधळे होणे (२) (लक्ष.) लक्षात येणे, सुचणे.
–फेरववी–करड्या नजरेने पाहणे.
–फोडवी–डोळे ताणून पाहणे किंवा वाचणे.
–भरवी–अश्रू भरून येणे.
–भरावी–पाहा 'आंख ठरवी'
–भारे थवी–डोळे जड होणे (झोपेने वगैरे).
–मळवी–डोळे मिटणे (झोपेने, मृत्यूने).
–मारवी–डोळा मारणे.
–मांडवी–टकमक बघणे.
–मी(-मीं) चवी–डोळे मिटणे.
–नुं चणियारुं करवुं–विवेक दृष्टी साफ नष्ट करून टाकणे.
–नुं चणियारुं खसवुं–रागाने डोळे फिरणे.
–नुं फूटेलुं–आंधळे, समजूत नसलेले, मूर्ख.
–नी कीकी–डोळ्यातली बाहुली (लक्ष.) अतिशय प्रिय.
–नो पाटो–अतिशय अप्रिय.
–मां आववुं–(१) नजरेस पडणे. (२) हेवा वाटू लागणे.
–मां आंगळीओ घालवी–डोळ्यात बोटे घालणे (लक्ष.)
–मां आंजवुं–(१) नजरबंदी करणे, भूल पाडणे. (२) (दुसऱ्याला) लाजविणे, शरमिंदे करणे. (३) झाकून टाकणे.
–मां कमळो होवो–कावीळ होणे (लक्ष.), आपल्याच दोषाने दुसऱ्याचे वाकडे (मुळांत तसे नसताना) दिसणे.
–मां कूवा पडवा–डोळे खोलात जाणे.
–मां खूंचवुं,–मां करकर आववी–(दुसऱ्याचे भले) न पाहवणे, डोळ्यात सलणे.
–मां खुन्नस आववी–डोळ्यात खून भरणे.
–मां चकलां रमवां–चंचलतेने डोळे चमकणे.
–मां तडतडियां पडवा–पाहा 'आंखमां खूंचवुं'.
–मां धूळ नाखवी–डोळ्यात धूळ फेकणे.
–मां पिया आववा–हेवा वाटणे.
–मां भमरीओ रमवी–सर्वत्र लक्ष ठेवणारी तीक्ष्ण आणि दक्ष नजर असणे.
–मां मरचां लागवां–पाहा 'आंखमां खूंचवुं'
–मां मीठुं आंजवुं,–नांखवुं,–भरवुं–(१) हाल करणे, छळ करणे. (२) पाणउतारा करणे, हरविणे. (३) थाप मारणे, फसविणे.
–मां मीठुं पडवुं,–राई भरावी–मत्सराने जळणे.
–मां लहेर आववी–झोपेने डोळे घेरणे.
–मां शनिश्चर होवो–दुसऱ्याचे बिघडविण्याची द्वेषी वृत्ती असणे.
–मां सांपोलियां रमवां–कामोत्तेजित नजर होणे.
–मांथी काळा काढी जवा–डोळ्यांत धूळ फेकणे
–मांथी भाला काढवा–करड्या नजरेने पाहणे, चिडून पाहणे.
–मींचीने अंधारुं करवुं–एकदम विचार न करता डोळे मिटून वर्तन करणे.

– मींचाई ने नगरी लुटाई – आपण मेलो जग बुडाले.
आंखे आववुं – पहा 'आंखमां आववुं.'
– आंख मळवी – नेत्रपल्लवी होणे.
– अंधारी बांधवी – डोळ्यांत धूळ टाकणे.
– बाझवुं – खूप सुंदर असणे.
– चडवुं – (१) नजरेस पडणे, एकदम दृष्टीपुढे येणे. (२) डोळ्यांवर येणे (लाक्ष).
– तळाव पाणियारा बांधवा – एवढ्यातेवढ्याने आसू ढाळणे.
– पाटा बांधवा – (१) अक्कल नाहीशी होणे. (२) भ्रमांत पाडणे, फसविणे.
आंखेथी पाटा छोडवा – अक्कल – समज ठिकाणावर येणे, सावधान होणे.
आंखो अवळी थवी } – थकूनभागून लोळागोळा होऊन जाणे,
– बोचीए आववी } खूप श्रम पडणे.
आंखो ऊँची करावधी – (१) उतावीळ बनविणे – व्हायला लावणे. (२) दुःख, त्रास देणे.
– चडवी, – जवी – गर्व होणे.
– मींचीने – डोळे मिटून, कसलाही विचार न करता.
बे आंखनी शरम – समोरासमोर जो प्रभाव किंवा दडपण पडते ते.
आंखियुं (આંખિયું) (न.) – झापड (बैलांच्या डोळ्यांपुढे लावतात ती).
आंखियां (આંખિયાં) (न. ब. व.) – (१) मूर्छा. (२) डोळे वटारणे. (३) आसू.
– आववां – मूर्छा किंवा आसू येणे.
– काढवां – डोळे वटारून पाहणे किंवा भिवविणे.
आंगड (આંગડ) (स्त्री) – (१) दागिने, रोकड वगैरे मोलाच्या वस्तू. (२) त्यांची जोखीम.
आंगडियो (આંગડિયો) (पु.) – दागिने, रोकडसारखी जोखमीची वस्तू घेऊन जाणारा माणूस, विश्वासू नोकर.
आंगडी (આંગડી) (स्त्री.) – आंगडे.
आंगणुं (આંગણું) (न,) – आंगण.
– ऊठी जवुं – (१) उच्छेद होणे, निर्वंश होणे. (२) सत्यानाश होणे.
– घसी नाखवुं – पुष्कळ वेळां एखाद्याच्या घराकडे हेलपाटे घालणे.
आंगत (આંગત) (वि.) – (१) आपले स्वतःचे. (२) स्वतंत्र मालकीचे. (३) जवळचे, नात्याचे.
आंगमण (આંગમણ) (स्त्री.) – कुवत, जोर.
आंगमवुं (આંગમવું) (स. क्रि.) – टक्कर देणे, झुंजणे ('मरण आंगमे ते भरे मूठी').
आंगलुं (આંગલું) (न.) झबले.
– आंगलां टोपी करवां – आंगडें टोपडे देणे.
आंगळ (આંગળ) (न.) – बोट (२) आंगूळ.
आंगळी (આંગળી) (स्त्री.) – बोट.
– आपवी – (१) मदत करणे, हात देणे. (२) आठवण करून देणे. (३) (खूण करून) चिथावून देणे.
– ऊंची करवी – (१) संमती दर्शविण्याकरिता बोट उंच करणे. (२) वर एक परमेश्वरच आहे असे बोट करून दाखविणे, असे दाखवून लाचारीची अवस्था दर्शविणे. (३) (काहीसे) विरुद्ध जाणे.
– आपतां पहोंचो पकडवो, – पहोंचे वळगवुं – बोट देता मनगट धरणे, थोडे द्यायला जाता सगळेच ओढून घेणे, भटाला दिली ओसरी, भट पाय पसरी.
– करवी – (१) इषारा करून चिथावणे, चिडविणे. (२) बोट करून दाखविणे. (३) निंदणे.
– खूंपवी – बोट शिरकणे (लाक्ष.), प्रवेश असणे.
– थवी – निंदा होणे, फजिती होणे.
– बतावबी – (१) (बोटाच्या खुणेने) धमकावणे, माराची भीती दाखविणे. (२) (मार्गदर्शन करून) मदत करणे
– ना वेढा पर, – ने टेरवे – होवुं – पाठ असणे, ज्ञान किंवा माहिती तयार असणे.
– ने वेढे गणाय एटलुं – बोटांवर मोजण्याइतके, फार थोडे.
– ने टेरवे नचाववुं, – पर नचाववुं – बोटावर नाचविणे, (एखाद्याला) कह्यांत – ताब्यात ठेवणे.
– पर राखवुं – (१) ताब्यात ठेवणे. (२) (प्रेमाने) आपल्याजवळच राखणे, दृष्टीबाहेर जाऊ न देणे, लाड करणे.
आंगळी थी नख वेगळा – (बोटावरच नख असूनसुद्धा) बोट वेगळे, नख वेगळे; म्हणजे त्यांच्याप्रमाणे एका घरांत – भागात – असूनहि विभक्तपणा.
आंगळी – देखामणुं (આંગળી – દેખામણું) (न.) – (लोकांनी बोटे दाखवून दाखवून होणारी) फजीती.
आंगळुं (આંગળું) (न.) – पाहा 'आंगळी'
– ळां करडवां – मनगटे चावणे (लाक्ष.), (पश्चात्ताप, आश्चर्य, चिंता किंवा निराशा हा भाव दाखविते), काळजीत पडणे (२) चकित होणे (३) पस्तावणे.
आंगळां चाटी पेट भरवुं – व्यर्थ धडपड करणे, दात टोकरून पोट भरणे.
आंगिक (આંગિક) [सं.] (वि.) – अंगासंबंधीचे, शरीरासंबंधीचे.
आंगी (આંગી) (स्त्री.) – (१) ठरलेल्या वराला सासुरवाडीकडून मिळणारे टीप न घातलेले कोरे वस्त्र. (२) देवीच्या मूर्तीऐवजी ठेवलेले रंगीबेरंगी टाक.
(३) हनुमानाच्या मूर्तीवरील तेलशेंदुराचा थर (४) जैन

मूर्तीचा शृंगार (५) वावटळीने उडणारा धुळीचा लोट.

–उतारवी–तेलशेंदुराचा थर काढणे.

–चडाववी–नवस म्हणून देवीचे प्रतीक तिच्या मूर्तीला वाहणे.

–पहेरावववी–वराला (वर वर्णन केलेले) वस्त्र देणे.

आचकवुं (આચકવું) (स. क्रि.)–हिसका देऊन ओढणे.

आचकी (આચકી) (स्त्री.)–(१) उचकी. (२) आकडी (फिटने अवयवांना येणारा ताण).

–को (पु.)–(१) हिसका (२) (लाक्ष.) संकोच, आनाकानी (३) धक्का (४) नुकसान.

–खावो–(गती एकदम थांबल्याने) हिसका बसणे.

–आपवो–हिसका देणे.

–मारवो–जोराने एकदम खेचून घेणे.

–आववो–लागवो–पाहा 'आचको खावो'

आचरकूचर (આચરકૂચર)–(१) (वि.) सटरफटर, फुटकळ, (२) (न.) फराळ, अरबटचरबट खाद्य. (३) किरकोळ सामान.

आचारी (આચારી) (वि.)–आचार–नियम पाळणारा.

आछ (આછ) (स्त्री.)–(१) न्यून, कमीपणा (२) ताकाचे पाणी, फळकवणी.

आछकलुं (આછકલું) (वि.)–(१) क्षुद्र मनाचे, नादान. (२) मोठेपणा न पचवू शकणारे. (३) फुलणारे, बहकणारे.

–लाई (स्त्री.)–लापणुं (न.),–लावेडा (पु. व. व.)–क्षुद्र वर्तन.

आछ(-छे)टवुं (આછ–છે–ટવું) (स. क्रि.)–(१) झटकणे. (२) आपटणे.

आछणलूछण (આછણલૂછણ (न.)–टापटीप, नीटनेटकेपणा.

आछर (આછર) (पु.)–(१) पोषाख (२) सतरंजी, आसन.

आछरवुं (આછરવું) (अ. क्रि.)–(१) ओसरणे. (२) नरम पडणे. (३) आंथरणे.

आछुं (આછું) (वि.)–(१) विरळ (२) कमी, थोडे. (३) विरविरीत (४) अस्पष्ट.

–पातळुं (वि.)–(१) थोडेबहुत, (२) साधारण

आछा दहाडा–आपत्तीचे–गरिबीचे दिवस.

आछेरुं (આછેરું) (वि.)–पाहा 'आछुं'

आछोतरुं (આછોતરું) (वि.)–(१) फारच विरळ (२) अति अस्पष्ट.

आजकाल (આજકાલ)–(१) (अ.) थोड्या काळांत, आज उद्या, एवढ्यात, हल्ली. (स्त्री.) आजचा दिवस उद्याचा दिवस.

–करवी–आज उद्या करणे, पुढे पुढे ढकलणे, वायदे करणे, लांबणीवर टाकणे.

–करतां–आजउद्या करता करता, हळूहळू.

–नुं (वि.)–(१) अलीकडचे. (२) थोड्या दिवसांचे (३) बिनअनुभवी.

–नो जोगी ने घुंटणलगी जटा–मियाँ मूठभर दाढी हातभर.

–मां (अ.) थोड्याच दिवसांत.

आजनी घडी अने कालनो दिवस–गेली घडी ती संपली. (वायद्याच्या भाषेतला शब्दप्रयोग.)

आजम (આજમ) [अ.] (वि.)–(१) मोठे, महान् (२) माननीय.

आजी (આજી) (स्त्री.)–आईची आई.

आजा-जो (આજા-જો) (पु.)–आईचा बाप.

आजीवक (આજીવક) [सं.] (पु.)–(लाक्ष.) ढोंगी संन्यासी.

आजीविका (આજીવિકા) [सं.] (स्त्री.)–(१) चरितार्थ. (२) चरितार्थाचे साधन.

आजूबाजू (આજૂબાજૂ) (अ.)–आसपास, चहूबाजूस.

–ए,–मां (अ.)–आसपास, चहूतरफ.

–ए थी–चहूबाजूंनी.

आजूकुं (આજૂકું) (वि.)–आजचे.

आजे (આજે) (अ.)–आज.

आज्ञा (આજ્ઞા) [सं.] (वि.)–(१) हुकूम (२) परवानगी.

–उठाववी,–मानवी–माथे चढाववी–हुकूम पाळणे–शिरसामान्य करणे.

–मां आववुं–ताब्याखाली–नियंत्रणात येणे, कह्यात येणे.

–कर (वि.)–हुकूम देणारा–री–रे.

–कारिता (स्त्री.)–कारित्व (न.)–हुकुमाप्रमाणे चालणे.

–कारी (वि.)–आज्ञेप्रमाणे चालणारा–री–रे, आज्ञांकित.

–पन (न.)–हुकूम, फर्मान.

–पत्र (न.)–राजाचा लेखी हुकूम, हुकूमनामा.

आझा (આઝા) (स्त्री.)–इजा.

आंच (આંચ) (स्त्री.)–(१) जाळ (२) आंच ३() तेज, रुबाब. (४) धमकी, त्रास. (५) इजा.

–आपवी–आंच देणे, खूप गरम करणे.

–आववी,–लागवी–इजा होणे.

–लागवी–भाजणे.

–देवी–त्रास देणे.

आंचकवुं (આંચકવું) (स. क्रि.)–एकदम जोराने खेचणे.

आंचकी (આંચકી) (स्त्री.)–(१) आकडी ('फिट') (२) उचकी.

आंचणी (આંચણી) (स्त्री)–बिचकत बोलण्याची तऱ्हा.

आंचलुं (આંચલું) (वि.)–अतिशहाणे.

आंचळ (આંચળ) आववो–आचळ सुजणे.

–उडी जवो–आचळांतून दूध न निघणे.
–झरवो–आचळातून दूध झरू लागणे.
–दूझवो–आचळाच्या सडांतून दुधाबरोबर रक्त येणे.
आंचळी (આંચળી) (स्त्री.)–पदर, पदराचे-फेट्याचे-टोक.
आंछ (આંછ) (स्त्री.)–(१) अंधुक (२) डोळ्यावर येणारा पडदा.
आंजण (આંજણ) (न.)–(१) अंजन, काजळ. (२) फसवणूक, कपट.
आंजवुं (स. क्रि.)–(१) डोळ्यांना काजळ लावणे. (२) दिपणे. (३) (लाक्ष.) निस्तेज करून टाकणे, दिपवून सोडणे.
आंजियुं (આંજિયું) (न.)–ज्वारीवरचा एक रोग, आग्या.
आंजो (આંજો) (पु.)–शीड बांधण्याचे मोठे दोर.
आट (આટ) (पु.)–(१) आटणी, विणताना धागा दाट ठोकण्याचे एक अवजार (२) वर ठेवलेले पडणार नाही अशा रीतीने रचलेली गोवऱ्यांची चळत.
आटआटलुं (આટઆટલું) (वि.)–इतके (खूप)
आट(-ड) काट (આટ-ડ-કાટ) (पु.)–सागवानाखेरीज इतर कसलेही लाकूड.
आटलुं (આટલું) (वि.)–अमुक इतक्या दाखविलेल्या निश्चित आकारा–मर्यादे–प्रमाणा–इतके.
–बधुं (वि.)–इतके पुष्कळ.
आटलामां (આટલામાં) (अ.)–(१) अमुक मर्यादित (क्षेत्राच्या–अवधीच्या) आत. (२) एवढ्यात (जवळ कुठे तरी). (३) इतक्यात.
आटविक (આટવિક) [सं.] (पु.)–जंगलातला मनुष्य.
आटापाटा (આટાપાટા) (पु. ब. व.)–आट्यापाट्या.
आटापाणी (આટાપાણી) (न. ब. व.)–(१) अन्नजळ (२) (लाक्ष.) चरितार्थाचे साधन (३) नशीब.
आटालूण (આટાલૂણ) (न)–(१) पीठ नि मीठ. (२) (लाक्ष.) धूळधाणी.
–मां जवुं, –खपवुं–व्यर्थ जाणे, धूळधाण होणे.
आटियुं (આટિયું) (न.)–जात्यातून पीठ झाडून काढण्याचा नारळीचा कुंचला.
आटो (આટો) (पु.)–(१) पीठ (२) कणीक.
–अने आवरदा एक थवां, –उडवो (१) अति त्रस्त होणे; थकवा, मार किंवा श्रम यांनी गळून जाणे. (२) सत्यानाश होणे.
–काढवो–खूप दमविणे.
–दळवो, पीसवो–वेठ करणे, मेटाकुटीने–कसेबसे काम करणे.
–नीकळवो–दमछाक होणे, थकून जाणे.
–बांधवो–कणीक किंवा पिठाचा गोळा तयार करणे.
आटोप (આટોપ) (पु.)–(१) अवडंबर, ऐट, शेखी (२) आवर.
आटोपवुं (આટોપવું) (स. क्रि.)–(१) आटोपणे. (२) आवरणे.
आठडो (આઠડો) (पु.)–(१) आठाचा आकडा, (२) विणताना ताणी ताणून राहण्याकरिता दोरीने ओढून बांधणे.
आठम (આઠમ) (स्त्री.)–अष्टमी.
आठा (આઠા) (पुं. ब. व.)–आठाचा पाढा.
आठे अंगे–सर्वांगेकरून, पुरेपूर.
आठेगांठे (આઠેગાંઠે) (अ.)–संपूर्णपणे.
आठेजाम (આઠેજામ) (अ.)–(१) अष्टौप्रहर (२) बारमाही.
आठणुं (આઠણું) (न.)–दोराला वळ देण्याची फरकडी.
आठियुं (આઠિયું) (वि.)–ठग, लुच्चे.
आठोठ (-ढ) (આઠોઠ–ઢ) (वि.)–व्यापून टाकलेले, ओतप्रोत.
आठोड (આઠોડ) (स्त्री.)–ताटावर उभ्या असलेल्या कणसाचे दाणे झटकून गोळा केलेली ज्वारी.
आड (આડ) (स्त्री.)–(१) आडवे गंध, आडवी कुंकवाची कोर (२) हट्ट
–छोडवी, मूकवी–हट्ट सोडून देणे.
–लेवी, –पकडवी–हट्ट धरणे.
–आडे चडवुं–हट्टाला पेटणे.
आड (पु.)–(कापसाच्या बोंडांची वगैरे) वखार.
आड (स्त्री.)–(१) दोहोंच्या मध्ये असणारी वस्तू (२) प्रतिबंध.
–मां मूकवुं–(रकमेची उचल करण्यासाठी) तारण म्हणून देणे.
–नुं दोढ करवुं–एकाचे दोन करणे, उलटेपालटे करणे.
–कतरातुं (वि.)–तिरकस किंवा वाकडे जाणारे.
–कतरूं (वि,)–(१) वाकडेतिकडे (२) अप्रत्यक्ष.
–कथा (स्त्री.)–(१) गोष्टीत येणारी गोष्ट, उपकथा. (२) बोलताना झालेले विषयांतर.
–खरच(-खर्च) (पु.)–मुख्य खर्चाव्यतिरिक्त वेडावाकडा खर्च.
–खील(-ली) (स्त्री.), –खीलो (पु.)–(१) विघ्न (२) आडखीळ, अडसर.
–गीर (पु.)–गहाण ठेवलेली वस्तू पुनः गहाण ठेवणे.
–घरेणे (अ.)–गहाण म्हणून.
–ताळो (पु.)–ताळा.
–त्रांसुं (वि.)–आडवेतिडवे, वेडेवाकडे.
–दावो (पु.)–विरुद्ध दावा.
–धंदो (पु.)–गौण धंदा

—नाम (न.)—आडनाव
—पासुं(-से) (अ.)—कुशीवर, एका बाजूवर.
—फेटियुं—फेटुं—शेटुं (वि.)—वाट चुकलेले, भरकटलेले.
—भींतीयुं (न.)—भिंतीपुढे भिंत घालून बनविलेले गुप्त कोठार, भंडारी.
—शेरी (स्त्री.)—बोळ.
—सर (पु., स्त्री., न.)—(१) पाणी अडवून ठेवण्याची पाळ
—साल (स्त्री.)—एक वर्ष आड करून येणारे वर्ष.
—सोड, (स्त्री.)—सोडियुं (न.)—(१) घोंगड्याच्या किंवा रजईच्या आंत लावण्याची चादर (२) छातीबरोबर येईल असे पांघरूण घेण्याची रीत
आडहथियार (આડહથિયાર) (न.)—शस्त्राच्या अभावी जे काही शस्त्र म्हणून उपयोगाला येईल ते.
आडणी (આડણી) (स्त्री.)—पोळपाट.
आडत (આડત) (स्त्री.)—आडत, दलाली.
आडतियो (આડતિયો) (पु.)—दलाल.
आडश (આડશ) (स्त्री.)—आडपडदा, आडोसा.
आडंबर (આડંબર) (पु.)—(१) थाट, दबदबा. (२) ढोंग. (३) अहंकार.
आडाझूड (આડાઝૂડ) (वि.)—(१) अस्ताव्यस्त, (२) भरगच्च.
आडाबोलुं (આડાબોલું) (वि.)—आडवे बोलणारे.
आडामोई (આડામોઈ) (वि. स्त्री.)—हट्टी–आग्रही बाई.
आडियुं (આડિયું) (न.)—(१) करवत (२) कपाळावर गंध उठविण्याची मुद्रा. (३) (शेंबडे पोर सद्याच्या बाहीने शेंबूड पुसते तसे) आडवे पुसण्याची रीत.
—करवुं—सद्याच्या बाहीने शेंबूड पुसणे.
आडी (આડી) (स्त्री.)—(१) वाटेत आडवी टाकण्याची वस्तू. (२) नवस. (३) हट्ट. (४) सीमा. (५) कुस्तीतला एक डाव.
—अवळी वातो—आडव्यातिडव्या गप्पा.
आडीतर (આડીતર) (स्त्री.)—होडीने नदी वगैरे ओलांडणे.
आडीवाडी (આડીવાડી) (स्त्री.)—कुटुंबपरिवार.
आडुं (આડું) (वि.)—(१) आडवे. (२) सरळ नाही असे. (३) अडथळा होणारे–करणारे लोढणे. (४) हट्टी. (५) हरकती घेणारे. (६) अप्रत्यक्ष. (७) वाकडे. (८) विरुद्ध मध्ये येणारे. (९) (अ.) आडबाजूला. (१०) (न.) गाडीच्या खालचा पेटारा. (११) भूत इ. नीच योनी.
—अवळुं (वि.)—खोटेनाटे, वेडेवाकडे, उलटे पालटे.
आडीखीली (આડીખીલી) (स्त्री.)—आडखीळ, विघ्न.
—जीभ करवी—मध्येच वाकडे बोलून हरकत आणणे.
—दोंटे (खावुं)—इकडेतिकडे न पाहतां यथास्थित (खाणे.)
—वाटनी धूळ—व्यर्थ धडपड.

आडुं(-डे) आववुं—(१) आडवे येणे, नडविणे. (२) मदतीला येणे.
आडुं(-डे) ऊतरवुं—(१) वाटेत कोणी आडवे येईल त्याला ओलांडून जाणे. (२) (विशेषेकरून मांजर आडवे गेल्याने) अपशकुन होणे.
—तेडुं—आडवे तिडवे.
आडुं थवुं—(१) आडवे पडणे, निजणे. (२) विरुद्ध होणे.
—फाटवुं—मधूनच फुटणे, वाकड्या रस्त्याला वळणे. (२) वाकडे बोलून वगैरे मध्येच हरकत (विघ्न) आणणे.
—ने ऊभुं लेवुं—खूप धमकावणे, निर्भर्त्सना करणे.
आडो आंक वाळवो—कमाल करणे.
—हाथ करवो—थांबविणे, अटकविणे.
—हाथ मारवो—(१) अप्रामाणिकपणाने मिळविणे. (२) लांच खाणे.
आडे हाथे—खरे खोटे न पाहता, अप्रामाणिकपणाने, वाकड्या मार्गाने.
आडुं अवळुं लेवुं—निर्भर्त्सना करणे, कानउघाडणी करणे, रागावणे.
आडुं तेडुं वेतरवुं—उलटेपालटे करून टाकणे.
आडे दहाडे—सुटीच्या किंवा सणाच्या दिवसाखेरीज किंवा अमुक दिवसाव्यतिरिक्त दुसऱ्या कोणत्याही दिवशी.
आडेधडे (આડેધડે) (अ.)—कांही धोरण न ठेवता, जसे येईल तसे.
आडो (આડો) (पु.)—अटकाव, विरोध. (२) हट्टीपणा, अडून बसणे.
—आंक (पु.)—कमाल, परिसीमा (उदा० 'तमाराथी तो आडो आंक'–तुम्ही तर कमाल केलीत!)
—खोबो (पु.)—अर्धी ओंजळ.
आडोधड (આડોધડ) (वि.)—बिलकुल नियमाला सोडून असलेले, नियमबाह्य.
आडोपु (આડોપુ) (न.)—(१) एखाद्याच्या उपयोगी पडणे. (२) अप्रत्यक्ष सूचनेने अमक्याकडून काम करवून देणे.
आडोशपाडोश (આડોશપાડોશ) (पु.)—(१) आसपासचा राहण्याचा भाग. (२) शेजारपाजार, आसपासची वस्ती.
आडोशीपाडोशी (આડોશીપાડોશી) (पु. न.)—शेजारीपाजारी.
आढ (આઢ) (पु.)—(१) ढीग. (२) पुंजका. (३) स्वैपाकासाठीं आणून ठेवलेला गोवऱ्यांच्या तुकड्यांचा ढीग.
आढक (આઢક) (पु., न.)—आठशेर धान्य मावण्याजोगे लाकडाचे माप.
आढवुं (આઢવું) (अ. क्रि.)—चरायला–भटकायला जाणे.
आढियो (આઢિયો) (पु.)—(१) रूची वलार असणारा व्यापारी. (२) गवळी, गुराखी.
आढ्य (આઢ્ય) [सं.] (वि.)—(१) धनवान. (२) (अमक्याने) भरपूर, उदा० 'गुणाढ्य'.

**आण** (આણ) (स्त्री.) – द्वाही. (२) आज्ञा (३) शपथ घालून मनाई.
 **– द्राण** (स्त्री.) – (१) कर वसूल करण्याची सत्ता. (२) अधिकार.
 **– देवी** – देवाची शपथ घालून मनाई करणे.
 **– फरवी, – वर्तवी** – हुकूम किंवा सत्ता चालणे, आण वर्तणे, द्वाही फिरणे.
 **– फेरववी – वर्तावची** – दवंडी पिटणे, द्वाही फिरविणे.
**आणवुं** (આણવું) (स. क्रि.) – दुरून आणणे, जाऊन आणणे.
**आणपाण** (આણપાણ) (स्त्री.) – आणे, पैसा, पै दर्शविणारी रेघीची लिपी. (उदा. ·॥≡|||)
**आणाआण** (આણાઆણ) (स्त्री.) – लगोलग किंवा इकडून तिकडून आणविण्याची धडपड.
**आणीकोर – गम – तरफ, – मग** (આણીકોર, – ગમ, – તરફ, – મગ) (अ.) – इकडे, या बाजूला.
**आणीपार** (આણીપાર) (अ.) – ऐल तीराला.
**आणीपेर** (આણીપેર) (अ.) – या रीतीने.
**आणुं** (આણું) (न.) – (१) माहेराहून वधूला विधिपूर्वक सासरी घेऊन येणे. (२) मुलीला सासरी पाठविताना करण्याचा आहेरविधि.
 **– आववुं** – वधूला सासराहून बोलावणे येणे.
 **– करवुं** – (१) बोलावणे पाठविणे. (२) बोलावणे पाठविण्याचा विधि करणे.
 **– मोकलवुं** – बोलावणे पाठविणे.
 **– वाळवुं** – मुलीला सासराहून बोलावणे येताच तिची पाठवणी करणे.
**आणे आववुं – जवुं** – बोलावणे करण्याकरिता येणे-जाणे.
**आणासुखडी** (આણાસુખડી) (स्त्री.) – बोलावणे करण्याच्या वेळी द्यावयाची पक्वान्नाची मिठाईची वगैरे भेट, वाण.
**आणे** (આણે) (सर्व.) – याने (या माणसाने) (बहुवचन – 'आमणे')
**आंट** (આંટ) (स्त्री.) – (१) गाठ. (२) वळ. (३) अढी, वैर. (४) साख, अब्रू. (५) हातोटी. (६) हातकाम करण्यात किंवा लिहिण्या-बोलण्यांत कुशलता. (७) अंगठा आणि तर्जनी यांच्यामधला भाग जेथे कलम टेकवून लिहितात तो.
 **– छोडवी** – वैर सोडणे.
 **– जवी, – तूटवी** – साख – पत जाणे.
 **– बेसवी** – (१) हातोटी साधणे (२) पत वाढणे
**आंटण** (આંટણ) (न) – घट्टा.
**आंटवुं** (આંટવું) (स. क्रि.) – (१) नेम धरणे. (२) मागे टाकणे.

**आंटियाळुं** (આંટિયાળું) (वि.) – गाठी असणारे, गाठकळ.
**आंटी** (આંટી) (स्त्री.) – (१) गाठ. (२) वळ. (३) कातलेल्या सुताची गुंडी. (४) (लाक्ष.) मनात ठेवलेला डंख. (५) फासा, पेच. (६) कारस्थान. (७) कोडे. (८) साख, पत, अब्रू.
 **– आववी** – पेचात सांपडणे, पेच पडणे.
 **– उकेलवी, – काढवी** – पेच सोडविणे.
 **– नाखवी** – पेचात टाकणे.
 **– पडवी** (१) खुरटणे. (२) बेबनाव होणे, वैर उत्पन्न होणे.
 **– मां नाखवुं** – पेचात टाकणे.
 **– राखवी** – अढी ठेवणे.
 **– घूंटियाळुं** (वि.) – कपटी कारस्थानी.
 **– घूंटी** (स्त्री.) – (१) कपट कारस्थान. (२) डावपेच.
**आंटो** (આંટો) (पु.) – (१) वळ, फेर. (२) फेरी, चक्कर. (३) अढी.
 **– खावो** – (१) वळ किंवा पीळ असेल त्याप्रमाणे फिरणे, ठरलेल्या परीघात फिरणे. (२) चक्कर मारणे, फेरी टाकणे.
 **– मारवो** – (१) फेऱ्या घालणे. (२) फुकट हेलपाटा घेणे.
 **– लेवो** – पहा 'आंटो खावो!'
 **– राखवो** – अढी ठेवणे.
 **– फेरो** (पु.) – फेरफटका.
**आतम** (આતમ) (पु.) – आत्मा.
**आतवार** (આતવાર) (पु.) – रविवार.
**आतश** (– स) (આતશ–સ) (पु.) – (१) अग्नि. (२) जळफळ. (३) क्रोध.
 **– परस्त** – (१) (वि.) अग्निपूजक. (२) (पु.) पारशी,
 **– बहेराम** (पु.) – अग्यारी (पारशी लोकांची).
 **– बाजी** (स्त्री.) – दारूकाम.
**आतशि(– सि) यो** (આતશિ–સિ–યો) (पु.) – काजवा.
**आतशी(– सी)** (वि.) – (१) अग्नि असलेले, गरम. (२) तापट. (३) कडक आग सहन करू शकेल अशी (बाटली).
**आती(– थी) पोती (– थी)** (આતી–થી–પોતી–થી) (स्त्री.) – पुंजी.
**आतो** (આતો) (पु.) – (१) आत्म्यासारखा प्रिय पुत्र. (२) युवराज किंवा ज्येष्ठ पुत्र. (३) आजा. (बापाचा बाप).
**आत्मबुद्धि** (આત્મબુદ્ધિ) [सं.] (स्त्री.) – (१) आपली स्वतंत्र बुद्धी. (२) आपलेपणाची बुद्धी. (३) मतलबीपणा, स्वार्थीपणा.
**आत्मबंधु** (આત્મબંધુ) (पु.) – रक्ताचा संबंधी.
**आत्मभोग** (આત્મભોગ) (पु.) – स्वार्थत्याग.
**आत्मवान** (આત્મવાન) (वि.) – (१) स्वतःवर ताबा ठेवणारा. (२) आत्मज्ञानी. (३) चैतन्ययुक्त.

आत्मवेगी (આત્મવેગી) (वि.) – आपल्या आपण चलनवलन करणारा – री – रे.
आत्मसंकोची (આત્મસંકોચી) (वि.) – संकोचशील.
आत्महत्यारुं (આત્મહત્યારું) (वि.) – आत्मघात करणारे.
आथ(-था) (આથ–થા) (स्त्री.) – पुंजी, ठेव.
आथड (આથડ) (स्त्री.) – रखडपट्टी.
– वुं (अ. क्रि.) – (१) रखडणे, भटकणे. (२) झगडा जुंपणें
आथडियां (આથડિયાં) (न. ब. व.) – (१) हेलपाटे. (२) गोते.
– खावां – (१) गोते खाणे. (२) फुकट हेलपाटे खाणे.
आथणुं (આથણું) (न.) – (१) लोणचें. (२) लोणचे घालण्याची कृती.
आथमणुं (આથમણું) (वि.) – मावळतीकडचे.
आथमवुं (આથમવું) (अ. क्रि.) – (१) मावळणे (२) दृष्टीआड होणे. (३) पडती दशा येणे.
आथर (આથર) (पु.) – (१) गवताचा थर (२) जाड मोठी चादर, रजई.
– ण (न.) – सतरंजी (२) आंथरूण.
– वुं (स. क्रि.) – (१) आंथरणे. (२) गंजी रचणे. (३) आच्छादणे.
आथवुं (આથવું) (स. क्रि.) – मीठ-मसाल्यात घालून खारविणे, आंबविणे (खमीर घालून).
आथा (આથા) }
आथीपोथी (આથીપોથી) } (स्त्री.) – पुंजी, मालमिळकत.
आथो (આથો) (पु.) – (१) खारणे, आंबणे. (२) खारण्या-आंबण्याकरता घालून ठेवलेला पदार्थ.
– आववो, – चडवो – खारण्याची क्रिया होणे, खार सुरू लागणे.
– नांखवो – आंबविण्याकरिता, खारण्याकरिता घालणे.
आदत (આદત) [अ.] (स्त्री.) – सवय, अभ्यास.
आदमखोर (આદમખોર) (वि.) – माणूसखाऊ.
आदमजात (આદમજાત) (स्त्री.) – मनुष्यजात.
आदमी (આદમી) (पु.) – मनुष्य.
आदमियत (આદમિયત) (स्त्री.) – माणुसकी.
आदरणी (આદરણી) (स्त्री.) – साखरपुडा झाल्यानंतर मुलीला वरपक्षाकडून देण्यात येणारी वस्त्रे-दागिने इ. ची भेट.
आदरवुं (આદરવું) (स. क्रि.) – (१) आरंभणे. (२) स्वीकारणे, मानपूर्वक घेणे. (३) प्रेमाराधन करणे.
आद (– द्य) वेर (આદ–દ્ય–વેર) (न.) – (१) हाडवैर (२) जुने वैर.
आदाब (આદાબ) [अ.] (पु.) – नमस्कार, विनय.
आदाय (આદાય) [सं.] (पु.) – (१) स्वीकार. (२) नफा, लाभ. (३) प्राप्ती, उत्पन्न.
आदाशीशी (આદાશીશી) (स्त्री.) – अर्धशिशी.
आदिम (આદિમ) [सं.] (पु.) – मूळ, आरंभीचें
आदुं (આદુ) (न.) – आले.
– काढी नांखवुं – जोर किंवा आवेग नरम पडेल असे करणे.
– खाईने – अतिशय चिवटपणे आणि मेहनतीने, खूप जोर करून.
आदानी सूंठ थवी – शरीर सुकून बारीक होणे.
आदापाक (આદાપાક) (पु.) – (१) आलेपाक (२) (लाक्ष.) मार.
– आववो – मारणे, ठोक देणे.
आदे (આદે) (अ.) – तोबा ('आता पुरे पुरे' असा अजीजी करणारा उद्गारवाचक)
आदोकदमी (આદોકદમી) (वि.) – पुरातन, जुन्या काळचे.
आध (આધ) (वि.) – अर्धे.
आध (– र) ण (આધ–ર–ણ) (न.) – आधण.
– मूकवुं – (१) आधणाचें पाणी चुलीवर ठेवणे. (२) स्वैपाकाची तयारी करू लागणे. (३) व्यर्थ खर्चून टाकणे, उधळून टाकणे.
– ऊकळी जवां – वेळ निघून जाणे.
आधरकण – (આધરકણ) (न.) – विरजण.
आधापलीत (આધાપલીત–તું) (वि.) – अर्धवट, अर्धे खुले
आधिक (આધિક) (पु.) – मांत्रिक, देवऋषी.
आधीनपणुं (આધીનપણું) (न.) – स्वाधीनता.
आधे (આધે) (अ.)–अर्ध्या हिश्शाने (ढोर संभाळायला देणे.)
– आपवुं,–मूकवुं,–बंधावबुं – ढोराला अर्धभागाने संभाळायला देणे – ठेवणे.
आधेड (આધેડ) (वि.) – पन्नाशीला पोचलेला – ली – ले, प्रौढ वयाचा – ची – चे.
आधेवायुं (આધેવાયું) (वि.) – गाड्या भाड्याने देण्याचा धंदा करणारा.
आन (આન) (वि.) – अन्य.
आनक (આનક) [सं.] (पु.) – नगारा, मृदंग.
आनति (આનતિ) [सं.] (स्त्री.) – (१) नमणे (२) नमस्कार (३) मान, पूज्यभाव.
– प्रदेश (पु.) – सखलातला प्रदेश.
आनर्त (-र्त्त) (આનર્ત) [सं.] (पु.) – काठेवाडचे प्राचीन नाव.
आनंदवुं (આનંદવું) (अ. क्रि.) – आनंदणे, खूष होणे.
आनंदा (આનંદા) (स्त्री.) – भांग.
आनाकानी (આનાકાની) (स्त्री.) – हो ना, का-कू, मनाची अनिश्चित स्थिती.

आनावारी (આનાવારી) (स्त्री.) – पिकाची आणेवारी, उत्पन्नाचा अंदाज.
आनियुं (આનિયું) (न.) – (स्त्रियांच्या) गळ्यात घालण्याची पुतळी.
आनी (આની) (स्त्री.) – (१) आणेली. (२) (लाक्ष.) सोळावा हिस्सा.
– भार (पु.) – १ तोळ्याचा १६ वा भाग.
आनुं (આનું) – 'आ' या सर्वनामाचे षष्ठीचे एकवचनाचे रूप, ह्याचे (ब. व. 'आमनुं')
आंतबार (આંતબાર) (पु.) – आडखीळ, विघ्न.
आंतर (આંતર) [सं.] (वि.) – अंतर्गत, आपापसातील, आंतरिक.
– युद्ध (न.) – यादवी.
आंतर, – डुं (આંતર,–ડું) (न.) – आंतडे (मोठे), पोटातील नळ.
– डां ऊंचा आववां, गळे आववां – फार श्रम पडणे.
– डानी माया – अंतःकरणापासूनची ममता.
– डानी सगाई – खरे नाते.
आंतरडां रंगवां – खूप मारणे, सतावणे, दुःख देणे.
आंतरडी (આંતરડી) (स्त्री.) – (१) लहान आतडे. (२) हृदय, अंतःकरण.
आंतरवुं (આંતરવું) (सं. क्रि.) – विभक्त पाडणे (२) वेढणे. (३) अटकावणे, अडविणे.
आंतरसी (–से) वो (આંતરસી–સે–વો) / आंतरसो (આંતરસો) } (पु.) – आतली शिवण.
आंतरी (આંતરી) (स्त्री.) – (१) दशी (धोतर, चादर इ. चा शेवटचा (बिनविणलेला भाग) (२) किनार, पदर. (३) कसर (एक प्रकारची कीड).
आंतरो (આંતરો) (पु.) – (१) अंतर, गाळा (२) अंतराय, आडपडदा, (३) विभक्तपणा, भेदभाव. (४) गाण्याच्या चिजेमधील उत्तरार्ध – अंतरा.
– भरवो – अंतराय उभा करणे, वेगळे पाडणें.
– राखवो – भेदभाव ठेवणे, मन मोकळे करून न बोलणे, परके मानून वागणे.
आंत्र (આંત્ર) [सं.] – (१) (वि.) आतड्यासंबंधीचे. (२) (न.) आतडे.
आंधळुं (આંધળું) (वि.) – (१) आंधळे. (२) विचाराचा डोळा नसलेले. (३) अज्ञानी.
आंधळा पाटा बांधवा – भुलविणे, भ्रमात टाकणे.
आंधळानी आंख – अतिशय प्रिय व अगत्याचे.
आंधळी गाय – निष्पाप गरीब स्वभावाचा माणूस.
आंधळु गूमडुं – तोंड न पडलेले करट.
आंधळे बहेरुं कुटावुं – घोटाळा अधिक वाढणे.
आंधळो धंधो – बिनमिळकतीचा किंवा नफा-नुकसान न कळून येणारा धंदा.
आंधळियुं (न.) – साहस, अविचारी कर्म.
– यां करवां – डोळे मिटून साहसात उडी घेणे.
आंधळी भींत (वि.) – पुरते आंधळे.
आंधळाने सूझे एवुं – अत्यंत स्पष्ट – लख्ख.
आंधळामां काणो राजो – वांसरांत लंगडी गाय शहाणी.
आंधळानी आगळ आरसी – वाघापुढे जसे गवत.
आंधळो पाटो – आंधळी कोशिंबीर.
आंधी (આંધી) (स्त्री.) – (१) सोसाट्याची वावटळ. (२) अंधपणा.
आप (આપ) – (१) (सर्व.) 'तुम्ही'ला बहुमानार्थी शब्द. (२) आपण स्वतः, खुद्द (३) (न.) अहंपणा. (४) आपले शरीर.
– अक्कल (स्त्री.) – स्वतःची बुद्धि.
– अखत्यार (वि.) – स्वतःच्या मर्जीप्रमाणे चालणारा – री – रे, सर्वसत्ता स्वाधीन ठेवून वागणारा – री – रे.
– आप करवुं – (१) बहुमान देऊन बोलणे किंवा वागणे. (२) खुशामत करणे.
– आपणुं (वि.) – आपापले.
– आपमां – आपापसांत.
– कमाई (स्त्री.) – स्वतः केलेली कमाई.
– कर्मी (वि.) – स्वतःच्याच पुरुषार्थावर विसंबणारा – री – रे
– कळा (स्त्री.) – आपोआप येत असलेली कला.
– खुद (वि.) – सर्व सत्ता स्वतःच्या हाती ठेवून चालणारा.
– खुदी (स्त्री.) – हुकूमशाहीचे वर्तन.
– खुशी (स्त्री.) – स्वतःची मर्जी.
– घात (पु.) – आत्महत्या.
– घातियुं (वि.) – आत्मघात करणारे.
– झलुं (वि.) – आपल्या बळावर टिकून राहणारे, स्वाश्रयी.
– डाह्युं (वि.) – (१) स्वतःला फार शहाणे समजणारे. (२) अतिशहाणे.
– दृष्टि (स्त्री.) – स्वार्थी दृष्टी.
– बळ (न.) – स्वतःचे बळ.
– बुद्धि (स्त्री.) – (१) स्वबुद्धी (२) स्वार्थबुद्धी.
– भोग (पु.) – स्वार्थत्याग.
– मतलबी (– बियुं) (वि.) – आपमतलबी.
– मतियुं, – मतीलुं (वि.) – (१) आपल्याच मताने चालणारे (२) दुराग्रही, झक्की.

–मुखत्यार (वि.)–आपल्या मर्जीप्रमाणें करण्याची सत्ता असणारे.
–मुखत्यारी (स्त्री.)–तसा अधिकार.
–मेळे (अ.)–आपोआप.
–रखुं (वि.)–आपलेच तेवढे संभाळून राहणारे, स्वार्थी.
–वखाण, –वडाई (स्त्री.)–आत्मश्लाघा, आत्मस्तुती.
–वीती (स्त्री.)–आपण भोगलेले प्रसंग–अनुभव, आत्मकथा.
–हत्यारुं (वि.)–आत्मघातकी.
आपे (આપે) (अ.)–आपोआप.
आपणुं (આપણું)–'आप' सर्वनामाचे षष्ठीचे एकवचनाचे रूप, आपले.
आपणे (આપણે) (सर्व.)–आपण, मी–तुम्ही.
आपत (આપત) (स्त्री.)–आपत्ती.
आपन्या (આપન્યા) (स्त्री.)–(१) आपल्या परिस्थितीची जाणीव. (२) आत्मसंतोष.
आपले (આપલે) (स्त्री.)–देवाणघेवाण.
आपवुं (આપવું) (स. क्रि.)–(१) देणे (२) सोपविणे, हवाली करणे.
आपसमां (આપસમાં) (अ.)–आपापसात.
आपात (આપાત) [सं.] (पु.)–(१) पतन. (२) चालू क्षण (३) प्रथम दृष्टी.
–तः–एकदम.
आपापर (આપાપર) (वि.)–स्वतःचे आणि दुसऱ्याचे, तुझे माझे, आपपर.
आपुशाह (આપુશાહ) (पु.)–सावकार, आपले देणे भरून टाकील असा गृहस्थ.
आपो (આપો) (पु.)–(१) बाप (२) वृद्ध मनुष्य, वडील.
आपोपुं (આપોપું) (न.)–(१) आत्मीयभाव, आपलेपणा. (२) (अ.) आपोआप.
आप्त (આપ્ત) [सं.] (वि.)–(१) संबंधी (जन) (२) विश्वासपात्र (बातमी इ.) (३) विश्वासू. (४) प्राप्त (५) (पु.) प्रमाणपात्र मनुष्य.
–काम (वि.)–ज्याची इच्छा सफल झाली असा, संतुष्ट.
–वर्ग (पु.)–आप्तजनांचे मंडळ–समूह.
–वाक्य (न.)–विश्वासार्ह बोलणे.
आफणी (આફણી) (स्त्री.)–(१) आपत्ती (२) फेस.
आफणीए (આફણીએ) (अ.)–(१) आपोआप. (२) एकदम.
आफत (આફત) [अ.] (स्त्री.)–आपत्ती.
आफताब (આફતાબ) [फा.] (पु.)–सूर्य.
–गीरी (स्त्री.)–अबदागिरी.

अफरकवुं, आफरवुं (અફરકવું, આફરવું) (अ. क्रि.)–पोट फुगणे.
आफरीन (આફરીન) [फा.] (अ.)–(१) फिदा, कुर्बान. (२) धन्य, शाबास! (३) (स्त्री.) शाबासकी.
आफरो (આફરો) (पु.)–(१) पोटफुगी (२) खूप खाल्ल्याने लागणारी तडस.
–चडवो–पोट फुगून तडस लागणे.
–ऊतरवो, –बेसवो–पोट उतरणे.
आफळवुं (આફળવું) (अ. क्रि.)–(१) आपटणे. (२) निष्फळ होणे.
आब (આબ) [फा.] (न.)–(१) पाणी (२) तेज (३) धारेची तीक्ष्णता, पाणी.
–कारी (स्त्री.)–(१) दारू गाळण्याचे काम. (२) दारू इ. मादक पदार्थांवर घेतला जाणारा कर.
–खोरी (स्त्री.)–लोटी.
–खोरो (पु.)–लोटा.
–दस्त (न.)–नमाजापूर्वी हात, पाय, तोंड धुतात तो वजू.
–दार (वि.)–धारदार, पाणीदार.
–दारखानुं (न.)–पाणी भरण्याची जागा.
–आबरू (આબરૂ) [फा.] (स्त्री.)–कीर्ति, पत
–आपवी–मान देणे, प्रतिष्ठा ठेवणे.
–उघाडवी, –उघाडी करवी–फजिती किंवा बेअब्रू करणे.
–उपर आववुं–चारित्र्यावर किंवा अब्रूवर शिंतोडे उडविणे.
–उपर वात आववी–अब्रू जाण्याचा प्रसंग येणे.
–काढवी–कीर्ति मिळवणे, नाव करणे.
–ना कांकरा–अब्रूच्या ठिकऱ्या, बेअब्रू.
आबाद (આબાદ) [फा.] (वि.)–(१) वस्ती असलेले (२) समृद्ध. (३) कसलेली, सुपीक (जमीन) (४) सुरक्षित, सुखी. (५) उत्तम. (६) अचूक (७) न चुकता.
–दानी–दी (स्त्री.)–समृद्धी.
आबि(–बे)द (આબિદ) [अ.] (वि.)–धार्मिक, पवित्र, प्रार्थना करणारे.
आबेहयात (આબેહયાત [फा.] (वि.) (न.)–अमृत.
आबेहूब (આબેહૂબ) (वि.)–हुबेहूब.
आबोहवा (આબોહવા) [फा.] (स्त्री.)–हवापाणी, वातावरण.
आभ (આભ) (न.)–(१) आकाश. (२) ढग.
–ऊंडळमां लेवुं } –कुवतीबाहेर हिंमत करणे, साहस अंगावर घेणे.
–नी साथे बाथ भीडवी, –बांथ भरवी }
– जमीन नो फरक, फेर–जमीन-अस्मानाचे अंतर.
–ना तारा उखेडवा, – उतरवां–प्रचंड उलथापालथ करणे.

–तूटी पडवुं, –पडवुं – आकाश कोसळणे
–ना तारा देखाडवा – अतिशय त्रास देणें, डोळ्यांपुढे काजवे चमकायला लावणे.
–ना तारा देखवा – जणू स्वर्ग दोन बोटे उरणे.
–ना तारा खरवा – (१) प्रचंड खळबळ होणे. (२) उल्कापात होणे.
–फाटयुं त्यां थींगडुं क्यां देवाय ? – आकाश फाटले तिथे ठिगळ कुठे लावणार ?
–लुं (न.) – (१) आकाश. (२) ढग. (३) आरसा. (४) बारीक गोल काचेची चकती जी साडीवर चिकटवितात. (काठेवाडी स्त्रिया)
आभालाडु (આભાલાડુ) – मनातले मांडे.
आभडछेट (આભડછેટ) (स्त्री.) – (१) विटाळ, शिवाशीव. (२) रक्तस्राव, विटाळ (स्त्रियांचा) (३) प्रसूतीच्या वेळी बाहेर पडणारा द्रव पदार्थ, रक्त इ.
आभडवुं (આભડવું) (अ. क्रि.) – शिवाशिव करणे. (२) शिवणे, स्पर्श करणे.
आभडवा जवुं – मेलेल्याच्या अंत्यसंस्काराकरिता जाणे.
आभासी (આભાસી) (वि.) – (१) दिसणारे. (२) प्रकाशणारे. (३) आभास दाखविणारे. (४) –च्या सारखे दिसणारे.
आभिजात्य (આભિજાત્ય) [सं.] (न.) (१) कुलीनता, खानदानी. (२) श्रेष्ठता, सौंदर्य.
आभीर (આભીર) [सं.] (पु.) – गवळी, अहीर.
आभुं (આભું) (वि.) – चकित, दंग.
–बनवुं – चकित–दंग होऊन जाणे.
आभेस (આભેસ) (न.) – शीड.
–करवुं – शीड चढविणे.
आभोक (આભોક) (पु.) – (१) आटोपणी. (२) भोगवटा, कबजा.
–वाळवो – उपसंहार करणे.
आभोग (આભોગ) [सं.] (पु.) – (१) उपभोग. (२) घेर, विस्तार. (३) नागाची फणा.
आभ्यंतर (આભ્યંતર) (–रिक) [सं.] (वि.) – आतील, अंतरातील.
आम (આમ) [सं.] (पु.) – (१) आव (२) मुरडा होऊन शौच.
–रस (पु.) – आव.
–वात (पु.) – आवेमुळे होणारा संधिवात.
आमातिसार (આમાતિસાર) (पु.) – संग्रहणी.
आमाशय (આમાશય) (न.) – आव असणारा पोटाचा भाग.
आम (આમ) (स्त्री.) – आंबा.
–चूर (न.) – (किसून केलेला) कैरीचा मुरंबा, लोणचे.
–रस (पु.) – आंबरस.
–रसियुं, –रसी – आंबरसासारखे.
आम (अ.) – (१) याप्रमाणे, या रीतीने. (२) इकडे, या बाजूला.
–तेम (अ.) – (१) इकडे तिकडे. (२) वाटेल तसे, अव्यवस्थित.
–तेमथी (अ) – (१) वाटेल तसे. (२) वाटेल तेथून. (३) इकडून तिकडून.
–थी (अ.) – इकडून.
–नुं (वि.) – या बाजूचे.
आमनो सूरज आम ऊगवो – इकडचा सूर्य तिकडे उगवणे, सामान्यतः शक्य न होईल असे घडणे.
आम [अ.] (वि.) – सर्वसामान्य.
–जनता, –प्रजा (स्त्री.) – सर्वसामान्य लोक (अमुक वर्गाचे नव्हेत).
–वर्ग (पु.) – सामान्य लोकांचा वर्ग.
–सभा (स्त्री.) – सामान्य लोकांची सभा. (२) सामान्य लोकांच्या प्रतिनिधींची (विशिष्ट वर्गाच्या नव्हे) सभा.
–सरा (स्त्री.) – (१) सराई, धर्मशाळा. (२) दोन मोहल्ल्यांमधील सार्वजनिक जागा, चौक.
आमचुं (આમચું) (न.) – (१) आमसूल. (२) कोणत्याही आंबट फळाचे सुकविलेले तुकडे.
आमट (આમટ) (वि.) – आंबट.
आमण (આમણુ) (स्त्री.) – आतड्याचा शेवटाचा भाग. (२) चाकाचा एक भाग.
आमणदूमणुं (આમણદૂમણું) (वि.) – (१) उपकाराखाली दबलेले, मिंधे. (२) हताश.
आमणे (આમણે) (सर्व.) – याने (या माणसाने)
आमद, -नी, -दानी (આમદ, -ની, -દાની) [फा.] (स्त्री.) – (१) प्राप्ती. (२) उत्पन्न.
आमनसामन (આમનસામન) (अ.) – (१) आमोरासमोर (२) आपापसांत. (३) परस्पर.
आमन्या (આમન્યા) (स्त्री.) – (१) आज्ञापालन. (२) मर्यादा, शिष्टाचार.
–पाळवी – (१) आज्ञापालन करणे. (२) (वडिलांची–थोरांची) मर्यादा पाळणे.
–मां रहेवुं – आज्ञा किंवा मर्यादा उल्लंघन न करणे, –च्या वचनात राहणे.
–रहेवी – मर्यादा संभाळली जाणे.
आमली (આમલી) (स्त्री.) – चिंच.

–रमाडवी–(१) वेडेवाकडे सांगून भ्रमात टाकणे (२) फुकट धडपड करायला लावणे.
आमळ (આમળ) (स्त्री., न.) (१) आंतड्याच्या शेवटचा भाग. (२) नाळ.
आमळवुं (આમળવું) (स. क्रि.)–पिळणे, पीळ देणे.
आमळो (આમળો) (पु.)–(१) पीळ. (२) अभिमान, जिद्द. (३) द्वेष, आकस.
–चडवो–(१) पीळ–वळ चढणे, आकस उत्पन्न होणे.
–राखवो–मनांत द्वेष धरून ठेवणे.
आमळी (આમળી) (स्त्री.)–आवळ्याचें झाड.
आमळुं (આમળું) } (न.)–आवळा.
आंबळुं }
आमान्न (આમાન્ન) [सं.] (न.)–(१) तांदूळ. (२) कच्चा शिधा.
आमिल (આમિલ) [सं.] (पु.)–(१) अमलदार. (२) एक सिंधी हिंदूमधील जात.
आमीन (આમીન) [अ.] (अ.)–तथास्तु.
आमुख (આમુખ) [सं.] (न.)–उपोद्घात.
आमेज (આમેજ) [फा.] (वि.)–सामिल केलेले, समाविष्ट करून घेतलेले.
आंबवुं (આંબવું)–(१) (स. क्रि.) गाठणे. (२) (अ. क्रि.) आंबणे
आंबेल (આંબેલ) (न.)–(जैनांचे) एक वेळ अळणी (मिठाशिवाय) जेवण करण्याचे व्रत.
आंबो (આંબો) (पु.)–आंब्याचे झाड.
–आंबा गोडी नाखवा–कधी भरून न येण्याजोगे नुकसान करणे.
आंबलियो (पु.)–आंब्याचे झाड.
आंबागाळो (पु.)–आंब्याचा मोसम.
आंबामोर (पु.)–(१) आंब्याचा मोहोर. (२) आंबेमोहोर (तांदूळ).
आंबावाडियुं (न.) –वाडी (स्त्री.)–आंबराई.
आंबाशा (–सा) ख (स्त्री.)–झाडावर पिकलेला आंबा.
आंबोळियुं (આંબોળિયું) (न.)–सुकविलेल्या कैरीच्या गराचे तुकडे.
आंबोई (આંબોઈ) (स्त्री.)–बेंबीच्या खालच्या नसांची गाठ.
आंबोसुं (આંબોસું) (न.)–(१) सुके जर्दाळू (२) सुके द्राक्ष.
आंस (આંસ) (पु.)–कणा, आस.
आंसु (આંસુ) (न.)–अश्रू.
–ढाळ–(१) (वि.) डोळ्यांतून पाणी काढायला लावील असे. (२) (स्त्री.) घोड्याची एक जात.

आंहां (આંહાં) (अ.)–अंहं.
आंहांतूस (આંહાંતૂસ) (स्त्री.)–हो ना करणे, (मनाची) अनिश्चितता.
आंहीं,–कणे (આંહીં,–કણે) (भ.)–येथे.
आय (આય) (न.)–आयुष्य.
आय [सं.] (पु.)–(१) लाभ, प्राप्ती. (२) उत्पन्न. (३) अंतःपुरातील रखवालदार.
–व्यय (पु.)–प्राप्ती व खर्च.
आय (स्त्री.)–(१) शक्ती, कुवत. (२) हिंमत.
आय(-व)खुं (આય–વ–ખું) (न.)–आयुष्य.
आयडु (આયડુ) (पु.)–गुराखी.
–डुं (न.)–ढोरे चरायला जाणे.
आयतुं (આયતું) (वि.)–आयते, अनायासे मिळालेले.
–तापर रायतुं–जमविलेल्या पैशातून खर्च करणे.
–ताराम (पु.)–आयतोबा.
आयदो (આયદો) (पु.)–हिस्सेदाराचा ठरविलेला हिस्सा.
आयनो (આયનો) (पु.)–आरसा.
आयपत (આયપત)–(१) (स्त्री.) प्राप्ती, कमाई, उत्पन्न. (२) (न.) वारसा.
–वेरो (पु.)–प्राप्तिकर.
आयंदे (આયંદે) (अ.)–(१) इतःपर. (२) एकंदरीने.
आयासी (આયાસી) (वि.)–(१) आयास–कष्ट करणारा–री –रे, मेहेनती. (२) दुःखप्रद. (३) थकलेले.
आयोजन (આયોજન) [सं.] (न.)–(१) व्यवस्था करणे. (२) व्यवस्थेची साधनसामग्री.
–ना (स्त्री.)–व्यवस्था, जमवाजमव.
आर (આર) (पु.)–पाण्याचा वेग–ओढ.
आर (स्त्री.)–(१) लोखंडी टोक (पराणीचे असते तसे) (२) पराणी (३) चांभाराची आरी.
आर (पु.)–(१) खळ (कापडाला किंवा कपड्याला लावतात ती). (२) आहार.
–उतारवो,–काडवो–खळ काढून टाकणे.
–चडाववो,–देवो–खळ लावणे.
आरकुं (આરકું) (न.)–कमान, मेहेरप.
आरगणुं (આરગણું) (न.)–चांभाराची आरी.
आरजू (આરજૂ) [फा.] (स्त्री.)–(१) इच्छा (२) उमेद, आशा. (३) आतुरता, तीव्र इच्छा.
–मंद (वि.)–इच्छा–आशा असलेला–ली–ले.
आरजो (આરજો) (पु.)–रोग, आजार, व्याधी.
आरणकारण (આરણકારણ) (१) (न.) काहीतरी कारण, निमित्त, (२) (वि.) अनिश्चित.

आरणुं (આરણું) (न.)–शेणकूट, गोवरी.
आरत (આરત)–(१) (वि.) आर्त, पीडित. (२) अडचणीत सापडलेला–ली–ले, (३) अगत्याचे. (४) आतुर (५) (स्त्री.) अडचण, संकट, नड. (६) उत्कट इच्छा.
–बंधु (पु.)–अडचणीच्या–संकटाच्या वेळचा बंधू.
तियुं–(न.)–आर्त असणारे.
आरती (આરતી) (स्त्री.)–(१) दुःख, पीडा. (२) आरती (देवाला ओवाळतात ती).
–उतारवी,–आरती करणे.
–जेवुं–स्वच्छ.
–लेवी–आरती ओवाळल्यानंतर तिच्यावरून हात फिरवून ते डोळ्यांवरून फिरविणे.
आरतियुं (આરતિયું) (न.)–आरतीपात्र.
आरशी (આરશી) (पु.)–(१) हत्तीच्या गंडस्थळाच्या खालचा भाग. (२) रक्षण.
आरवा (આરવા) (पु.)–मन, आत्मा, जीव.
आरवे (આરવે) (पु.)–फार खाल्ल्याने पोटाला लागलेली तडस.
आरस–पहाण (આરસ,–પહાણ) (पु.)–आरसपान, संगमरवर
–बंधी (स्त्री.)–संगमरवरी फरसबंधी.
आरसी (આરસી) (स्त्री.)–लहान आरसा.
–गरो (पु.)–आरशांचा कारागीर.
–छल्लो (पु.)–छापुं (न.)–जिच्यात कांचतुकडा किंवा लोलक बसविला आहे अशी अंगठी.
–सो (पु.)–आरसा.
आरंग (આરંગ) (न.)–शस्त्र, हत्यार.
आरंबी (આરંભી) (वि.)–उत्तम.
आरंभण (આરંભણ) (न.)–प्रारंभ.
आराधवुं (આરાધવું) (अ. क्रि.)–(१) प्रसन्न करून घेणे. (२) पूजणे, भजणे.
आराम (આરામ) [सं.] (पु.)–बगीचा.
–मिक (पु.)–माळी.
आराम (फा.) (पु.)–(१) विश्रांती (२) शांती, स्वस्थता (३) दुःखनिवृत्ती.
–थवो–आजार इ.तून बरे होणे.
–गाह (स्त्री.)–(१) विश्रांतिस्थान (२) कबर.
–दिन (पु.)–सुट्टीचा दिवस, रविवार.
आराव (આરાવ) [सं.] (पु.)–आरडा ओरडा.
आराव (–वा) ल्ला, आरावारा (આરાવ–વા–લ્લા, આરાવારા) (पु. ब. व.)–श्राद्धपक्षाचे दिवस.
आरासुर (આરાસુર) (पु.)–अरवली पर्वताच्या (आबूच्या) एका शिखराचे नाव.
–री (स्त्री.)–त्या पर्वतावरील देवी.
आरास्ते (આરાસ્તે) [फा.] (वि.)–सजविलेले, चांगली सजावट केलेले.
आरास्तगी (આરાસ્તગી) [फा.] (स्त्री.)–आरास, सजावट.
आरियां (આરિયાં) (न. ब. व.)–होडी–गलबत इ. वरील शीड उतरून ठेवण्याची क्रिया.
–करवां–कोणतीही वस्तु खाली उतरविणे.
आरियुं (આરિયું) (न.)–(१) टोपली. (२) काकडी, चिबूड. शेंदाड.
आरी (આરી) (स्त्री.)–(१) चांभाराची अरी. (२) लहान करवती.
आरीकारी (આરીકારી) (स्त्री.)–(१) चतुराई (२) डावपेच.
आरीसो (આરીસો) (पु.)–आरसा.
आरेडुं (આરેડું) (वि.)–(१) अति रडवे. (२) दंगेखोर. (३) झक्की, हट्टी.
आरेतारे (આરેતારે) (अ.)–अगदी किनाऱ्याला लागण्याच्या वेळी, शेवट येण्याच्या वेळी.
आरो (આરો) (पु.)–(१) किनारा. (२) परतीर (३) (लाक्ष.) मार्ग, सुटण्याचा उपाय.
आरे आवेलुं वहाण डूबवुं–शेवट गाठतो न गाठतो एवढ्यात नष्ट होणे, प्रयत्नांनी पुरे करीत आणलेले धुळीस मिळणे.
आरो (पु.)–(१) चाकाचा नाभीपासून परिघापर्यंतचा एक भाग, आरा. (२) गोवऱ्यांची भट्टी.
आरोगवुं (આરોગવું) (स. क्रि.)–जेवणे, खाणे.
आरोपवुं (આરોપવું) (स. क्रि.)–(१) एकाचा गुण किंवा धर्म दुसऱ्याला लावणे. (२) आळ घेणे किंवा आरोप ठेवणे. (३) घालणे, ओवणे, ठेवणे, लावणे, टाकणे. ('वरमाळा आरोपवी,' 'प्रभुमां आरोपवुं' इ.)
आरोवारो (આરોવારો) (पु.)–(१) सुटका. (२) शेवट.
आर्जव (આર્જવ) [सं.] (न.)–(१) ऋजुता, सरळपणा, निखालसपणा. (२) प्रामाणिकपणा. (३) विनवणी, आजीजी.
आर्य (આર્ય) [सं.]–(१) (वि.) सुसंस्कृत, सुधारलेला. (२) कुलीन. (३) (पु.) तसा मनुष्य.
आर्हत (આર્હત) [स.] (१) (वि.) जैन मताविषयीचे. (२) (पु.) जैनमत.
आल (આલ)–(स्त्री.) संवय.
आलण (આલણ) (न.)–कण्यांचा केलेला एक खाद्यपदार्थ, खीर
आलपाल (આલપાલ) (स्त्री.)–(१) सेवाचाकरी. (२) शुश्रूषा, संभाळ. (३) सरबराई.
आलम (આલમ) [अ.] (स्त्री.)–जग.
–गीर [फा.] (वि.)–जग जिंकणारा–री–रे.

−नूर −(१) (वि.) प्रकाशमय. (२) (न.) अतिशय प्रकाश. प्रकाशमय स्थिती.
−पनाह [फ.]−(१) (वि.) जगाचे रक्षण करणारा−री−रे, (२) (पु.) बादशहा.
आलवाल (આલવાલ) [सं.] (पु.)−आळें.
आलवुं (આલવું) (स. क्रि.)−देणें.
आलसवीलस (આલસવીલસ) (अ.)−तहानेने व्याकुळ.
आलसाल (આલસાલ) (वि.)−बरोबर सांधा न बसलेले−ढिले.
आलंबवुं (આલંબવું) (स. क्रि.)−(१) आधारून राहाणे. (२) लटकणें.
आला (આલા) [अ.] (वि.)−अति उंची, उत्तम, श्रेष्ठ.
आलापवुं (આલાપવું) (स. क्रि.)−(१) गप्पा मारणे. (२) आलाप घेऊन गाणे.
आलामत (આલામત) [अ.] (स्त्री.)−खूण, निशाणी, चिह्न.
आला(−लुं) लीलुं (આલા−લું−લીલું) (वि.)−ओले सुके.
आलांबालां (આલાંબાલાં) (न. ब. व.)−बहाणे, निमित्ते.
आलिम (આલિમ) [अ.] (वि.)−विद्वान.
आली (આલી) [अ.] (वि.)−उच्च, उंची, भव्य.
−जनाब, हजरत [फा.] (वि.)−उच्च पदवीधारी.
−जहां, −जाह [फा.] वि.−उच्च दर्जाचा−ची−चे.
−शान [फा.] (वि.)−पाहा 'आलेशान'.
आलीगारुं (આલીગારું) (वि.)−खोडकर, दंगेखोर, उचापतीखोर
आली लीली (આલીલીલી) (वि. स्त्री.)−(१) ताजी, हिरवी, (२) समृद्ध, सुपीक.
आलु (આલુ) (न.)−खोटा आळ.
आलुंचन (આલુંચન) [सं.] (न.)−डोक्याचे केस उपटून काढणे.
आलू (આલૂ) [फा.] (न.) (१) जर्दाळू. (२) बटाटा.
आले (આલે) (वि.)−(१) नजीकचे, लाडके. (२) उच्च दर्जाचे, श्रेष्ठ.
आलेख (આલેખ) [सं.] (पु.)−(१) लिखाण. (२) खतपत्र., दस्तैवज. (३) सनद. (४.) मोहोर, ('सील'). (५) 'ग्राफ' (६) चित्र.
−न (न.)−लिहिणे. (२) चित्र काढणे.
−नी (स्त्री.)−(१) कलम. (२) ब्रश.
आलेप (આલેપ) [सं.] (पु.)−लेप, मलम.
−न (न.)−लेप लावणे, मलम लावणे.
आलेशान (આલેશાન) [अ.] (वि.)−(१) प्रतिष्ठित, उत्तम. (२) भव्य, भपकेदार (३) अति मोठे.
आलोक (આલોક) [सं.] (पु.)−(१) पाहणे. (२) दर्शन, 'व्ह्यू' (३) दृष्टिमर्यादा. (४) तेज, दीप्ति.
−वुं (स. क्रि.)−पाहणे, अवलोकन करणे.
आलोच (આલોચ) [सं.] (पु.)−(१) दर्शन, पाहणे, (२) विचार, चिंतन, मनन. (३) अवलोकन, विवेचन.
आलोपालो (આલોપાલો) (पु.)−(१) झाडाची पाने−मुळे वगैरे वनस्पती. (२) पालाभाजीचा साधा आहार.
आलोयण (આલોયણ) (न.)−विचार, चिंतन. (२) दोषांची कबुली देऊन प्रायश्चित्त करण्याचा विधी (जैनांत)
आलोल (આલોલ) [सं.] (वि.)−(१) हलते, कापणारे. (२) क्षुब्ध, व्यग्र.
आव (આવ) (स्त्री.)−आवक, आयात.
आवक (આવક) (स्त्री.)−(१) येणे. (२) उत्पन्न, कमाई, प्राप्ती.
−चिठ्ठी (स्त्री.)−(१) माल पाठविल्याची रसीद, पोच, पावती. (२) बिल, बीजक.
−जावक (स्त्री.)−येणे आणि जाणे (२) जमा आणि खर्च. (३) जमाखर्चाची वही.
−वेरो (पु.)−(१) प्राप्तिकर (२) येणाऱ्या मालावरील जकात.
आवकार (આવકાર) (पु.)−स्वागत, आदरसत्कार.
−आपवो, देवो−स्वागत करणे, 'या या' म्हणणे.
−वुं (स. क्रि.) स्वागत करणे.
आवखुं (આવખું) (न.)−आयुष्य.
आवजा (स्त्री.)−ये−जा.
आवजो (આવજો) (अ.)−निरोप देतानाचा बोल, 'यावे'.
आवटवुं (આવટવું) (अ. क्रि.)−(१) निष्पन्न होणे. (२) बदलणे, फिरणे. (३) चहूबाजूंनी घेरले जाणे. (४) अस्वस्थ होणे, गोंधळून जाणे.
आवड(−त) (આવડ-ત) (स्त्री.)−अवगत असणे, कुशलता, करता येणे.
आवडत्रेवड (स्त्री.) (१) घरकामाची योग्य ती तजवीज. (२) काटकसर.
आवडवुं (આવડવું) (अ. क्रि.)−(अमुक करता) येणे, (अमुक काम) माहीत असणे, (अमुक कामाचे) गम्य असणे. (उदा. 'मने गातां आवडे छे'=मला गाता येते, 'मने भूगोल आवडे छे=मला भूगोल माहीत आहे.)
आवडुं (આવડું) (वि.)−अमुक एवढ्या आकाराचे, अमक्या-इतके, इतके.
आवतुं (આવતું) (वि.)−येते (उदा० 'आवती काल'=उद्यां, 'आवतो रविवार' इ.)
आवदानी (આવદાની) (स्त्री.)−पाहा 'आमदनी'
आवन जावन (આવનજાવન) (न.)−(१) येणेजाणे (२) जन्ममरण फेरा.
आवरकू(-खू)टो (આવરકૂ-ખૂ-ટો) (पु.)−(१) आयुर्मर्यादा संपणे, मरण. (२) लोळागोळा.

**आवरदा** (આવરદા) (पु. स्त्री. न.) – आयुर्मर्यादा, आयुष्य.
– **नुं पूरुं, – बळियुं** – पुरते आयुष्य असलेले, आयुष्याची दोरी बळकट असलेले.
– **बहु लांबी छे** – 'शंभर वर्षें आयुष्य' असें उद्‌गार.

**आवरदो** (આવરદો) (पु.) – बाहेरून आणून पाळलेला, आश्रित.

**आवरवुं** (આવરવું) (स. क्रि.) – (१) झाकणे, आच्छादणे, (२) व्यापणे (३) वेढून टाकणे.

**आवरो** (આવરો) (पु.) – (१) आवक. (२) मासिक जमाखर्चाची कीर्दवही.
– **जावरो** (पु.) – (१) ये-जा. (२) जमा आणि खर्च.

**आवरो** ('आ' चा उच्चार हकाराने) (पु.) – (आजारातून उठल्यानंतर होणारी) खा खा.

**आवर्जना** (આવર્જના) [सं.] (स्त्री.) – रिझविणे, खुशामत.

**आवर्तवुं** (આવર્તવું) (अ. क्रि.) – (१) चक्राकार – गरगर फिरणे. (२) फिरून फिरून तेच येणे. (३) (स. क्रि.) भेटणे, वेंघेत घेणे.

**आवल** (આવલ) (न.) – ताजा पिंजलेला रू, पोल.

**आवलां** (આવલાં) (न. ब. व.) – (१) व्यर्थ खटपट. (२) मोट, दोर इ. पाणी वर ओढण्याची साधने.

**आववुं** (આવવું) (अ. क्रि.) – (१) येणे. (२) असणे. (उदा. 'पूना महाराष्ट्रमां आव्युं'.)

**आवी चडवुं** – एकदम – अनपेक्षित येणे.

**आवी चूकवुं, – रहेवुं** – (१) पुरे होणे, संपणे, (२) कमी पडणे.

**आवी जवुं** – (१) उभ्या उभ्या येऊन परत जाणे, खेप टाकून जाणे. (२) येऊन पोचणे. (३) सामावून जाणे. (४) भांडायला उठणे.

**आवी पडवुं** – अनपेक्षित अंगावर येऊन पडणे.

**(-नु)आवी बनवुं** – चे मरण ओढवणे.

**आवी मळवुं** – एकदम येऊन मिळणे किंवा प्राप्त होणे.

**आवश्य** (આવશ્ય) (सं.) – (वि.) (१) अगत्याचे, अनिवार्य (२) (स्त्री. न.) अगत्य, अनिवार्य वस्तू किंवा क्रिया.

**आवळगोवळ** (આવળગોવળ) (स्त्री.) – बाळगोपाळ, परिवार.

**आवळियो** (આવળિયો) (पु.) – (१) मनातली इच्छा. (२) आवळ्याचे झाड.

**आवागमन** (આવાગમન) (न.) (१) येणे-जाणे. (२) जन्मणे आणि मरणे.

**आ वार** (આ વાર (अ.) – या वेळी, या खेपेस.

**आवास** (આવાસ) [सं.] (पु.) – (१) घर, निवासस्थान, (२) घराचे दालन, खोली.

**आविष्ट** (આવિષ્ટ) [सं.] (वि.) – (१) शिरलेले, प्रविष्ट. (२) भुताने झपाटलेले (३) आवेशयुक्त.

**आवुं** (આવું) (वि.) – यासारखे, या प्रकारचे.
– **क** (वि.) – अशासारखे काहीसे.

**आवृत** (આવૃત) [सं.] (वि.) – (१) व्यापलेले. (२) आवरण घातलेले, झाकलेले (३) वेढलेले.

**आवेग** (આવેગ) [सं.] (पु.) – (१) जोस, भावनेचा वेग. (२) क्षोभ, आवेश (३) अधीरपणा.

**आवेशी** (આવેશી) (वि.) – आवेश असलेले.

**आश** (આશ) (स्त्री.) – (१) आशा. (२) आशिष.

**आशक** (આશક) (पु. स्त्री. न.) – (१) प्रेमी. (२) (वि.) मोहित, फिदा, आषक.
– **माशूक** (न. ब. व.) – आषुकमाषुक.

**आश(-स)का** (આશ-સ-કા) (स्त्री.) – आरती, भस्म इ. घेणे.

**आशकार(-रा)** (આશકાર,-રા) [फा.] (वि.) – प्रकट, उघड, जाहीर.

**आशटवुं** (આશટવું) (सं. क्रि.) – पाहा 'आछटवुं', आपटणे.

**आशना** (આશના) [फा.] – (१) (पु.) भाईबंद. (२) प्रियकर. (३) (स्त्री.) प्रिया.

**आशरवुं** (આશરવું) (स. क्रि.) – आसरा घेणे.

**आशरो** (આશરો) (पु.) – (१) आसरा, छत्रछाया (२) आधार, आलंबन. (३) अंदाज.
**आशरे बेसवुं, – रहेवुं** – भरंवसा ठेवून निश्चित राहणे, आधारावर विसंबून राहणे.
**आशरो काढवो** – अंदाज काढणे.

**आशरागत, – तियुं, – ती** (આશરાગત) (वि.) – आसऱ्याला आलेले.

**आशरापडतुं** (આશરાપડતું) (वि.) – अंदाजाप्रमाणे असलेले.

**आशरे** (આશરે) (अ.) – अंदाजे, सुमारे.

**आशंकावुं** (આશંકાવું) (अ. क्रि.) – शंका येणे, संशय वाटणे.

**आशा** (આશા) [सं.] (स्त्री.) – (१) उमेद, इच्छा. (२) विश्वास, आस्था.
– **आपवी, – देवी** इच्छा सफळ होईल असा विश्वास देणे, आशा दाखवणे.
– **पडवी** – आशा सफळ होण्याला कारण मिळणे, विश्वास – संभव वाटणे, आशा वाटणे.
– **बांधवी,-राखवी,-सेववी** – अपेक्षा बाळगणे.
– **करवी** – इच्छा करणे.
– **दर्शी** (वि.) – आशावादी.
– **पूरी** (वि. स्त्री.) – (१) आशा पुरी करणारी, (२) (स्त्री.) आशापूर्ती करणारी देवी.
– **बंध** – (पु.) (१) आशेचा तंतू. (२) विश्वास. (३) (वि.) आशावादी. (४) विश्वास करणारे.

-वंधुं (वि.)-आशा असलेला-ली-ले.
-भर्युं (वि.)-आशायुक्त.
आशिका (આશિકા) (स्त्री.)-साधूचा, देवाचा किंवा यज्ञाच्या रक्षेचा अंगारा.
आशीनीशी (આશીનીશી) (अ.) - मन मानेल तसे.
आशूरा (આશૂરા) [अ.] (पु.)-ताबूत बुडविण्याचा दिवस, आलावा.
आसन (આસન) [सं.] (न.)-(१) बसण्याची जागा. (२) बसण्याची, झोपण्याची किंवा उभे राहण्याची ढब. (३) आसन, बस्कुर (४) पुस्तकात किंवा पत्रकात पाडलेले कोष्टक, खाना.
-वाळवुं-बैठक मारणे.
-राखवुं-स्थान किंवा मुक्काम चालू राहील असे करणे.
-मांडवुं-(१) अड्डा जमवून बसणे. (२) आसन-बैठक-बरोबर घालणे.
-ओछुं न होवुं-बहु होवुं-तक्रार करण्याजोगी लक्षणे असणे.
आसनियुं (આસનિયું) (न.)-बसण्याची बैठक.
आसनी (આસની) (स्त्री.)-बस्कुर.
आसनावासना (આસનાવાસના) (स्त्री.)-(१) आश्वासन. (२) सरबराई, आदरसत्कार.
आसन्न (આસન્ન) [सं.] (वि.)-जवळ आलेले.
-काल(-ळ) (पु.)-मरणकाळ.
आसमान (આસમાન) [फा.] (न.)-आकाश.
-पर चडवुं-गर्वाने खूप फुगणे.
सातमा आसमानपर चडवुं-कमालीचे गर्वाने फुगून जाणे
आसमानी (આસમાની) (वि.) (१)-अस्मानी रंगाचा-ची-चे (२) दैवी, नैसर्गिक (३) (स्त्री.) दैवी आपत्ती-कोप.
-सुलतानी (स्त्री.)-(१) चढती-पडती (२) अनपेक्षित किंवा दैवी आपत्ती.
आसमास (આસમાસ) (अ.)-(१) जवळ (२) जाणूनबुजून.
आसरडवुं (આસરડવું) (स. क्रि.)-मचमच करीत खाणे.
आसवतुं (આસવતું)-(१) (वि.) कामात मग्न असणारे, कामात गुंतलेले. (२) (न.) काम.
आसंग (આસંગ) [सं.] (पु.)-(१) आसक्ती. (२) समागम, संभोग. (३) कर्तृत्वाभिमान.
आसाएश (આસાએશ) (स्त्री.)-आराम, विश्रांती.
आसान (આસાન) [फा.] (वि.)-सोपे, सहज, मऊ.
-कैद (स्त्री.)-साधी कैद.
-नी (स्त्री.)-सोपेपणा.
आसामी (આસામી) (पु. स्त्री.)-(१) मनुष्य, व्यक्ती (२) ऋणको, कूळ. (३) पैसेवाला-प्रतिष्ठित मनुष्य. (४) गिऱ्हाईक, अशील.
-वार-माणसागणिक
आसूदा(-दुं) (આસૂદા,-દું) [फा.] (वि.)-निश्चित, सुखी.
आसेध (આસેધ) [सं.] (पु.)-अटक, कैद.
आसेब (આસેબ) [फा.] (न.)-भूतप्रेत.
आसोपालव (આસોપાલવ) (पु.)-अशोक वृक्ष.
आस्तर (આસ્તર) (पु.),-ण (न.)-(१) अंथरणें, पसरणें. (२) बिछायत, गालीचा (३) चादर (४) पांघरूण.
आस्ते (આસ્તે) (अ.)- सावकाश, धीमे.
-रहीने-(१) सावकाशीने, आस्ते आस्ते (२) हळूच, अलगद.
आस्था (આસ્થા) [सं.] (स्त्री.)-(१) आदर, मान. (२) श्रद्धा, विश्वास (३) भांडवल, पुंजी.
-बेसवी-श्रद्धा किंवा विश्वास बसणे.
-ऊठवी-श्रद्धा किंवा विश्वास उडणे.
आस्थिक (આસ્થિક) (वि.)-आस्था असलेला-ली ले.
आस्थानमंडप (આસ્થાનમંડપ) [सं.] (पु.)-सभामंडप.
आस्रव (આસ્રવ) [सं.] (पु.)-(१) दुःख, पीडा. (२) स्राव. (३) (जैन दर्शन) कर्म आत्म्यात प्रविष्ट होणे किंवा ते झाल्यामुळे होणारी पापप्रवृत्ती.
आस्वादवुं (આસ્વાદવું) (स. क्रि.)-(१) चाखणे, स्वाद घेणे. (२) भोगणे.
आह (આહ)-(१) (स्त्री.) हाय, निसासा (२) (अ.) अरे, ओ! (दुःखोद्गार)
-भरवी-निसासा टाकणे, हाय भरणे.
आहरडवुं (આહરડવું) (स. क्रि.)-उरकणे.
आहारी (આહારી) (वि.)-(१) आहार करणारा. (२) खादाड.
आहीर (આહીર) (पु.)-(१) गवळी-भरवाड जात. (२) त्या जातीचा पुरुष.
-डी,-ण,-णी,-राणी- (स्त्री.)-आहीर जातीची स्त्री.
आहुति लेवी (આહુતિ લેવી)-(१) नैवेद्य किंवा बलिदान घेणे. (२) पचनी पाडणे.
-लईने ऊभा रहेवुं-वाईट करण्याची किंवा नाश करण्याची संधी पाहात राहणे.
आहूत (આહૂત) ]सं.] (वि.)-निमंत्रित.
आहेडी (આહેડી) (पु.)-शिकारी, पारधी, भिल्ल.
आहोड (આહોડ) (स्त्री.)-(१) नुकतीच लागवडीला आणलेली जमीन (२) ताजी पेरणी.

आहोतुं (આહોતું) (न.) – (१) दैनिक क्रिया, रोजचे काम. (२) खुशामत.
आह्निक (આહ્નિક) [सं.] – (१) (वि.) दैनिक (२) (न.) नित्यकर्म.
आळ (આળ) (स्त्री.) – दंगामस्ती, खोडकरपणा.
आळ (આળ) (न.) – (१) खोटा आरोप (२) खोटेनाटे.
– ऊतरवुं – कलंक नाहीसा होणे, आरोप खोटा ठरणे.
– चडवुं, – चोटवुं, – बेसवुं – बट्टा लागणे, आरोप येणे.
– मूकवुं – आळ घालणे.
आळपंपाळ (वि.) – (१) मिथ्या (२) खोटेनाटे, वेडेवाकडे (३) फूस लावणारे (४) (न.) आश्वासन (५) भुतेखेते
आळवण (આળવણ) (वि.) – बट्टा, बदनामी.
आळवाळ (આળવાળ) (पु. न.) – आळे
आळवीतरुं (આળવીતરું) (वि.) – मस्तीखोर, दांडगट.
– राई (स्त्री.) – दांडगटपणा, मस्तीखोरी.
आळवीतुं (આળવીતું) (वि.) – पाहा 'आळवीतरुं'
आळस (આળસ) (स्त्री. न.) – आळस, ऐदीपणा, सुस्ती.
– खावी(– वुं) – आळसुटलेपणाने पडून राहणे.
– मरडवी – आळस देणे, आळोखेपिळोखे देणे.
– वुं (अ. क्रि.) – (१) आळस करणे, मंद किंवा सुस्त होणे (२) बंद पडणें, अटकणे.
– नो पीर – भयंकर आळशी माणूस.
आळसु (वि.) – आळशी, सुस्त
आळालुंबो (આળાલુંબો) (पु.) – संसाराची लालसा – तृष्णा.
आळियो (આળિયો) (पु.), – युं (न.) – कोनाडा (विशेषतः विहिरीमोवतालच्या भिंतीतील).
आळी (આળી) (स्त्री.) – सोनाराची शेगडी ठेवण्याचा उंच ओटा.
आळीगाळुं (આળીગાળું) (वि.) – खोडकर, दंगेखोर.
आळुं (આળું) (वि.) – (१) हिरवेचार, ओले (२) ताजे सोलून काढलेले (कातडे) (३) नाजूक (जरा हात लावताच दुखेल असे) (४) मऊ.
आळुंभोळुं (આળુંભોળું) – (वि.) भोळेभाबडे, निष्पाप (२) (न.) बालक.
आळोटवुं (આળોટવું) (म. क्रि.) – लोळणे.
– ण – (१) (वि.) लोळण्याची सवय असलेले (२) (न.) लोळण्याची इच्छा, लोळण.

## इ (ઇ)

इकबाल (ઇકબાલ) [अ.] (न.) – (१) नशीब (२) सद्भाग्य.
इकरार (ઇકરાર) [अ.] (पु.) – (१) मान्यता, कबुली (२) कैफियत; प्रतिज्ञापूर्वक सांगितलेला किंवा लिहून दिलेला मजकूर.
– नामुं [फा.] (न.) – प्रतिज्ञापूर्वक सांगितलेला मजकूर ('ॲफिडेव्हिट').
इकोतेर कुळ तरवां – बेचाळीस कुळांचा उद्धार होणे.
इखलाक (ઇખલાક) [अ.] (पु.) – विनय, सभ्यता.
इ(-ए) खलास (ઇ-એ-ખલાસ) [अ.] (पु.) – गट्टी, दोस्ती.
इख्तेसार (ઇખ્તેસાર) [अ.] (पु.) – संक्षेप, सार.
इंगार(-रो) (ઈંગાર,-રો) (पु.) – अंगार, निखारा, इंगळ.
इंचावुं (ઇચાવું) (अ. क्रि.), – ववुं (स. क्रि.) – ठासून खाल्ले जाणे, ठासून खायला लावणे. ('ईचवुं' ची अनुक्रमे कर्मणी व प्रयोजक रूपे).
इच्छवुं (ઇચ્છવું) (स. क्रि.) – (१) इच्छिणे. (२) आशा बाळगणे. (३) मागणे.
इच्छनधारा (ઇચ્છનધારા) (स्त्री.) – संतत धार, सतत प्रवाह. (२) अभिषेकपात्र.
इच्छामां आववुं (ઇચ્છામાં આવવું) – इच्छा होणे, आवडणे, पसंत पडणे.
इच्छाभेदी (ઇચ્છાભેદી) – सडकून जुलाब करणारी औषधि.
इजन (ઇજન) – निमंत्रण, आमंत्रण.
इजनेर (ઇજનેર) (पु.) – एन्जीनिअर.
– री (स्त्री.) – एन्जीनिअरचे काम किंवा विद्या.
इजलास (ઇજલાસ) [अ.] (स्त्री.) – सभा, बैठक, अधिवेशन.
इजाजत (ઇજાજત) [अ.] (स्त्री.) – परवानगी.
इजाफत (ઇજાફત) [अ.] (स्त्री.) – (१) समावेश. (२) खालसा करणे, जोडणे.
– गाम (न.) – इनामी गाव किंवा वतन.
इजारवुं (ઇજારવું) (अ. क्रि.) – दुःख–संताप करणे, दुःखी होणे.
इजारो (ઇજારો) [अ.] (पु.) – (१) मक्ता, हक्काची सनद, करार. (२) ठेका.
इजारदार (ઇજારદાર) (वि.) – तसा हक्क असणारा. (२) ठेकेदार.
– दारी (स्त्री.) – ठेकेदाराचे काम.
इज्जत (ઇજ્જત) [अ.] (स्त्री.) – (१) अब्रू, प्रतिष्ठा. (२) स्त्रीचे पावित्र्य.
– आपवी, – करवी – मान देणे, प्रतिष्ठा वाढविणे.
– जवी, – ना कांकरा थवा, – प्रतिष्ठा नाहीशी होणे.

**कसमोडा** (કસમોડા) (पु. ब. व.) – (१) आळोखेपिळोखे द्यावेसे वाटणे (२) प्रसवाच्या वेळी अंग दुखू लागणे - मोडून येणे व वेण यायला लागणे.
  **–खावा** – (१) अंग मोडावेसे वाटणे (२) रागावणे, रुसणे.
  **–वुं** (अ. क्रि.) – अंग मोडावेसे वाटणे.
  **–डुं** (वि.) – चिडके, तेडेखोर.
**कसर** (કસર) (स्त्री.) – (१) उणीव, कमतरता, न्यूनता (२) कच्चेपणा, अपूर्णता (३) चूक (४) काटकसर (५) नुकसान.
  **–आपवी** – बिल चुकविताना थोडी सूट देणे.
  **–करवी** – (१) काटकसर करणे (२) कमी करणे.
  **–राखवी** – कमतरता - न्यूनता ठेवणे.
  **–काढवी** – भरपायी करून घेणे, उट्टे काढणे.
  **–रियुं** (न.) – काटकसरी.
**कसरत** (કસરત) (स्त्री.) – (१) व्यायाम (२) अभ्यास, तालीम.
  **–आपवी** – व्यायाम देणे.
  **–बाज** (पु.) – व्यायामाचा शोकीन.
  **–तियुं, –ती** (वि.) – व्यायाम करणारे.
**कसरावुं** (કસરાવું) (अ. क्रि.) – कसर (ताप) येतोसे वाटणे, कसकस वाटणे.
**कसली** (કસલી) (स्त्री.) – कळशी.
**कसलुं** (કસલું) (न.) – कणीस.
**कस(-सु)-वाण** (કસ-સુ-વાણ) (स्त्री.) – आजारीपण, अस्वस्थता.
**कसवुं** (કસવું) (स. क्रि.) – (१) आवळणे (२) कसोटी घेणे (३) खूप कष्ट देणे, पिळणे (४) त्रास देणे, सतावणे (५) कमी करून देण्याचा प्रयत्न करणे.
**कसीने आपवुं - लेवुं** – भावतोल वगैरे बाबतीत फार चिकित्सेने देणे - घेणे.
  **–काम लेवुं** – कसून काम करून घेणे, रगडून काम घेणे.
  **–काम पाडवुं** – कसोटी घेतल्यानंतर काम सांगणे.
**कसाकस,(-सी)** (કસાકસ-સી) (स्त्री.) – चढाओढ, चुरस, ओढाओढ.
**कसाणुं** (કસાણું) (वि.) – कळकट, बेचव.
**कसायेलुं** (કસાયેલું) (वि.) – (१) वाकबगार, अनुभवी, कसलेले. (२) कळकट.
**कसीदो** (કસીદો) (पु.) – (१) कशिदा (२) स्तुतीकरिता लिहिलेले काव्य.
**कसुतर(-रुं)** (કસુતર-રું) (वि.) – (१) कठीण, सुगम नसलेले (२) बिघडून गेलेले (३) वाकडे.
**कसुवाण** (કસુવાણ) (स्त्री.) – आजारीपण.
**कसुवावड** (કસુવાવડ) (स्त्री.) – अकाली गर्भपात.
**कसुं(-सूं)-बी** (કસુંબી) (वि.) – (१) कुसुंब्याच्या फुलासारखे, लाल. (२) (स्त्री.) कुसुंब्याच्या फुलाचा रंग, (३) कुसुंब्याचे बी.
  **–बगर** (पु.) – कुसुंबी रंग देणारा.
  **–बल,(-लुं)** (वि.) – कुसुंबी रंगाचे, लाल.
**कसुंबो** (કસુંબો) (पु.) – कुसुंबा (२) कुसुंब्याच्या फुलाचा रंग (३) त्या रंगाचा कपडा (४) पाण्यात घोटलेली अफू किंवा त्यानिमित्त जमणारी मंडळी.
**कसुंबा पाणी करवां, कसुंबो करवो** – (१) अफू घोटून (लग्न इ. प्रसंगी) एकमेकांला पाजणे. (२) लग्नाचा मेळावा करणे.
**कसुंबो गाळवो, - घोळवो** – अफू भिजवून रस करणे.
  **–चढवो** – अफूची धुंदी चढणे.
  **–काढवो, - गाळवो** – कुसुंब्याच्या फुलांचा रंग काढणे.
  **–चढाववो, - देवो, - मूकवो** – कुसुंब्याचा लाल रंग चढविणे.
  **–पीवो** – कुसुंब्याचे पाणी पिणे. (नशा चढण्यासाठी)
**कसूझ** (કસુઝ) (स्त्री.) – अयोग्य - खोटी समजूत.
**कसूर** (કસૂર) [अ.] (स्त्री.) – चूकभूल, दोष, अपराध-गुन्हा.
  **–दार** (वि.) – चूक करणारा-री-रे.
**कसोज(-जुं)** (કસોજ-જું) (वि.) – बिघडलेले.
**कसोजण** (કસોજણ) (स.) – झाडून टाकताना पडणारा कचरा.
**कसोटीए चडाववुं, कसोटीमां लेवुं** – कसोटीला लावणे, तावणे - सुलाखणे.
**कसोटीमां ऊतरवुं** – कसोटी करून घ्यायला तत्पर असणे, कसोटीत दाखल होणे.
**कस्तर** (કસ્તર) (न.) – कस्पट, धूळकण, कचरा. (२) कासार लोक भांड्यावर जोड करताना जो लेप लावतात तो.
**कस्ती** (કસ્તી) [फा.] (स्त्री.) – पारशांचे जानवे, किंवा ते देण्याचा संस्कार.
  **–करवी** – मंत्र म्हणून अपवित्रता दूर करणे (पारशांचा पूजाविधी).
  **–आपवी, - देवी** – कस्ती अंगात घालायला लावण्याचा संस्कार करणे.
**कहान(-नो)** (કહાન-નો) (पु.) – कृष्ण.
**कहार** (કહાર) [अ.] (वि.) – निष्ठुर, क्रूर.
**कहार** (पु.) – भोई, मेणा - पालखी उचलून नेणारा.
**कहाववुं** (કહાવવું) (सं. क्रि.) – (१) सांगायला लावणे (२) निरोप पाठविणे.
**कहीं** (કહીં) (अ.) – कुठे (प्रश्नार्थक).
  **–क** (अ.) – कुठेतरी.
  **–कहीं** (अ.) – कुठे कुठे.
**कहेण(-णुं)** (કહેણ-ણું) (न.) – संदेश, निरोप, सांगावा. (२) हुकूम (३) वचन, बोल. (४) निमंत्रण.

–मोकलवुं–सांगावा पाठविणे.
–णी (स्त्री.)–(१) म्हण (२) सांगण्याची शैली. (३) कहाणी (४) लोकापवाद.
–ती (स्त्री.)–(१) म्हण (२) कहाणी (३) लोकापवाद, आक्षेप.
कहेवडा(-रा)ववुं (કહેવડાવવું) (सं. क्रि.)–सांगायला लावणे.
कहेवत (કહેવત) (स्त्री.)–(१) म्हण, लोकोक्ती (२) दृष्टांत, उखाणा.
कहेवराम(-व)ण (કહેવરામણ) (न.)–बोलून दाखवायला लागावे असे असणे, दोष, बदनामी.
कहेवुं (કહેવું) (सं क्रि.)–(१) बोलणे, सांगणे (२) समजाविणे (३) उपदेश-शिकवण देणे (४) आज्ञा करणे (५) ठपका देणे (६) नावे ठेवणे.
कही आपवुं–लगेच परिणाम होणे (२) गुप्त गोष्ट किंवा भविष्य सांगणे.
–छूटवुं–सांगून मोकळे होणे.
–देवुं–गुप्त गोष्ट उघड करणे.
–बतावववुं,-संभळाववुं–पूर्वजांची गोष्ट किंवा ऋण सांगून चार शब्द सुनावणे.
कह्यागरुं (કહ્યાગરું) (वि.)–(१) सांगितलेले करणारे, आज्ञांकित (२) सांगकामे.
कह्युं (કહ્યું)–(१) सांगितलेले ते, वचन, शिकवण, आज्ञा.
–पाळवुं–बोललेले वचन पाळणे.
–मानवुं–शिकवणीप्रमाणे किंवा आज्ञेप्रमाणे वागणे.
कह्यामां रहेवुं–कह्यात राहणे, मानणे, ऐकणे.
कळ मारवी,-वासवी–किल्ली किंवा चाप फिरवून बंद करणे.
कळ आववी,-चडवी–कळ निघणे, त्यामुळे घेरी येणे.
–खाईने–चक्कर किंवा मूर्छा येऊन, कळ येईल अशा रीतीने.
–खाईने पडवुं,-रोवुं–खूप रडणे.
–खाईने हसवुं–खूप हसणे.
–ऊतरवी,-बेसवी–कळ कमी होणे, आराम वाटणे.
कळ (કળ) (पु.)–बारीक चिकट गाळासारखा चिखल, रुतून जाण्यासारखी जमीन, दलदल.
कळ (स्त्री.)–अटकळ, समज.
कळकळ (કળકળ) (स्त्री.)–(१) कलकलाट (१) डोकेफोड (३) आरडाओरड (४) कासाविशी.
–ळाट } (पु.)–रडारड, बोंबाबोंब.
–ळाण }
कळछा (કળછા) (स्त्री.)–बेबनाव, झगडा.
कळज(-जु)-ग (કળજુગ) (पु.)–कलियुग.
–बेसवो,-आववो–माणसांच्या वृत्ती पापी-अधर्मी बनणे.
कळण (કળણ) (न.)–(१) दलदलीची-पाय ठेवताच रुतेल अशी जमीन (२) कळणे, समज.
–णा (स्त्री.)–समज, ज्ञान.
–तर (न.)–(१) कळा, वेदना. (२) अंदाज, अटकळ, हिशेब (३) मोटेचे साधन (चाक, दोर इ.)
–तरु (पु.)–पिकाचा अंदाज काढणांरा माणूस.
–ताणुं (न.)–(१) पिकाचा अंदाज काढण्याचा मेहेनताना. आणेवारीच्या वेळी कमी पीक झालेले पाहून शेतकऱ्याला मिळणारी सूट.
कळथी (કળથી) (स्त्री.)–कुळीथ.
कळपवुं (કળપવું) (स. क्रि.)–(१) मेलेल्याच्या नावाने संकल्प करून दान देणे. (२) कोळपणे. (३) (अ. क्रि.) कामाला-उपयोगाला येणे. (४) झुरणे, रडणे.
कळपी (કળપી) (स्त्री.)–खुरपे.
कळब (કળબ) (स्त्री.)–कोळपणीचे हत्यार.
–वुं (स. क्रि.)–कोळपणी करणे.
कळवळ (કળવળ) (स्त्री.)–(१) कलकलाट, गोंगाट (२) डावपेंच.
–वुं (अ. क्रि.)–कलकलाट करणे.
कळविकळ (કળવિકળ) (स्त्री.)–(१) युक्ति, हिकमत (२) युक्तायुक्त विचार (३) आराम, शांती (४) समज.
कळवुं (કળવું) (स. क्रि.)–(१) समजणे (२) कल्पिणे, अंदाज करणे, हिशेब काढणे (३) (अ. क्रि.) कळा-वेदना येणे चिखलात रुतणे.
कळी जवुं (કળી જવું)–(१) जाणणे, समजणे (२) चिखलात रुतणे.
कळश (કળશ) (पु.)–(१) कळशी (२) कळस.
–चडाववो–कळस चढविणे (लाक्ष.)
कळशे(-शिये)-जवुं–शौचाला जाणे.
कळश(-स)-ली (કલશલી) (स्त्री.)–लोटी, लहान कळशी.
कळशियो (કળશિયો) (पु.)–(१) लोटा (२) शौचाचा रोग.
कळशो (કળશો) (पु.)–लोटा.
कळशी (કળશી) (स्त्री.)–सोळा (कच्च्या) मणांचे माप.
कळहीण (કળહીણ) (वि.)–(१) कलाहीन (२) कळ (चाप) नसलेले (३) कुळहीन.
कळळवुं (કળળવું) (अ. क्रि.)–मोठ्याने ओरडणे.
कळा (કળા) (स्त्री.)–(१) कला (२) (मोराचा) पिसारा.
–करवी–(१) युक्ति किंवा इलाज करणे. (२) आरास-सुंदर मांडामांड करणे. (३) मोराने पंख उभे करून चंद्राकार पसरणे.

–पाडवी–शरीराची कांती किंवा रूप काढून टाकणे किंवा (वेष पालटून) झाकणे.
–कर (पु.)–मोर.
कळाई (કળાઈ) (स्त्री.)–कोपरापासून मनगटापर्यंतचा हाताचा भाग
कळाण (કળાણ) (न.)–(१) चिखलाची-दलदलीची जागा (२) आकलन
कळापो (કળાપો) (पु.)–(१) रडारड (२) कळ, क्लेश, पीडा
कळावुं (કળાવું) (अ. क्रि.)–अनुभवाला येणे, प्रतीत होणे, दिसून येणे, वाटणे.
कळियुं (કળિયું) (वि.)–कुलवान.
–यो (पु.)–कुलवान पुरुष.
कळियो (કળિયો) (पु.)–(१) फळाचे कठीण बीज, आठोळी (२) कळा, पोटरी (ज्यातून फूल व फळ निघते अशी फूट) (३) डाळिंबाचा दाणा.
कळुंडुं(-डु) (કળુંડું) (वि.)–गढूळ.
कळेकळे, कळेवळे (કળેકળે, કળેવળે) (अ.)–युक्तिप्रयुक्तीने, समजुतीने.
कळो (કળો) (पु.)–(१) कळ, क्लेश. (२) आवेश, झणकारा.
कळोई (કળોઈ) (वि.)–(१) गाढ संबंध असणारे (२) (न.) संबंधी.
कळोटी(-ठी) (કળોટી) (स्त्री.)–रांगोळी.
कां (કાં) (अ.)–कां, कोणत्या कारणाने, कशाकरिता (२) किंवा
–के, -जे (अ.)–कारण कीं.
–तो (अ.)–अथवा.
कांई, -क (કાંઈ-ક)–काही, काही ना काही.
कांकरी (કાંકરી) (न. स्त्री.)–(१) बारीक खडा (२) रेती.
–राळुं, -रियुं (वि.)–बारीक रेती किंवा खडे असलेले.
–रियाळुं (वि.)–(१) रेती किंवा बारीक खडे असलेले (२) बोचण्याजोगे.
–रो (पु.)–(१) बारीक खडा (२) काटा, विघ्न (३) शंका, संशय, खटका.
कांकरा पडवा–अंगावर दगड पडणे, जाहीर रीत्या निषेध होणे.
कांकरो काडवो–बाजूला होणे, दूर होणे, अडचण बाजूला करणे.
–काढी नाखवो–(१) मनातला संशय काढून टाकणे, (२) अडचण दूर करणे (३) मनात न घेणे.
–खूंचवो–मनात सलत राहणे.
काइदे आझम (કાઇદે આઝમ) [फा.] (पु.)–महान् नेता.
काई (કાઈ) (स्त्री.)–(१) शरीर, काया (२) पातळ थर, आच्छादन.
काईल (કાઈલ) (स्त्री.)–काहील.
काउ (કાઉ) (पु.)–कावळा.
काउवा(-का)उ (કાઉવાઉ) (अ.)–कावकाव (लाक्ष.)
काकडी (કાકડી) (स्त्री.)–(१) वाळूक, काकडी (२) काकडा (पेटविण्याचा.)
–डो (पु.)–(१) चिंध्यांचा बनविलेला पलिता, काकडा. (२) पडजीभ.
काकडा उतारवा–जळता काकडा फिरवून भूत उतरविणे.
काकडा नाखवा–चकणे (खेळताना),
काकभ (કાકભ) (पु.)–काकवी, राब.
काकर (કાકર) (पु.)–(१) दात (२) हत्तीचा किंवा रानडुकराचा दात (३) करवतीचा दात (४) कातडीला पडलेली कठीण भेग (५) आठोळी (६) बारीक खडा.
–डी (स्त्री.)–अतिशय बारीक दातांची ओळ.
–णी (स्त्री.)–कानस.
–वुं (स. क्रि.)–(१) करवतीला धार करणे (२) चिथावणे, (३) कुरतडत खाणे.
–री (स्त्री.)–बारीक बारीक दातांची ओळ.
काकर (કાકર) (स्त्री)–हातपिंजणाची तात ज्यावर 'थर्र' करून आपटते ती कच्च्या चामड्याची पट्टी.
काकलिया (કાકલિયા) (पु. ब. व.)–देवी, फोड्या.
काकलूदी (કાકલૂદી) (स्त्री.)–काकुळत.
–वेडा (पु. ब. व.)–काकुळतीचे वर्तन.
काकापुरी (કાકાપુરી) (वि.)–(१) तकलुपी (२) जारज (३) (पु.) गुलाम.
काकाबळिया (કાકાબળિયા) (पु. ब. व.)–फोड्या.
काका मामा करवा–खुशामत-तातापुता करणे.
काखली (કાખલી) (स्त्री.)–काख.
काखमां राखवुं-लेवुं–आपल्या बगलेत ठेवणे, पक्षात घेणे.
काखली फूटवी / काखलीमां दूध आववुं }–आनंदाच्या उकळ्या फुटणे.
काखुं (કાખું) (पु.)–काखेतले केस.
काखा (કાખા) (स्त्री.)–विघ्न, हरकत (डाव्यात प्रतिपक्ष्याला हरविण्याकरिता आणलेली)
काग (કાગ) (पु.)–कावळा.
–नुं पींछ थवुं / –नो वाघ करवो }–पराचा कावळा करणे.
–नुं बेसवुं ने ताडनुं पडवुं–कावळा बसायला न् डहाळी मोडायला गाठ.
–ने डोळे राह जोवी–खूप आतुरतेने वाट पाहणे.
–डोळ (वि.)–कुरूप.
–डोळियुं–(१) (वि.) एकाक्ष (२) (न.) एक रेचक वनस्पती.

–ण (स्त्री.)–कावळ्याची मादी.
–विद्या (स्त्री.)–पशुपक्ष्यांची भाषा समजण्याची विद्या.
कागानींद्र (કાગાનીંદ્ર) (स्त्री.)–कावळ्यासारखी (झट्कन् उडून जाणारी) झोप, सावध झोप.
कागारोळ (કાગારોળ) (पु.)–कावकाव, गदारोळ.
कागज-ळ (કાગજ-ળ) (पु.)–(१) कागद (२) पत्र, पत्रिका.
कागडो (કાગડો) (पु.)–कावळा.
–डा ऊडवा–(१) निर्धन-खंक होणे (२) निःसंतान होणे.
–डा ककळवा–सत्यानाश होऊ पहाणे.
–डानी कोटे रतन–अपात्री दान, अयोग्य-न शोभणारा संयोग.
–डानी कोटे कंकोतरी–पोटात गोष्ट न राहणे.
–डानी नजरे जोवुं–खूप सावध राहणे.
–डो दहींथरुं लई गयो–चांगली वस्तू वाइटाच्या हाती गेली.
–डा कामडी (स्त्री.)–(१) इतराजी, अवकृपा (२) अविश्वास.
–डा साणशी(-सी) (स्त्री.)–मूस पकडण्याची सांडशी.
कागडियो (કાગડિયો) (पु.)–पतंग.
कागळ नाखवो–पत्र टपालात टाकणे.
–फोडवो–(१) पाकीट फोडणे. (२) दुसऱ्याचे पाकीट फोडून आतला मजकूर चोरून वाचणे.
–बीडवो–लिहिलेले पत्र पाकिटात घालून बंद करणे, बंद करून टपालात टाकणे.
–मागवो,–लाववो–शिफारस-ओळख-पत्र मागणे किंवा आणणे.
–लखवो–पत्र लिहून समाचार कळविणे.
–दाबणियुं (न.)–'पेपरवेट'
कागळियुं (કાગળિયું) (न.)–(१) कपटा (२) चलनी नोट, हुंडी वगैरेसारखा रोकड मिळवून देणारा कागद.
–यां करवां–पत्रव्यवहार करणे.
–ये चडवुं–(१) अंतराळी मरणे (२) जाहिरात होणे (३) कोर्टात जाणे (४) लिखापढीतच गुंतून जाणे.
–ळियो (पु.)–पत्र घेऊन जाणारा जासूद.
कांगडुं (કાંગડું) (न.)–गणंग, डोळ.
कांगणियुं (કાંગણિયું) (न.)–एक प्रकारचा सुताडा.
कांगरवुं (કાંગરવું) (अ. क्रि.)–रागावणे.
कांगरी (કાંગરી) (स्त्री.)–(१) दात्यांसारखी ओळ किंवा वेलबुट्टी (२) कोर, धार.
कांगरो (કાંગરો) (पु.)–कंगुरा. (२) शिखर (३) भरतकामातील एक वेलबुट्टी-तऱ्हा.
–रादार (वि.)–कंगुरेदार.

कांगुं (કાંગું), कांगलुं (કાંગલું) } (वि.)–(१) दीनदुबळे, गरीब (२) रडके.
काच (કાચ) [सं.] (पु.)–(१) काच (२) आरसा.
काचकी (કાચકી) (स्त्री.)–(१) एक वनस्पती (२) गळ्याच्या द्वाराजवळ होणारा एक रोग. (३) अडचण.
काचड (કાચડ) (स्त्री.)–गळवाच्या आजूबाजूला सुजलेला भाग
काचबो (કાચબો) (पु.)–नर कासव.
–बी (स्त्री.)–मादी कासव.
काचबानी आंखे जोवुं–तीक्ष्ण किंवा मत्सरी नजरेने पाहणे.
काचर (કાચર) (स्त्री.)–लहानसा तुकडा.
–कूचर (न.)–(१) किरकोळ खाद्य वस्तू (२) किरकोळ मोडक्यातोडक्या वस्तूंचा संग्रह.
–रुं (न.)–बारीक फाक.
काचली (કાચલી) (स्त्री.)–नरटे.
–मां पाणी लई डूबी मर–काही करता येत नसेल तर चाळणीत पाणी घालून जीव दे!
काचलां कूटवा–काथ्याकूट करणे.
काचलुं (કાચલું) (न.)–(१) नदीकाठची रेताळ असलेली लागवडीखाली आणलेली जमीन (२) नरटे.
काचुं (કાચુ) (वि.)–(१) कच्चे (न पिकलेले, न शिजविलेले इ.) (२) तकलुपी (३) बिनअनुभवी, अर्धवट, (४) अपूर्ण, ('काचुं काम') (५) कामचलाऊ (पक्के झालेले नव्हे असे उदा. 'काचो हिसाब') (६) दुबळे ('काचा काळजानुं') (७) (न.) कच्चेपणा, कमतरता, अपुरेपणा.
–चा काननुं (वि.)–हलक्या कानाचे.
–ची केद (स्त्री.)–कच्ची कैद.
–ची बुट्टी,–माया (स्त्री.)–भोळसट माणूस (नकारार्थी वापरतात–'ए काई काची माया नथी')
–चु कढाववुं–दिवाळे काढणे.
–कापवुं–(१) अपुरी तयारी असताना, अर्ध्याकच्च्या स्थितीत, किंवा अयोग्य काळी वर्तणे, काही करणे (२) तसे करून काम बिघडवून टाकणे (३) (काम, विचार इ. बाबतींत) घाई करणे.
–खावुं–ओढघस्ती होणे.
–पाडवुं–गर्भपात करणे.
काचोकचियारो,–कबीलो (કાચોકચિયારો,–કબીલો)–सज्ञान न झालेला, लहान वयाच्या मुलांचा परिवार.
काचे घडे पाणी भरवुं–फुकट खटपटणे.
काचुं कुंवारुं (वि.)–लहान वयाचे व अविवाहित.
–कोरुं (वि.)–न शिजवलेले व कोरडे.
–नच (वि.)–अगदीच कच्चे.

–पाकुं (वि.)–थोडे कच्चे, थोडे पक्के, अर्धेमुर्धे शिकलेले.

–पोचुं (वि.)–अनुभव आणि हिंमत नसलेले, भावडे, गैरवाकबगार.

काचोकूचो (કાચોકૂચો) (पु.)–शेवटचा राहिलेला असेल तो भाग.

काछई (કાછઈ) (स्त्री.)–पाणी ओसरल्यानंतरचे पात्र (ज्यात शेती केलेली आहे असे)

काछडी (કાછડી) (स्त्री.)–कासोट्यासारखा धोतराच्या सोग्याचा पाठीमागे खोचलेला एक भाग.

–छूटी जवी–डरणे, घाबरून जाणे.

–झालीने, -पकडीने, दोडवुं–कासोटा धरून पळत सुटणे.

–छूटो (वि.)–व्यभिचारी.

–डो (पु.)–कासोटा.

–डो मारवो, -वाळवो–कासोटा मारणे.

–डो मारीने, -वाळीने–कंबर कसून, अतिशय मेहेनतीने - चिकाटीने.

काछियो / काछी (કાછિયો) (वि.)–काची, भाजी विकण्याचा धंदा करणारा माणूस.

काछो, -टो (કાછો-ટો) (पु.)–कासोटा, कच्छ.

काज (કાજ) (न.)–(१) कार्य. (२) कारण, प्रयोजन

–कार (वि.)–(१) कार्य करण्यास समर्थ (२) उद्योगी.

–गरुं (वि.)–(१) काम करण्यास समर्थ असे (२) तरणेबांड (३) अति लाडके (४) नाजूक, तकलुपी.

काजळ (કાજળ) (न.)–(१) काजळी (२) डोळ्यात घालण्याचे काजळ.

–आंजवुं, –सारवुं–डोळ्यात काजळ घालणे.

–नी कोटडी–सहज कलंक लागेल–संभाळून राहिले पाहिजे असे स्थान.

–कंकु (न. ब. व.)–सौभाग्यवतीची लेणी-काजळ व कुंकू.

–वुं (अ. क्रि.)–काजळी धरणे.

–ळियो (पु.)–हरवलेली वस्तू शोधून देण्याकरिता किंवा घडलेली हकीगत सांगण्याकरिता दुसऱ्या माणसाला बसवून तेलाच्या किंवा शाईच्या ठिपक्यात सर्व दाखविणारा मनुष्य.

काजळीत्रीज (કાજળીત્રીજ) / काजळराणी (કાજળરાણી) (स्त्री.)–श्रावण वद्य तृतीया.

काजा (કાજા) (स्त्री.)–कार्य, कर्तव्य, काम.

–गरुं (वि.)–(१) उद्योगी, कार्यमग्न (२) फायदेशीर.

काजु (કાજુ) (वि.)–(१) चांगले, बरे (२) विनयी.

काजुकळियां (કાજુકળિયા) (पु. ब. व.)–साखरी काजू.

काजे (કાજે) (अ.)–करिता, साठी.

काजो (કાજો) (पु.)–कचरा.

काझगी (કાઝગી) (स्त्री.)–लगाम.

कांचळी (કાંચળી) (स्त्री.)–(१) कांचोळी. (२) कात (सापाची)

–उतारवी, -काढी नाखवी–जुनी खोळ काढून फेकून देणे.

–पहेरवी–(१) नामर्दपणा दाखविणे (२) स्त्रीचा वेष घेणे.

–ळिया पंथ–एक पंथ (ज्यांत धर्माच्या नावावर व्यभिचार चालतो).

–ळियो (पु.)–स्त्रीचे काम करणारा तमाशातील नट, नाच्या पोऱ्या

कांचि(-ची) (કાંચિ-ચી) [सं.] (स्त्री.)–घुंगुर बांधलेला कमरेचा दोरा.

कांचोळां (કાંચોળાં) (न. ब. व.)–आंतडी.

काट (કાટ) (पु.)–किटण, कळंक.

–खावो, -चड(-ढ)वो, वळवो–(१) किटण–कळंक-चढणे (२) बेकार पडून राहण्याने मनुष्याचे तेज किंवा पाणी उतरणे.

–उतारवो, -काढवो–कळंक किंवा किटण काढून टाकणे.

काट (पु.)–इमारती लाकूड.

–नाखवो–घराचे छप्पर आडे, सर इ. लाकूडसामानाने बनविणे.

–कूट (स्त्री.)–(१) मोडकेतोडके सामान (२) घराच्या बांधकामाचा लाकूडमाल.

–पीठियो (पु.)–इमारती लाकडाचा वखारवाला.

–माळ (पु.)–जुनेनवे (सर, बांबू इ.) किरकोळ इमारती लाकूड.

काट (पु.)–दाव्यावर केलेला प्रतिदावा, प्रतिकार.

–छांट (स्त्री.)–काटछाट, दुरुस्ती.

काट (पु.)–विघ्न, अडचण.

–काढवो–(१) विघ्न दूर करणे (२) काटा काढणे.

–कूट (स्त्री.)–कांडणे कुटणे.

काटको (કાટકો) (पु.)–मोठी गर्जना, कडकड असा प्रचंड आवाज.

काटखूण (કાટખૂણ) (पु.)–(१) काटकोन (२) (सुताराचा) गुण्या.

–चोखूण (पु.) काटकोन चौकोन.

–णो (पु.)–काटकोन.

काटरडो (કાટરડો) (पु.)–(१) तळाशी जमलेला कचरा, धूळ इ. (२) कापून वगैरे रीतीने निरुपयोगी झालेला माल, रद्दी सामान.

काटलियो (કાટલિયો) (पु.)–कारटा, अकराव्या दिवसाचे श्राद्धकर्म करविणारा ब्राह्मण.

काटलुं (કાટલું) (न.)–(१) वजन, अमुक निश्चित वजन तोलण्याचा काटा. (२) बाळंतपणात स्त्रियांना देण्यात येणारे

डिंक वगैरेसारखी औषधी घालून केलेले खाद्य.
(३) काटछाट (कापून घेणे) (४) विघ्न, अडचण.
काटलांफूटवां – फुकट धडपड करणे.
– कूवामां नाखवां – झाले गेले विसरून जाणे.
– सांखवां – जोल जमवून पाहणे, तोल बरोबर तपासणे.
काटलुं काढवुं – (१) काटा काढणे, विघ्न दूर करणे.
(२) मारून टाकणे.
काटलुं करवुं – (१) काटा काढणे (२) थोडे देऊन भागविणे.
काटलांदास (કાટલાંદાસ) (पु.) – मध्ये पडून काटछाट करून भागविणारा मनुष्य.
छापेलुं काटलुं (છાપેલું કાટલું) (न.) – सरकारी शिक्याचे वजन किंवा काटा.
काटवुं (કાટવું) (स. क्रि.) – (१) काटणे, कापणे, छेदणे.
(२) चावणे (३) फसविणे.
काटवुं (वि.) – कळंकाच्या रंगाचे.
– वो (पु.) – शोकदर्शक विटके लुगडे.
काटाकाट (કાટાકાટ) (स्त्री.) – (१) कापाकापी (२) कत्तल
(३) अदावत, डंख.
काटोडो (કાટોડો) – (१) चकमकीत वापरला जाणारा दगड.
(२) प्रवाही पदार्थांच्या खाली जमून बसणारा कचरा
(३) कच्च्या धातूतून लोखंड काढून घेतल्यानंतर राहणारा अवशेष.
काट्टी (કાટ્ટી) (स्त्री.) – मृताच्या अकराव्या दिवशी करण्यात येणारी क्रिया. (पु.) ती क्रिया करविणारा भटजी.
काठ (કાઠ) (वि.) – धूर्त, बनेल (२) (पु.) लाकूड (३) इमारती लाकूड (४) उंटावरचे आसन (५) खोक्याची चौकट.
काठडो (કાઠડો) (पु.) उंटावरचे वगैरे आसन.
काठलो (કાઠલો) (पु.) – मुलीला लग्नापूर्वी घालण्यात येणारा दागिना.
काठाळुं (કાઠાળું) (वि.) – उंचापुरा, धिप्पाड.
काठियाणी (કાઠિયાણી) (स्त्री) – काठियावाडी स्त्री.
– डी (पु.) – काठेवाडचा रहिवासी.
काठियो (કાઠિયો) (पु.) गाडीचा पिंजरा – लाकूड सामान.
काठी (કાઠી) (स्त्री.) – (१) जळाऊ लाकूड (२) जमिनीचे एक माप (३) काठी, दंडा. (४) बांधा (शरीराचा)
काठुं (કાઠું) (१) (वि.) कठोर (२) कंजूष (३) कठीण
(४) वाईट (५) (न.) शरीराचा बांधा (६) (ढोल, डफ इ. चे) खोके (७) उंटावर बसण्याची बैठक (८) किनार लावायची आहे असा साडीचा कपडा.
काढवुं (કાઢવું) (स. क्रि.) – (१) काढणे (२) ओढून काढणे
(३) रद्द करणे (४) काढून टाकणे (५) कमावणे, मिळवणे.

काढी जवुं – प्रेत बाहेर काढून पुढच्या क्रियेकरिता घेऊन जाणे.
– नाखवुं – (१) रद्द करणे. (२) नापास करणे. ('अेने परीक्षके शामां काढी नाख्यो?' (३) हिशेबांत न धरणे.
– लेवुं – गुपचुप काढून घेणे. (२) करवून घेणे.
– मूकवुं, मेलवुं – (१) हाकून देणे (२) रजा देणे, बडतर्फ करणे, (३) काढून बाजूला ठेवणे
काढो (કાઢો) (पु.) – (१) काढा (२) शेतात जास्त झालेले पाणी निचरून टाकण्याकरिता काढलेली खाच.
काण - मोकाण (કાણ,-મોકાણ) (स्त्री.) – मरणानंतरचे रडणे - कुटणे करतात ते.
काणुं (કાણું) (वि) – छिद्र किंवा वेध पाडलेले (२) एकाक्ष, काणे (३) (न.) वेध, छिद्र
– णियुं – (१) काणे (२) छिद्र पाडलेले
कांट (કાંટ) (स्त्री.) – काटेरी झाडांची गर्द झाडी.
कांटादार (કાંટાદાર) (वि.) – पाणीदार, तडफदार.
कांटारखुं (કાંટારખું) (न.) – पादत्राण.
कांटाळुं (કાંટાળું) (वि.) – काटेरी.
कांटियुं (કાંટિયું) (न.) – (१) प्रेतावर घालण्याचा कपडा
(२) संडास, शौचकूप.
कांटियो (કાંટિયો) (पु.) – (१) संडास (२) मनात वैर ठेवणारा माणूस.
कांटुं (કાંટું) (न.) – (१) काजे (२) माल देण्या - घेण्याचा प्रायः न साजणारा - करार, सौदा. (३) द्विदल धान्याचा पालापाचोळा.
कांटो (કાંટો) (पु.) – काटा
(कंठे) कांटा पडवा – घशात शोष पडल्यामुळे काटे बोचल्यासारख्या वेदना होणे.
कांटामां आवी पडवुं – अडचणीत सापडणे.
कांटा वेरवा, - वाववा – काटे पेरणे, शत्रुत्व उत्पन्न करणे.
कांटो काढवो – (१) काटा काढणे (२) मनातील खटका दूर करणे.
– मारवो – (१) डंख मारणे. (२) विघ्न आणणे.
– वागवो – काटा लागणे.
कांठली (કાંઠલી) (स्त्री.) – बायकांच्या गळ्यातला एक दागिना, हासळी.
कांठलो (કાંઠલો) (पु.) – (१) गळ्याला बरोबर बसणारा अंगरख्याचा काप. (२) घागर, घडा वगैरेचा गळा.
(३) घाट, काठ (नदीचा)
कांठियुं (કાંઠિયું) (न.), – यो (पु.), कांठी (स्त्री.) – शौचकूप.
कांठो (કાંઠો) (पु.) – (१) किनारा, तट, घाट (२) शेवट
(३) घागर, विहीर इ. चा अगदी वरचा गोलकाठ.
कांठोडुं (કાંઠોડું) (वि.) – कांठापर्यंत - शिगोशीग - भरलेले.

कांडी (કાંડી) (स्त्री.) – काडी (आगकाडी.)
कांडुं (કાંડું) (न.) – मनगट.
– कापी आपवुं – सही करून देणे, लेखी कबुली देणे.
– पकडवुं – (१) आश्रय देणे (२) लग्न करणे (लाक्ष.)
कांडां कलम करवां – गुन्ह्याबद्दल मनगटे तोडून टाकणे.
कांडाघडियाळ (કાંડાઘડિયાળ) – 'रिस्टवॉच', मनगटावरचे घड्याळ.
कांडाछोड (કાંડાછોડ) (वि.) – (१) कितीही पकडीत मनगट धरले असले तरी ते सोडवून घेईल असा, बळवान (२) चढाओढ.
– बळ (न.) – मनगटाची शक्ती.
– बळियुं (वि.) – मनगटात शक्ती असणारे, बळकट.
कात (કાત) (स्त्री.) – (१) ओटीपोट (२) ताकद, कुवत.
कातणी (કાતણી) (स्त्री.) – कातलेल्या सुताचे कुकडे.
कातर (કાતર) [सं.] (१) – डरपोक, भ्याड. (२) भयभीत (३) तिरकस जाणारे (४) कात्री.
– चलाववी, - फेरववी, - मूकवी – काटछाट करणे.
– णी (स्त्री.) – (१) कातरणे, (२) कात्री (३) कणसे कापून घेतल्यानंतर खळे करण्याच्या वेळी ब्राह्मणांना देण्यात येणारा भाग.
कातरवुं (કાતરવું) (सं. क्रि.) – (१) कातरणे (२) कापणे, चावणे (३) कमी करणे (४) कोरणे (५) खणणे (६) (लाक्ष). पाणउतारा करण्यासारखे बोलणे.
कातरियुं (કાતરિયું) (न.) – छपराच्या अगदी खालचाच माळा. (२) भिंत फोडण्याचे चोराचे एक अवजार (३) मेंदू (४) कटाक्ष (५) स्लेटचा फुटलेला मोठा तुकडा.
– गेप(-ब) – डोके फिरलेला-ली-ले.
– मूकवुं – घर फोडणे, चोरी करणे.
– यां खावां, - नाखवां – रागाने किंवा चिडून नजर टाकणे.
कातरो (કાતરો) (पु.) – रोपांवर पडणारी एक कीड. (२) केळांचा घड.
कातळ (કાતળ) (स्त्री.) – अफवा, गप्प.
– मारवी – गप्प ठोकणे.
कातळी (કાતળી) (स्त्री.) – पातळ-चपटी खाप, तुकडा.
कातळुं (કાતળું) (न.) – (१) जाडशी खाप, तुकडा (२) गंडेरी (३) वाटेल तसा कापलेला तुकडा.
कातिल (કાતિલ) [अ.] (वि.) – (१) कत्तल करणारे - करील असे (२) घातक (३) मर्मवेधी.
काती (કાતી) (स्त्री.) – (१) सुरी (२) करवती (३) (लाक्ष.) दगा.
– पेटमा काती होवी, - राखवी – मनात दगाफटका असणे - ठेवणे.
कातुं (કાતું) (न.) – बोथट सुरी.
काथ (કાથ) (न.) – कथन, पुराण (सांगणे).
काथ (पु. न.) – (१) सत्त्व, तेज, (२) मनुष्य म्हणून जिंदगी (३) स्वार्थ.
काथाकबला (કાથાકબલા) (पु. ब. व.) – (१) नालस्ती, खरेखोटे बोलणे (२) नसती भानगड (३) निरर्थक तक्रार.
काथियुं (કાથિયું) (वि.) – (१) काथ्याच्या रंगाचे (२) काथ्याचा दोर (३) काथ्याची चटई (४) काथ्याचा पायपोस.
काथी (કાથી) (स्त्री.) – काथ्या, त्याची दोरी.
काथो (કાથો) (पु.) – (१) कात (२) काथ्या.
– था गोळी (स्त्री.) – कातगोळी.
– था दोरी (स्त्री.) – काथ्याची दोरी.
कादर (કાદર) (वि.) – शक्तिशाली.
कादव (કાદવ) (पु.) – चिखल, गारा.
– उडा(-रा)डवो, - फेंकवो – चिखल उडविणे, निंदानालस्ती करणे.
– खूंदवो – व्यर्थ मेहेनत करणे.
– कीचड (पु.) – अतिशय चिखल.
कादोकदमी (કાદોકદમી) (अ.) – अतिशय प्राचीन काळापासून.
कान आववा – ऐकण्या - समजण्याची शक्ती येणे.
– आमळवा – कान पिळणे.
– उघाडवा / – खोलवा } – सावध करणे, समजेल असे करणे.
– ऊघडवा – खरी स्थिती समजणे, लक्षात येणे.
– करडवा – कानगोष्टी करणे.
– कापवा – (१) अमक्या पेक्षा वरचढ होणे, जितणे (२) भलतेच समजून घेणे.
– खोतरवा – (१) कान कोरणे (२) स्वतःची चूक समजून येऊन शरम वाटणे, (स्वतःचे) कान पकडणे.
– घणा होवा – प्रत्येकाचे ऐकून भ्रमात पडणे, हलक्या कानाचे असणे.
– घरेणे मूकवा – न ऐकणे, बाहेर होणे.
– तळे काढवुं, – तळेथी काढी नाखवुं – ऐकल्यानंतरही लक्ष न देणे, ऐकले न ऐकलेसे करणे.
– देवा, - धरवा – लक्षपूर्वक ऐकण्याचा प्रयत्न करणे.
– ना कीडा खदखदवा, - खरवा – कानात किडे पडणे, अपशब्द ऐकून वीट येणे.
– नी बूट पकडवी – चूक कबूल करणे.
– नुं काचुं (वि.) – (१) बहिरे (२) हलक्या कानाचे.
– पकडवो, - झालवो – (१) चूक दाखविण्यासाठी - शहाणपणा सुचावा म्हणून कान धरणे. (२) स्वतःची चूक कबूल करणे.

–फूटवा–कान फुटण्यासारखा असह्य गोंगाट वाटणे.
–फूंकवा, फूंक मारवी–(१) कान फुंकणे, (२) बोध देणे (३) गुप्त मसलत करणे (४) मंत्र सांगून चेला बनविणे.
–फोडवा, -फोडी नाखवा–भयंकर गोंगाट करणे.
–भरवा, भंभेरवा–कान भरणे.
–मरडवा–ठपका देणे.
–मां आंगळीओ घालवी–न ऐकणे, कानात बोटे घालणे.
–मां कहेवुं–(१) गुपचूप सांगणे (२) (औषधाचा वगैरे) तत्काळ परिणाम होणे.
–मां कांकरा घालवा–ऐकले न ऐकलेसे करणे.
–मां डूचा मारवा } –(१) न ऐकणे (२) शिकवण न मानणे.
–काने दाटा मारवा }
–मां झेर रेडवुं–कान फुंकणे, खोटेनाटे सांगून बहकावणे.
–मां मंत्र मूकवो–(१) उपदेश देणे (२) भुलविणे.
–मांडवा–कान टवकारणे.
–वींधवा–कान टोचणे.
–वींधी नाखवा, –वींधाई जवा–ऐकून हृदयाचे पाणी पाणी होणे.
–सूना थई जवा–(१) बहिरे होणे (२) अपशब्द-कठोर शब्द ऐकणे.
कान आववुं }
काने आववुं } –कानी येणे, ऐकण्यात येणे.
काने पडवुं }
कानेथी काढी नाखवुं–न ऐकलेसे करणे.
काने धरवुं–सांगितल्या गोष्टीकडे लक्ष देणे.
–नाखवुं–कानांवर घालणे, जाणवून देणे.
–हाथ देवा, -धरवा, -मेलवा, -मूकवा–(१) कानावर हात ठेवणे. (२) न मानणे, न ऐकणे.
कानकट्टुं (કાનકટ્ટું) (वि.)–कान कापलेले.
–कोचियुं (न.)–कान टोचण्याचे अवजार.
–कोचियो (पु.)–कान टोचण्याचा धंदा करणारा (सोनार).
–खजूरो (पु.)–पुष्कळ पायांचा किडा.
–खोतरणी (स्त्री.)–कान कोरणे.
–चिमोरी (न.)–वाघूळ.
–चिमडियुं (न.)–(१) वाघूळ, (२) पाकोळी.
–छे (–शे) रियां (न. ब. व.)–कानावर उगवणारे केसांचे झुपके.
–पटी (–ट्टी) (स्त्री.)–कानाची पाळ.
–फटो (पु.)–कानफाट्या.
–फूटुं (वि.)–बहिरे.
–फूसियां (न. ब. व.)–कान फुंकणे.
–फूसियुं (वि.)–(१) चुगलखोर (२) कान फुंकणारे (३) (न.) चहाडखोर माणूस (४) चहाडखोरी.
कानभंभेरणी (કાનભંભેરણી) (स्त्री.)–कान फुंकणे.
काने (–नो) कान (કાનેકાન) (अ.)–(१) कानाकानांवरून (२) खुद्द आपल्या कानांनी.
कानम (કાનમ) (स्त्री.)–काळी जमीन.
कानसील (–ळ) (કાનસીલ-ળ) (पु.)–कानशील.
कानसूरी (કાનસૂરી) (स्त्री.)–कानाचे स्वाभाविक वळण.
कानुडो (કાનુડો) (पु.)–कृष्णाचे लाडके नाव.
कानुं (કાનું) (न.)–एक वाद्य.
कानूगो (કાનૂગો) (पु.)–कायदातज्ज्ञ.
कानून (કાનૂન) [अ.] (पु.)–(१) कायदा, नियम. (२) रिवाज, शिरस्ता.
–नी (वि.)–कायदाविषयक.
कानो (કાનો) (पु.)–(१) काना ('अ' चे 'आ' ज्याने होते तो) (२) भांड्यांची कोर, भांड्याचा कान.
–कान (अ.)–भांड्याच्या काठापर्यंत.
–मातर (पु. ब. व.), –मात्रा (न. ब. व.)–कानामात्रा.
कांत (કાંત) [सं.]–(१) (वि.) इच्छित, प्रिय (२) अनुकूल. (३) सुंदर, मनोहर (४) (पु.) प्रियकर, (५) पती (६) चंद्र (७) मोलाचा खडा, हिरा (८) औषध (९) (न.) केशर (१०) कुंकू (११) एक प्रकारचें लोखंड.
–पक्षी (न.)–मोर
–पाषाण (पु.)–(१) चकमकीचा दगड (२) लोहचुंबक.
–लोह (न.)–लोहचुंबक.
कांतण (કાંતણ) (न.)–कातणे.
कांतवुं (કાંતવું) (स. क्रि.)–(१) सूत काढणे (२) पातळ करणे, घटविणे.
कांतेलुं कांतवुं–केलेले पुनः करणे, व्यर्थ परिश्रम करणे.
कांत्यां कोकडां कपास थवां } –केलेली मेहेनत किंवा काम
कांत्युं पींज्युं कपास थवुं } धुळीस मिळणे.
कांतिलोढुं (કાંતિલોઢું) (न.)–(१) एनॅमेल केलेला लोखंडी पत्रा. (२) लोहचुंबक
कां तो (કાં તો) (अ.)–अथवा, एक तर.
कांदो (કાંદો) (पु.)–(१) कांदा (२) (कोणताही) कंद.
–काढवो–फायदा काढणे.
कांध (કાંધ) (स्त्री.)–(१) खांदा (२) खांद (३) जुंवाने पडलेला मानेवरील घट्टा.
–आपवी–खांदा देऊन उचलण्याला मदत करणे.
–आववी–गुराच्या मानेची चामडी सोलून त्याला सूज येणे.

–पडवी–गुराच्या मानेवर जू ठेवून ठेवून घट्टा पडून तेथील चामडी कठीण होणे.
मारवी–खांद्यावर घ्यायला मदत करणे.
–धाळुं (वि.)–मोठे, मोठेपणा असलेले.
–धियो (पु.)–(१) खांद्यावर ओझे उचलून नेणारा मजूर. (२) बैल (३) (मृताला) खांदा देणारा माणूस. (३) हप्ते ठरवून पैसे देणारा सावकार. (४) साथी (बहुशः बाईट कामांतला)
कांधिया करवा–(१) खांदा देणाऱ्यांना क्रियाकर्मांतराच्या वेळी जेवण घालणे.
कांधी (કાંધી) (स्त्री.)–भिंतीत बसविलेला दगडी सज्जासारखा भाग.
कांधुं (કાંધું) (न.)–हप्त्याप्रमाणे भरण्याची रकम, हप्ता.
कांधां करवां–हप्ते पाडणे.
कांधाखत (न.)–हप्त्यांप्रमाणे देणे चुकते करण्याचा लेखी करार.
कांधे काढवा–हप्त्याने देण्याच्या बोलीने रुपये कर्जाऊ घेणे.
कांधुं चडवुं–हप्त्याची रकम भरण्याची वेळ टळणे.
कांधुं पडवुं–हप्त्याची रक्कम वेळेवर भरता न येणे.
–भरवुं–हप्ता भरणे.
कांधेली (કાંધેલી) (स्त्री.)–जू.
कांधेवळियो (કાંધેવળિયો) (पु.)–नाकेवाला, जकात घेणारा अधिकारी.
–वालियो (पु.)–(१) घराचा भार वाहणारा मुलगा. (२) साथीदार.
काप (કાપ) (पु.)–(१) कापणे (२) कापण्याने पडणारी खूण, (३) बेतण्याची रीत–कौशल्य.
–काढवो–कपडा बेतणे.
–मूकवो–(१) कापणे (२) कापून घेणे, कमी करणे, काढून टाकणे.
–कूप, -पाकूप (-पी) (स्त्री.)–(१) थोडेसे कापून टाकणे, कमी करणे (२) दुरुस्ती (३) काटकसर.
कापडियो (કાપડિયો) (पु.)–कापड विकणारा.
कापडी (કાપડી) (वि.)–(१) कापडी. (२) (स्त्री.) लहानसा कपडा.
–डुं (न.)–काचोळी.
कापडी (-डियो) (કાપડી) (पु.)–कापडी, यात्रा करणारा साधु.
कापणी (કાપણી) (स्त्री.)–(१) कापण्याची रीत (२) कापणी (धान्याची) (३) पत्रा कापण्याची कातर.
कापतुं (કાપતું) (वि.)–मोठ्या रकमेत लहान रक्कम धरून काढलेले (व्याज).

कापली (કાપલી) (स्त्री.)–कापडाचा किंवा कागदाचा लहान तुकडा.
–लो (पु.)–कापडाचा–कागदाचा तुकडा.
कापवुं (કાપવું) (स. क्रि.)–(१) कापणे, कापून अलग करणे (२) कमी करणे (३) दूर करणे, टाळणे.
कापो (કાપો) (पु.)–खोडल्याची रेघ (२) चीर.
काफर (કાફર) (वि.)–(१) मुसलमानी धर्म न मानणारा, नास्तिक (२) लुच्चा (३) जंगली (४) (पु.) पूर्व आफ्रिकेतील मूळ वतनी
–री (पु.)–(१) ॲबिसीनियाचा मूळ रहिवासी (स्त्री.) हबशीण.
–रो (पु.)–दक्षिण आफ्रिकेचा मूळ रहिवासी.
काफलो (કાફલો) (पु.)–(१) समुदाय, संघ, जत्था (२) लढाऊ जहाजांचा काफला.
काफी (કાફી) [अ.] (वि.)–पुरेसे.
काबर (કાબર) (स्त्री.)–(१) एका पक्षाचे नाव (२) भांडखोर बाई.
–कलह (स्त्री.)–बोलाचाली, झगडा.
–चीतरुं (वि.)–रंगीबेरंगी, चित्रविचित्र.
–रियुं, -रुं (वि)–रंगीबेरंगी.
काबस (કાબસ) (पु.)–तेलाच्या तळाला राहिलेला गाळ.
काबिज (કાબિજ) [सं.] (पु.)–कबजेदार, मालक.
काबू (કાબૂ) [तुर्की] (पु.)–(१) ताबा, कबजा (२) अंकुश (३) सत्ता, अधिकार (४) वजन.
–जामवो, -धरावबो, -राखवो / –मां लेवुं, -मां राखवुं } ताब्यात ठेवणे, ताबा ठेवणे.
–दार (वि.)–ताबा असणारा.
काबेल (કાબેલ) (वि.)–(१) समर्थ, (२) वाकबगार.
–लियत (स्त्री.)–वाकबगारी, समर्थता.
–लेबरदाश (-स) (वि.)–सहन करण्याजोगे, खपवून घेण्याजोगे.
काभा (કાભા) (स्त्री.)–कुभार्या, भांडखोर बायको.
कामहीण (કામહીણ) (वि.)–नपुंसक.
काम (કામ) (न.)–(१) काम, कर्म, कृत्य (२) कर्तव्य (३) धंदा, व्यवसाय (४) उपयोग (५) मुकद्दमा, केस, (६) (अ.) करिता ('शुं काम?'=कशाकरितां?)
–आववुं / –लागवुं }–(१) उपयोगी पडणे, कामाला येणे (२) कामी येणे, युद्धांत बळी पडणे.
–करवुं, -करी छूटवुं–मोबदल्याची आशा न ठेवता काम करणे.
–काढी लेवुं, -काढवुं–युक्तीने आपले काम साधून घेणे.

–चालवुं–कोर्टात मुकद्दमा चालणे.
–थवुं–काम पार पडणे.
–तमाम थवुं–मरण पावणे, खलास होणे.
–देवुं–उपयोगी होणे.
–पडवुं–(१)–चा उपयोग किंवा गरज असणे (२)–शी संबंध येणे.
–मळवुं–काम मिळणे, कामाला लागणे, धंद्याला लागणे.
–सरवुं–काम पार पडणे.
–मां आववुं–उपयोगी होणे.
–मां काम करी लेवुं–एका कामात किंवा कामाबरोबर दुसरे काम साधून घेणे–करून घेणे.
–कामे लागवुं–कामाला लागणे.

**कामकरंदु** (કામકરંદુ) (वि.)–कर्तव्यनिष्ठ, काम करील असे (२) मेहेनती.
–ग (–गी) री (स्त्री.)–(१) सांगितलेले किंवा सोपविलेले काम (२) नोकरी, चाकरी (३) अधिकार.
–गरु (वि.)–उद्योगी, कामसू.
–गार (वि.)–(१) काम-मेहेनत-मजुरी करणारा. (२) (पु.) कामगार, मजुर.
–चलाऊ (वि.)–(१) काम चालविण्यापुरतेच असलेले (२) हंगामी, तात्पुरते.
–चोर (पु.)–(१) सोपविलेले काम बरोबर न करणारा मनुष्य (२) कसब चोरणारा मनुष्य.
–जोग (–गुं) (वि.)–कामापुरते.
–धंधो (पु.)–व्यापाररोजगार.
–सर (अ.)–कामाकरिता, कामाच्या अनुषंगाने.
–साधु (वि.)–काम साधून घेण्यापुरता, स्वार्थसाधु, आपमतलबी.

**कामठ** (કામઠ) (पु.)–कासव.

**कामठियो** (કામઠિયો) (पु.)–तीर मारणारा मनुष्य.

**कामठी** (કામઠી) (स्त्री.)–(१) छोटे धनुष्य (२) (पु.) भिल्ल.
–ठुं (न.)–धनुष्य.

**कामडकोटियुं** (કામડકોટિયું) (वि.)–(१) कामठी (चिव्याच्या फाकी)चे बनविलेले (२) आता मोडते मग मोडते अशा अवस्थेतले (३) (न.)–चिव्याचे बनविलेले घर.

**कामडी** (–डुं) (કામડી-ડું) (वि.)–(१) हाडकुळे (२) कामसू (३) चिव्याची पट्टी–फाक.

**कामढुं** (કામઢું) (वि.)–कामसू.

**कामण** (કામણ) (न.)–(१) वशीकरण, मोहिनी घालणे (२) मंत्रतंत्र.
–गारुं (वि.)–मोहिनी टाकणारे.
–टूमण (न.)–मंत्रतंत्र.
–वुं (सं. क्रि.)–मोहिनी घालणे.

**कामरू** (કામરૂ) (पु.)–कामरूप देश.

**कामवुं** (કામવું) (स. क्रि.)–(१) इच्छा करणे (२) कमविणे.

**कामस** (કામસ) (पु. स्त्री.)–उसाच्या रसातील गदाळा, गुळातील कचरा.

**कामळ** (–ळी) (કામળ-ળી) (स्त्री.)–कांबळे.
–ळियो (पु.)–सुरवंट.
–ळो (पु.)–मोठे कांबळे.

**कामाटी** (–ठी) (કામાટી-ઠી) (पु.)–कामाठी, झाडझूड करणारा नोकर, पट्टेवाला.
–ट (–ठ) ण (स्त्री.)–त्याची बायको.

**कामार्थु** (કામાર્થુ) (वि.)–उद्योगी, कार्यमग्न, कामसू.

**कामुं** (કામું) (न.)–(१) काम, कार्य (२) हालचाल, क्रिया.

**कामेश्वर** (કામેશ્વર) [सं.] ((पु.)–(१) विषयवासनेवर ताबा मिळविणारा पुरुष (२) महादेव.
–री (स्त्री.)–(१) वासनेवर ताबा ठेवणारी स्त्री (२) पार्वती.

**कामो** (કામો) (पु.)–पराक्रम, शौर्याचे काम.

**कामोरो** (કામોરો) (पु.)–कामदार.

**कांप** (કાંપ) (पु.)–(१) काळा, मऊ गाळ (२) 'कँप' (इं.)

**कांप** (पु.)–थरकाप.
–वुं (अ. क्रि.)–कापणे, थरथरणे.

**कांपो** (કાંપો) (पु.)–वेंध, वेंघेत मावेल इतका गठ्ठा. (२) एक माणूस उचलू शकेल एवढा बोजा.

**कांब** (કાંબ) (स्त्री.)–(१) चिव्याची फाक, कांबी (२) चिव्याचा गज (मोजण्याचा).

**कांबी** (કાંબી) (स्त्री.)–बायकांच्या पायातला एक दागिना (२) मोटेच्या तोंडाचा काठ (३) कातडी बादली.

**काय** (કાય) [सं.] (स्त्री.)–शरीर, काया.
–कष्ट (न.)–(१) शरीरकष्ट (२) शारीरिक काम (३) तपादी करून देहाचे दमन करणे.
–कष्टी (वि.)–शरीरकष्ट करणारे.
–चिकित्सा (स्त्री.)–शरीराची वैद्यकीय चिकित्सा व उपाययोजना.
–दंड (पु.)–देहदमन.
–रोग (पु.)–शारीरिक रोग.

**काय(-र-)टुं** (કાય–ર-ટું) (न.)–मेलेल्याच्या अकराव्याची क्रिया किंवा जेवण.
–करवुं–अकराव्या दिवसाची क्रिया करणे.

–वाळवुं–अकराव्याचे जेवण घालणे.
–सरावबुं–अकराव्याची क्रिया करणे.
–टियो (पु.)–(१) कारटा, (२) अकराव्याची क्रिया करविणारा ब्राह्मण.
कायदो (કાયદો) (म.] (पु.)–(१) नियम (२) सरकारी कायदा (३) घोड्याचा लगाम.
–उतारवो, -चडाववो–लगाम उतरविणे-चढविणे.
–चलाववो–(१) कायद्याचा अमल करणे (२) आपलाच हेका चालविणे.
कायदामां लेवुं, -सपडाववुं–कायद्याच्या पकडीत धरणे–सापडणे, गुन्हा लावून किंवा आरोप ठेवून पकडणे.
कायदा-दे-)सर (કાયદા(-દે)સર) (अ.)–कायदेशीर, कायद्याला धरून.
कायनात (કાયનાત) [अ.] (स्त्री.)–पुंजी, दौलत.
कायर (કાયર) (वि.)–भेकड.
कायर(-रुं) (કાયર-રું) (वि.)–(१) कामाला कंटाळणारे, आळशी (२) थकून–कंटाळून गेलेले (३) भेकड, भ्याड.
–करवुं–सतावून सोडणे, त्रास देऊन नको जीव करून टाकणे.
–थवुं–कंटाळणे, त्रासून जाणे.
कायली (કાયલી) (वि.)–(१) आजारी (२) आजाराने त्रासिक-किरकिरे-बनलेले.
काया (કાયા) [सं.] (स्त्री.)–शरीर.
–कसवी–(१) शरीर व्यायामाने मजबूत करणे (२) शरीराचे बळ पुरेपूर वापरणे.
–वणसवी–शरीर क्षीण होणे किंवा बिघडणे, रोग होणे.
–देखाडवी, -उघाडी करवी, -ढांकवी इ.–शरीराचा गुह्य भाग दाखविणे, झाकणे इ.
–पडवी–देह पडणे.
–कष्ट (न.) (स्त्री.)–तप, व्रते वगैरेंनी शरीर कष्टविणे, देहदमन.
–पलटो (पु.)–(१) शरीरात एकदम बदल, नवाच जन्म (२) बाह्य देखावा किंवा वेष पालटणे.
कार (કાર) (पु.) क्रिया, कार्य (२) निश्चय (३) यत्न (४) संबंध, व्यवहार (५) इज्जत, पत (६) कुवत, ऐपत (७) फेरफार.
–जवो–पत जाणे.
–पडवो–दबाव पडणे, शह लागणे.
–पहोंचवो–शह लागणे.
–क (वि.)–करणारे–करविणारे.
कारकर्दगी, -कीर्दी (કારકર્દગી, -કીર્દી) [फा.] (स्त्री.)–(१) कारकीर्द, अमल चालू असतानाचा काळ. (२) अमल चालू असताना केलेले कामकाज, कारभार.

कारच(-चो)बी (કારચ-ચો-બી) [फा.] (स्त्री.)–(१) लाकडावरील कोरीव काम (२) एक प्रकारचे भरतकाम.
कारसाज (કારસાજ) [फा.] (पु.)–कामकाजाची व्यवस्था करणारा, कारभारी.
–साजी (स्त्री.)–(१) कामाची व्यवस्था करणे (२) अनामत फंड (काम सुधारण्याकरिता काढून ठेवलेला.)
–स्तान [फा.] (स.)–(१) कारस्थान, कपट (२) दंगा, मस्ती.
कारोबार (કારોબાર) [फा.] (पु.)–कारभार.
–मंडळी (स्त्री.)–कार्यकारी मंडळ.
–री(वि.)–(१) कारभारविषयक (२) (स्त्री.) कार्यकारी मंडळ.
कारखत (કારખત) (स्त्री.)–तसदी.
कारखानीस (કારખાનીસ) [फा.] (पु.)–कारखान्याचा वरिष्ठ अमलदार.
कारगत (કારગત) (स्त्री.)–(१) कुवत, शक्ती (२) हात पोचणे, वशिला. (३) सार्थकता.
–चालवी, –पहोंचवी–वशिला लागणे, संबंध-हात-पोचणे.
कारज (કારજ) (न.)–(१) काम, कार्य (२) विवाह किंवा मरण या संबंधीच्या खर्चाचा प्रसंग.
–करवुं, –थवुं–त्या प्रसंगीचा खर्च वगैरे करणे, होणे, त्याचा विधि इ. करणे.
–कारी (वि.)–सेवाभावी, परोपकारी.
कारणसर (કારણસર) (अ.)–त्यामुळे, त्या कारणाने.
कारणोत्तर (કારણોત્તર) (पु. न.)–(१) कारण दर्शविणारे उत्तर (२) प्रतिवादीचे प्रत्युत्तर.
कारदान (કારદાન) (न.)–(१) युक्ती. (२) योजना.
कारमुं (કારમું) (वि.)–(१) भयंकर (२) कूट स्वरूपी, अद्भुत (३) दैवी, सुंदर.
कारमोक (કારમોક) (अ.)–एकदम, अवचित.
कारव (કારવ) [सं.] (पु.)–नर कावळा.
–वी (स्त्री.)–कावळा मादी.
कारववुं (કારવવું) (स. क्रि.)–करविणें (जोडधातू म्हणून वापरतात, त्याचा अर्थ 'ती क्रिया वगैरे' असा होतो. उदा. 'जोई कारवीने,' 'करी कारवीने.')
कारवहेवार (કારવહેવાર) (पु.)–कामकाज आणि रीतभात, सामाजिक चालरीत व व्यवहार.
कारवा (કારવા) (पु.)–अब्रू, इज्जत.
कारवी (કારવી) (स्त्री.)–(१) अश्वगंधा (२) मेथी (३) कारल्याचा वेल.
कारसियो (કારસિયો) (पु.)–झोपाळ्याची साखळी किंवा सळी अडकविण्याची कडी.

कारसी (કારસી) (स्त्री.) – एक ताजवा.
कारसो (કારસો) (पु.) – (१) युक्ती (२) बेत, योजना (३) मनसुबा.
कारंज, -जो (કારંજ-જો) (पु.) – (१) कारंजा (२) कारंजा असलेला बगीचा.
काराखडियो (કારાખડિયો) (पु.) – अशुभ समाचार आणणारा माणूस.
कारापारा (કારાપારા) (पु.) – (१) चोळामोळा (२) वाकडेपणाने एखाद्याचे दोष काढणे.
कारिका (કારિકા) (स्त्री.) – सांडणी.
कारी (કારી) (वि.) – (१) भयंकर, दारुण (२) घातक, मारक (३) (स्त्री.) युक्ती.
कारीगर (કારીગર) (पु.) – (१) कारागीर. (२) यंत्रज्ञ (३) कोणत्याही कलेत हुषार असलेला माणूस.
कारीग(-गी) री (કારીગ-ગી-રી) (स्त्री.) – (१) कारागिरी (२) चतुरपणा.
कारीपा(-पे) री (કારીપા-પે-રી) (स्त्री.) – (१) व्यर्थी बोली (२) बोलणे एक करणे एक अशी वर्तणूक (३) जेथे उत्तर एक अवश्य तेथे दोन उत्तरे देणे (४) मुद्दाम होऊन एखाद्याचे दोष काढणे.
कारु (કારુ) [सं.] – (१) (वि.) करणारा, बनविणारा (२) (पु.) शिल्पी, कारागीर. (३) शिल्पीकाम करणारी एक जात.
कारेली (કારેલી) (स्त्री.) – कारल्याचा वेल.
– लुं (न.) – कारले.
कारोतर (કારોતર) [सं.] (पु.) – (१) दारू गाळण्याची वेळांची चाळणी (२) दारूचा फेस.
कार्पट (કાર્પટ) [सं.] (न.) – जुना धडपा.
– टिक (पु.) – कापडी, संन्यासी, चिंध्या वापरणारा यात्रेकरू.
कार्यग्राही (કાર્યગ્રાહી) (वि.) – उद्योगी, कार्यमग्न.
कार्यवाहक (કાર્યવાહક) (वि.) – (१) कारभार करणारा री-रे, (२) (पु.) कारभारी, सेक्रेटरी.
– सभा (स्त्री.) – कार्यकारी मंडळ.
कार्यवाही (કાર્યવાહી) (स्त्री.) – (१) कामकाज चालविण्याची रीत, 'प्रोसीजर', (२) कार्यक्रम.
कार्यसरणि (-णी) (કાર્યસરણિ-ણી) (स्त्री.) – कार्य करण्याची सरणी-रीत.
कार्यसाधक संख्या (કાર્યસાધક સંખ્યા) (स्त्री.) – मंडळाचे कामकाज सुरू करण्याकरिता लागणारी हजर सभासदांची किमान आवश्यक संख्या, 'कोरम'.
काल (કાલ) (स्त्री.) – (१) कालचा दिवस (२) उद्याचा दिवस (३) (अ.) काल किंवा उद्या (३) अलीकडे, थोड्या दिवसापूर्वी किंवा नंतर.
– ऊठीने – भविष्यकाळी, पुढे.
– उपर राखवुं – तहकूब ठेवणे, पुढे ढकलणे.
– ले (अ.) – काल किंवा उद्या.
कालखेपन (કાલખેપન) (न.) – कालक्षेप करणे, विलंब करणे.
काल(-ळ)चिह्न (કાલ-ળ-ચિહ્ન) (न.) – विनाशाची-मृत्यूची खूण.
कालधर्म (કાલધર્મ) (पु.) – (१) काळाला अनुसरून असलेला धर्म. (२) काळाचा धर्म–गुण–नियम (३) मरण, यमधर्म.
कालां(-ळां)तरे (કાલાં-ળાંતરે) (अ.) – कालांतराने.
कालकलाई (કાલકલાઈ) (स्त्री.) – लहानपण.
कालपण (કાલપણ) / कालापणुं (કાલાપણું) } (न.) – मुलाचे बोबडे बोबडे आणि मधुर बोलणें, (२) तोतरे बोलणे.
कालबूत (કાલબૂત) (न.) – (१) जोड्याच्या आत ठोकण्याचा पायाचा लाकडी साचा. (२) घाट, साचा.
कालटी (કાલટી) (स्त्री.) – गवताची चौकोनी गंजी.
कालववुं (કાલવવું) (सं. क्रि.) – कालविणे, मिसळून एक करणे.
कालावाला (કાલાવાલા) (पु. ब. व.) – आजीजी, गयावया.
कालिक (કાલિક) [सं.] (वि.) – काळाशी जमणारे.
कालिंगडुं (કાલિંગડું) (न.) – (१) कलिंगडे. (२) टरबूज
कालुं (કાલું) (वि.) – (१) बोबडे (२) बालिश, समज नसलेले (३) कापशीचे बोंड.
कालां (કાલાં) (न. ब. व.) – लहान मुलाची बोबडी बोली.
– काढवां – बोबडी मधुर बोली बोलणे.
कालांबोबडां (કાલાંબોબડાં) (न. ब. व.) – बोबडी व मोडकी बोली.
कालोर (કાલોર) (स्त्री.) – गवताची गंजी.
काव (કાવ) (पु.) – कावा.
– काढी लेवो – कावा करून काम साधून घेणे.
कावडियुं (કાવડિયું) (न.) – पैसा.
कावडियो (કાવડિયો) (पु.) – कावड उचलून नेणारा.
कावडी (કાવડી) (स्त्री.) – कावड.
– डुं (न.) – कावडीचे लाकूड.
कावडुं (કાવડું) (वि.) – लुच्चे, धूर्त.
कावतरुं (કાવત) (न.) – कपट, कारस्थान
– राखोर, - राबाज (वि.) – कारस्थानी.
कावरी (– ली) (કાવરી-લી) (स्त्री.) – काचेची बांगडी.
कावरुं, - बावरुं (કાવરું,-બાવરું) (वि.) – कावरे बावरे.
कावलुं (કાવલું) (वि.) – अति नाजूक आणि शोभिवंत पण तकलुपी.

कावश (કાવશ) (न.)–शून्यता, रिक्तता.
कावसशा, कावसियो (કાવસશા,કાવસિયો) (पु.)–पक्का-वस्ताद माणूस.
कावळ (કાવળ) (न.)–कपट, कारस्थान.
कावळी (કાવળી) (स्त्री.)–पाणी, दूध इ. वर तरंगणारा पातळ थर.
कावादानी (કાવાદાની) (स्त्री.)–काढा करण्याचे भांडे.
कावादावा (કાવાદાવા) (पु. ब. व,)–कपटकारस्थाने.
कावुं (કાવો) (न.)–(१) छपरावरील कौलांची रांग. (२) (अ. क्रि.) कावणे, कातावणे, कंटाळणे.
कावो (કાવો) (पु.)–(१) बुंद दाणे पाडण्याचे उकळते तेल किंवा तूप (२) काढा.
कावो (पु.)–कावा (२) घोड्याला गोल गोल फिरविणे, घोड्याचा 'राउंड'
काश (–स) (કાશ-સ) (स्त्री.)–(१) आडखीळ, विघ्न (२) चिकटपणा.
काशंडी (–दी) (કાશંડી-દી (स्त्री.)–कासंडी.
काशीए संघ पहोंचवो–गंगेत घोडे न्हाणे.
काशीनुं करवत–पुढल्या जन्मी इच्छित फळ मिळावे म्हणून काशीत जाऊन करवतीने शरीर कापून घेणे.
–मरण–सद्गती
काष्ठ घंटा (કાષ્ઠઘંટા) (स्त्री.)–दांडग्या गुराच्या गळ्यात बांधण्यात येणारे लोंढणे.
काष्ठा (કાષ્ઠા) [सं.] (स्त्री.)–(१) दिशा, प्रदेश (२) हद्द, परिसीमा.
कासद (કાસદ) (पु.)–काशीद, जासूद.
–दुं (न.)–जासूदाचे काम.
कासवास (કાસવાસ) (पु.)–कास (खोकला) व श्वास.
कासळ (કાસળ) (न.)–आडखीळ, विघ्न.
–काढवुं–(१) आडखीळ काढून टाकणे, विघ्न दूर करणे. (२) काटा काढणे.
–जवुं–अडचण मध्ये येण्याचे टळणे.
कासार (કાસાર) [सं.] (पु. न.)–तळे.
काहर (કાહર) (पु.)–भोई, कावडी.
काहल (કાહળ) (पु. न.)–(१) तुतारी, रणशिंग (२) वाजविण्याचे शिंग (३) मोठे ढोल (लष्करी).
काहिली (કાહિલી) (वि.)–(१) आळशी, कामाला कंटाळलेला. (२) आजारी (३) (स्त्री.) आळसुटलेपणा, (४) आजारीपणा (५) कातडीला आग सुटण्याचा रोग, अंगाची काहिली.
काह्युं (કાહ્યું) (वि.)–(१) कावलेले (२) थकलेले, कंटाळलेले (३) आजारी.

काळ (કાળ) (पु.) (१) काळ, वेळ (२) दुष्काळ (३) क्रोध.
–आववो–क्रोध येणे (२) मरण येणे.
–करवो–देहत्याग करणे.
–काढवो–(१) वेळ काढणे (२) दुष्काळाचा आपत्तीचा काळ कंठणे.
–खूटवो–मरण जवळ येणे.
–चढवो–राग येणे.
–थवो–मृत्यू होणे.
–देखवो–यमदूत पाहणे किंवा यमदूतासारखे पाहणे.
–धरवो–राग येणे.
–मांथी आववुं–दुष्काळातून आल्यासारखे वागणे, खाऊ खाऊ करणे, अति भुकेले असणे.
–कराळ (वि.)–(१) काळाप्रमाणे भयंकर. (२) (पु) मृत्यू.
–गळामणुं (वि.)–काळ घालवायला साधन होण्याजोगे.
–चंद्र (पु.)–घातक राशीचा चंद्र.
–चोघडियुं (न.)–घातक मुहूर्त.
–जीभुं (वि.)–घातक-नुकसानकारक जीभ असलेले.
–जूनुं (वि.)–अति प्राचीन.
–ज्वर (पु.)–जीव घेणारा ताप.
–ना कोदरा (पु. ब. व.)–फार जुनी बाब.
–ना कोदरा काढवा–जुनी मढी उकरून काढणे, निंदा करण्याकरिता जुन्या गोष्टी उगाळणे.
–ना खाधा होवा–पुष्कळ वर्षे जगून अनुभवाने पोक्त बनलेले असणे.
–नुं वरस (न.)–दुष्काळी साल.
–निद्रा (स्त्री.) (१)–मृत्यू (२) गाढ झोप.
–भाति (वि.)–काळासारखे.
–मींढ (वि.)–(१) काळे मिचकूट. (२) निष्ठुर (३) (पु.) एक अतिशय काळा आणि कठीण पाषाण, कातळ.
–मुखुं (वि.)–काळाच्या मुखासारखे.
–योग (पु.)–योगायोग.
–वेळा (स्त्री.)–(१) भयंकर वेळ. (२) संध्याकाळ.
–वेलियो (पु.)–(१) मुले चोरून नेणारा (२) लुचा बाबा.
काळक (કાળક) (स्त्री.)–(१) कलंक, डाग (२) काळेपणा.
काळज (કાળજ) (न.)–कलिजा, काळीज.
काळजातूट (કાળજાતૂટ) (वि.)–काळीज तुटेल इतके असह्य–तीव्र.
काळजुं (કાળજું) (न.)–(१) काळीज (२) अंतःकरण, मन.
–कपावुं–कोरावुं–(१) अंतःकरणात तीव्र वेदना होणे, हेवा वाटणे.
–कह्युं न करे एवुं–मानता येणार नाही असे.

–काचुं होवुं–धैर्य, हिंमत नसणे.
–काचुं रहेवुं–मरणासन्न असतानासुद्धा सारखी आठवण करीत राहणे.
–कोतरवुं, -कोरवुं–मनाला संताप करून घेणे.
–खसवुं–मन–बुद्धी संभ्रमित होणे.
–खंडावुं–वेदना, चिंता किंवा मत्सर यामुळे प्राण जातोसे वाटणे.
–खवाई जवुं–अंतःकरणात चिंता किंवा वेदना होणे.
–छोलवुं–संतापणे, व्याकुळ होणे.
–ठरवुं, ठंडुं थवुं–शांती होणे, मनाला संतोष होणे.
–ठेकाणे होवुं–शुद्धीवर असणे.
–तपवुं–संतप्त होणे.
–धडकवुं–काळीज धडधड करणे, भिणे.
–पकडी राखवुं–हिंमत-धैर्य ठेवणे.
–पाकुं होवुं–अनुभवी असणे, फसणार नाही असे असणे.
–फटकी जवुं–आवेशामुळे किंवा धक्क्याने डोके फिरणे.
–फाटी जवुं–काळीज फाटणे, अतिशय दुःख होणे.
–फूटवुं–भान न राहणे, अकलहुषारी नाहीशी होणे.
–फोली खावुं–दुःख घोळीत राहणे.
–बळवुं–अंतःकरणात अतिशय दुःख राहणे.
–बावन हाथनुं होवुं–हुशार-सावध राहणे.
–भराई आववुं–सद्‌गदित होणें, ऊर दाटून येणे.
–रीढुं थवुं–मन कठीण होणे, सरावलेले होणे.
–वश राखवुं–हिंमत न हरणे.
–जानां कटका थवा–हृदयाचे तुकडे होणे.
–जानी कोर–काळजाचा तुकडा, अत्यंत प्रिय मनुष्य.
–जानुं आढुं–हिंमतवान, धीर खचू न देणारा.
–जानुं नर्युं–सावध.
–जानो डंख,-नो डाघ–(१) दारुण आघात (२) हाडवैर, द्वेष.
–जामां चीरा पडवा–अंतःकरणाला तीव्र वेदना होणे.
–जामां कटारी होवी–मनात डंख किंवा कपट असणे.
–जामां कोतरी-कोरी राखेलुं–काळजात कोरून ठेवलेले.
–जा विनानुं–(१) अंतःकरण-जाणीव नसलेले (२) साहसी.
–जे काणुं पडवुं–काळीज भेदून टाकणे.
–जे टाढक बळवी–मन थंड होणे, हृदयाची शांती होणे.
–जे हाथ धरी राखवो–पाहा 'काळजुं पकडी राखवुं'.
काळप (કાળપ) (स्त्री.)–(१) काळेपणा (२) डाग.
काळवेरी (કાળવેરી) (वि.)–काळ्या रंगाचा-ची-चे.
काळंगडुं (કાળંગડું) (न.)–कलिंगडे.
काळा (કાળા) (पु. ब. व.)–कपाळीचा अशुभलेख, दुर्भाग्य.

काळा बजारियो (કાળા બજારિયો) (पु.)–काळाबाजार करणारा व्यापारी.
काळाट (કાળાટ) (पु.)–काळेपणा.
–श (स्त्री.)–(१) काळेपणा (२) सावळा रंग.
काळांजन (કાળાંજન) (न.)–काळे अंजन, सुरमा.
काळांतरे (કાળાંતરે) (अ.)–(१) खूप काळ गेल्यानंतर. (२) काही काळाने (३) कधीतरी.
काळांधोळां (કાળાંધોળાં) (न. ब. व.)–कारस्थान, काळेबेरे.
–करवां–कारस्थान करणे, काळेबेरे घडवून आणणे.
काळियार (કાળિયાર) (पु.)–काळवीट.
काळियुं (કાળિયું) (वि.)–(१) काळ्या रंगाचे (२) (न.) अफू, काळी तंबाखू.
–यो (पु.)–काळी तंबाखू.
–यो बछनाग (पु.)–(लाक्ष.) मनात अतिशय डंख ठेवणारा माणूस.
काळिंगुं (કાળિંગું) (न.)–कलिंगडे.
काळी (કાળી) (वि. स्त्री.)–(१) काळ्या रंगाची (स्त्री) (२) (स्त्री.) काली (देवता)
–कंठी, -गांठी (स्त्री)–स्त्रियांच्या गळ्यातला एक दागिना.
–चौदश(-स) (स्त्री.)–आश्वीन वद्य चतुर्दशी, नरकचतुर्दशी.
–नो ककळाट काढवो–त्या दिवळीं सगळी कचराधाण साफ करणे.
–टीली (स्त्री.)–कलंक, लांछन.
–परज (स्त्री.)–'दूबळा' वगैरे काळ्या रंगाच्या आदिवासी जाती.
–रोटी (स्त्री.)–गोड पुरी, एक मिष्टान्न.
–रात (स्त्री.)–मध्यरात्र, घोर अंधारी रात्र.
–रोळी (स्त्री.)–सांजवेळा.
काळुं (કાળું) (वि.)–(१) काजळी रंगाचे. (२) दुष्ट, अघोर, अनीतिमय (जसे, 'काळुं काम') (३) असह्य, दारुण, तीव्र इ. भाव वाटणारे ('काळो चोर,' 'काळी मजुरी')
काळा अक्षरने कूटी मारवा–अगदी निरक्षर-अशिक्षित असणे.
–अडद-तल-चोरवा–भयंकर पाप करणे.
काळा काळा मंकोडा–अगदी निरक्षर असणे.
–गया ने धोळा आव्या–तरुणपण गेले नि म्हातारपण आले.
काळो चोर (કાળો ચોર)–खुनी किंवा सापडण्याला कठीण असा चोर.
'काळा चोरना लावी आप'–'काय वाटेल ते कर पण माझे देणे देऊन टाक.'
काळा ना धोळा थया–काळ्याचे पांढरे झाले (केस), म्हातारपण आले.

काळा पाणीए काढवुं – हद्दपार करणे.
काळा माथानो मानवी – मनुष्यजात, मनुष्य.
काळां पाणी ओळंगवां – दूर समुद्रापलीकडच्या देशात जाणे, देशांतराला जाणे.
काळुं करवुं – (१) टळणे, दूर जाणे, तोंड न दाखविणे. (२) कलंकित करणे.
–कूतरुं – अत्यंत क्षुद्र, कोणी विचारीत नाही असा-अशी-से.
–गोरुं, -धोळुं, कहेवुं – वाईट हेतूचा आरोप करणे.
–पडवुं – निस्तेज होणे, चेहरा उतरणे.
–पहेरवुं – शोकाची वस्त्रे घालणे.
–मों करवुं – तोंड काळे करणे.
–कट, –ठणक, –डिबांग (वि,) – काळे मिट्ट.
–धोळुं (न.) – दुष्कर्म.
–बल्लक (वि.) – काळे काळे भुतासारखे.
–पाणी (न.) – जन्मठेप.
–बजार (न.) – काळा बाजार.
–भम्मर (वि.) – काळेभोर.
–मेश (वि.) – काळे मिट्ट.
काळो कायदो (કાળો કાયદો) (पु.) – जुलमी कायदा.
काळो कामणगारो (કાળો કામણગારો) (पु.) – मोहिनी टाकणारा काळ्या, श्रीकृष्ण.
काळोतरी (કાળોતરી) (स्त्री.) – मरणाचा समाचार असलेली चिठी.
–तरियो (पु.) – ती चिठी घेऊन जाणारा जासूद.
काळोतरो (કાળોતરો) (पु.) – फणा असलेला नाग.
कांशियां (કાંશિયાં) (न. ब. व.) – झांजाजोड.
कांस (કાંસ) (पु.) – (१) पाणी नेण्यासाठी बांधलेला पाट (२) पाणी वाहून जावे म्हणून केलेली नाली.
कांसकी (કાંસકી) (स्त्री.) – फणी.
कांसको (કાંસકો) (पु.) – कंगवा.
कांसडो (કાંસડો) (पु.) – तलावाचा पलीकडचा काठ.
कांसलुं (કાંસલું) (न.) – काशाचे एक खूप मोठ्या तोंडाचे भांडे, तसराळे.
कांसवुं (કાંસવું) (अ. क्रि.) – (१) खोकणे (२) खाकरणे (३) धापा टाकणे (४) (स. क्रि.) ठासून भरणे.
कांस (કાંસ) (पु. ब. व.) – तण.
कांसार (કાંસાર) (पु.) – कासार.
कांसियो (કાંસિયો) (पु.) – (१) पितळेची पळी (२) कंगवा.
कांसुं (કાંસું) (न.) – कासे (धातु).
–साकूट (स्त्री.) – काशाची मोड.
–साळुं (न.) – काशाची मोठी झांज.
–सां (न. ब. व.) – झांजाजोड.
–सियो (पु.) – काशाचे तसराळे.
–सी (जोड), -सी जोडुं (न.) – काशाची मोठी झांज.
–सी जोडां वगाडवां – (१) धनधान्याचा खडखडाट होणे. भीक मागणे (३) बेकार होणे.
कांस्य (કાંસ્ય) (न.) – कासे.
–कार (पु.) – कासार.
किकलावबुं (કિકલાવવું) (स. क्रि.) – हर्षोत्फुल्ल करणे, आनंदी आनंद होईल असे करणे.
किकियाण (કિકિયાણ) (न.) – किंकाळ्या.
किकियारी (કિકિયારી) (स्त्री.) – किंकाळी.
–रो (पु.) – मोठी किंकाळी.
किंकिणी (કિંકિણી) [सं.] (स्त्री.) – (१) किणकिण करणारी छोटी घंटी, (२) घुंगरू लावलेला करगोटा.
किंकिणाट (કિંકિણાટ) (पु.) – किणकिण आवाज.
किंगलावुं (કિંગલાવું) (अ. क्रि.) – हर्षोत्फुल्ल होणे.
–ण (न.) – हर्षध्वनी.
किचुको (કિચૂકો) (पु.) – चिंचोका.
कितव (કિતવ) [सं.] (पु.) – (१) जुगारी (२) कपटी फसव्या.
किताब (કિતાબ) [अ.] (स्त्री.) – (१) पुस्तक, ग्रंथ.
–खातुं (न.) – ग्रंथभांडार, पुस्तकालय.
–परस्त (वि.) – पुस्तकात डोके खुपसून राहणारा.
कित्तो (કિત્તો) (पु.) – (१) (लिहिण्याचा) फाटा (२) कित्ता, नमुन्याचे हस्ताक्षर. (३) शेताचा तुकडा (४) (अ.) सदरप्रमाणे (म्ह० डिट्टो).
किनखाब (કિનખાબ) (पु.) – (१) जरीबुट्टीचे विणलेले एक कापड. (२) कसब.
किन्नरी (કિન્નરી) (स्त्री.) (१) – किन्नराची बायको (२) सारंगी.
किफायत (કિફાયત) [म.] (स्त्री.) – (१) बचत (२) (वि.) स्वस्त, किफायतशीर.
–ती (वि.) – किफायतशीर, स्वस्त.
किंमत (કિંમત) (स्त्री.) – (१) मूल्य, मोबदला (२) कदर, बूज.
–आंकवी – किंमतीचा अंदाज करणे.
–करवी – (१) मोल करणे (२) कदर करणे.
–थवी – (१) किंमत होणे (२) (कटा०) अब्रू कमी होणे.
–पडवी - बेसवी – किंमत पडणे.
–मूकवी – किंमत ठरविणे, वस्तूवर किंमत लिहिणे.
किरकोल(-ळ) (કિરકોળ) (अ.) – फुटकर.
किरतार (કિરતાર) (पु.) – सृष्टिकर्ता.

किरपा (કિરપા) (स्त्री.) – कृपा.
किरमजी (કિરમજી) (वि.) – किरमिजी रंगाचे.
किरायुं (કિરાયું) (न.) – भाडे.
– यादार (वि.) – (१) भाड्याने राखणारा - राहणारा. (२) भाडेकरी.
किलकार (કિલકાર) (पु.) – आनंदाचा किलकिलाट (२) आनंदाच्या आरोळ्या.
– री (स्त्री.) – किंकाळी, आरोळी.
– वुं (अ. क्रि.) – आनंदाचा किलकिलाट करणे.
किलकारी पाडवी - मारवी – (जोराने) आरोळ्या ठोकणे, किंकाळ्या मारणे.
किल्लाण (કિલ્લાણ) (न.) – पक्ष्यांचा किलबिलाट.
किश्त(-स्त) (કિશ્ત-સ્ત) [फा.] (स्त्री.) – (१) बुद्धिबळाचा एक एक डाव, शह (२) शेतीची पेरलेली जमीन.
किश्ती(-स्ती) (કિશ્તી) [फा.] (स्त्री.) – होडी.
किसम (કિસમ) (स्त्री.) – जात, प्रकार, रीत.
किसमिस (કિસમિસ) (स्त्री.) – बेदाणा.
किस्त (કિસ્ત) [फा.] (स्त्री.) – (१) महसुलाचा वगैरे हप्ता (२) महसूल (३) खंडणी, करभार.
– बंधी (स्त्री.) – हप्तेबंदी.
किस्मत (કિસ્મત) [अ.] (न.) – नशीब.
किस्सो (કિસ્સો) [अ.] (पु.) – (१) कहाणी, अद्‌भुत कथा, हकीकत (२) कल्पित गोष्ट.
– उठाववो, - गोठववो – युक्ती करणे, शक्कल काढणे.
– करवो – युक्ती करणे.
किंवदन्ती (કિંવદન્તી) [सं.] (स्त्री.) – अफवा.
कीकरो (કીકરો) (पु.) – किकरे, एक सुतारी अवजार.
कीकलावुं (કીકલાવું) (अ. क्रि.) – आनंदाचा कलकलाट करणे.
कीकली (કીકલી), (स्त्री.) – छोटी मुलगी,
– लो - कीको (કીકો) (पु.) – छोटा मुलगा, बच्चा.
कीकी (કીકી) (स्त्री.) डोळ्यातली बाहुली.
कीच,(-ड) (કીચ,-ડ) (पु.) – चिखल.
कीट (કીટ) (वि.) – (१) चांगले पाठ केलेले. (२) पूर्ण माहितगार, तरबेज.
कीट (पु.) – (१) कळंक, (२) कचरा, कस्पट (३) गड्डा, गांठ.
कीट(-क) (કીટ) [सं.] (पु.) – किडा.
कीट(-ड)खदुं (કીટખદું) (वि.) – किड्यांनी खाल्लेले.
कीटियुं (કીટિયું) (न.) – (१) लाकडी पट्टी (२) कचरा - कस्पट असलेले.
कीटी (કીટી) (स्त्री.) – कापसात जो पाळापाचोळा किंवा कचरा भरलेला असतो तो.
कीट्टुं (કીટ્ટું) (न.) – बेरी.
कीटो,(-डो) (કીટો,-ડો) (पु.) – (१) विटा किंवा कौले भाजल्याने वितळून घट्ट झालेली माती (२) वितळून नंतर घट्ट झालेली धातू. (३) बाभळीच्या लाकडाची गाठ.
कीड (કીડ) (स्त्री.) – (१) कीड, वाळवी. (२) गजकर्णासारखा रोग. (३) खाज.
कीडियुं (કીડિયું) (न.) – अगदी लहान काचेचा मणी.
कीडी (કીડી) (स्त्री.) – मुंगी.
– उपर कटक – एवढ्याशा गोष्टीकरिता मोठा खटाटोप, विनाकारण आणि अवास्तव प्रयत्न.
– ना मोंने(-मां) कालिंगडुं – (१) मिया मूठभर दाढी हातभर. (२) आवाक्याबाहेरचे.
– ने पांखो आववी – (१) पावसाळ्याची चिह्ने दिसू लागणे, (२) नवी शक्ती येणे.
– नो कुंजर, - वाघ – पराचा कावळा.
– ओ ऊभरावी – मुंग्यांसारखे माणसांचे थवे लोटणे.
– ओ चडवी – (काम करताना) कंटाळा येणे, नावड वाटणे.
– कंथवो (पु.) – कीडमुंगी.
– म(-मं) कोडी (स्त्री.) – कीडमुंगी वगैरे.
– वेग (पु.) – मुंगीसारखा सावकाश वेग.
कीडो (કીડો) (पु.) – पोटावर चालणारा एक लहान किडा.
कीडा सळवळवा – (लाक्ष.) बोलल्यावाचून न राहवणे.
कीधुं (કીધું) (स. क्रि.) – केले. ('करवुं'च्या भूतकाळच्या एकवचनाचे एक रूप)
कीधुं (स. क्रि. भूत०) – सांगितले. ('कहेवुं'च्या भू. का.च्या एकवचनाचे एक रूप)
कीनो (કીનો) [फा.] (पु.) – वैर, डंख (मनांतला).
– नाखोर (वि.) – मनात वैर ठेवणारा-री-रे.
कीमत (કીમત) [अ.] (स्त्री.) – किंमत.
– ती (वि.) – बहुमोल.
कीमियो (કીમિયો) (पु.) – (१) किमया (२) जादू, युक्ती. (३) सहजासहजी पुष्कळ द्रव्य मिळेल किंवा फायदा होईल अशी युक्ती किंवा धंदा किंवा वस्तू.
– यागर [फा.] (पु.) – (१) किमया माहीत असलेला मनुष्य. (२) युक्तिबाज किंवा कलावान मनुष्य (३) फसव्या.
कीर (કીર) (पु) – पोपट.
कीरच (કીરચ) (स्त्री) – (१) अगदी पातळ फाक. (२) संगीन (बंदुकीच्या टोकाला लावतात ती).
कीरत (કીરત) (स्त्री.) – कीर्ती.
कीरतनियां (કીરતનીયાં) (न. ब. व.) – झांजाजोड.
– नियो (पु.) – कीर्तनकार.

खर(-रा,-ळा)वाड (ખરવાડ) (स्त्री.) – गावचे मोकळे मैदान ज्यात खळी करतात ते.

खरवाण (ખરવાણુ) (वि.) – दुःख सहन करण्याची शक्ती असलेले.

खरवुं (ખરવું) (अ. क्रि.) – (१)खरणे, गळून पडणे. (२) वरून खाली पडणे (३) (लाक्ष.) हार खाऊन बाजूला होणे – निघून जाणे.

खरतुं करवुं, - मूकवुं – तसेच टाकणे.

खरता तारा देखाडवा – (दिवसाढवळ्या) ठार मारणे, मरणासन्न करणे.

खरसट (ખરસટ) (वि.) – खडबडीत.

खरसलुं (ખરસલું) (न.) – गवत किंवा गवताचे पान किंवा काडी.

खरसूरुं – (लुं) (ખરસૂરું) (वि.) – जरा खारट.

खराई (ખરાઇ) (स्त्री.) – आजारीपणात नाउमेद न होता सहनशीलता ठेवणे.

खराखरी (ખરાખરી) (स्त्री.) – (१) सच्चाई (२) रुजुवात. (३) (लाक्ष.) कसोटीची वेळ.

खराड (ખરાડ) (स्त्री.) – (१) सुकून गळलेला पालापाचोळा किंवा डहाळ्या वगैरे (२) घसारा, घट.

खराद (ખરાદ) (स्त्री.) – घाड (लाकूड, हस्तीदंत वगैरे कातण्याचा)

– वुं (स. क्रि.) – घाडकाम - कातकाम करणे.

– दी (पु.) – घाडकाम करणारा कारागीर.

खराब (ખરાબ) [अ.] (वि.) – (१) वाईट, खट (२) अनीतिमान, भ्रष्ट.

– करवुं – (१) बिघडविणे, (२) (पैसे) वाईट कामाकरिता खर्चणे. (३) एखाद्याचे वाईट करणे.

– थवुं – (१) बिघडणे (२) बाटोळे होणे.

– खस्त(-स्ता) (वि.) – अत्यंत खराब; (२) सत्यानाश झालेले.

– बीनो खाटलो (पु.) – दुःख, सत्यानाश.

खरी (ખરી) (स्त्री.) – खूर.

खरीतो (ખરીતો) (पु.) – (१) सरकारी कागदपत्रांचा मोठा लखोटा. (२) खलिता.

खरीद (ખરીદ) [फा.] (स्त्री.) – खरेदी.

– दार (वि.) – खरेदीदार.

खरीदाववुं (ખરીદાવવું) (स. क्रि.) – खरेदी करायला लावणे.

खरीदावुं (ખરીદાવું) (अ. क्रि.) – खरीदले जाणे.

खरीदियो (ખરીદિયો) (पु.) – खरेदीदार.

खरीदी (ખરીદી) (स्त्री.) – खरेदी.

खरीपट्टी (ખરીપટ્ટી) (स्त्री.) – गावाला देण्यातून मुक्त करण्यासाठी केलेली वर्गणी.

खरीफ (ખરીફ) [अ.] (स्त्री.) – पावसाळ्यातले पीक.

खरुं (ખરું) (वि.) – (१) खरे, यथार्थ (२) शुद्ध, अस्सल (३) प्रामाणिक (४) भाजून कडक केलेले किंवा झालेले (जसे, 'खरी रोटली,' 'खरूं शाक'), (५) बरोबर, ठीक, कमीजास्त नसलेले (जसे, 'खरा बपोर' 'खरा परसेवानुं' इ.) (६) 'भलें,' 'बरोबर' असा आश्चर्यदर्शक उद्‌गार म्हणून या शब्दाचा वापर करतात. (जसे, 'तमे तो खरी वात काढी!' 'आ तो खरुं काम काढ्युं!' इ.)

– करवुं – (१) पक्के करणे (२) रुजुवात करून देणे.

– खोटुं करावबुं – खरेखोटे प्रत्यक्षच ठरविणे.

– पडवुं – खरे ठरणे किंवा तसे सिद्ध होणे.

खरा करवा – आजारातून उठणे.

– परसेवानुं – खऱ्या मेहेनतीचे, हक्काने मिळविलेले.

– बपोर – बरोबर मध्याह्नीचा वेळ.

खरो आंकडो – शेवटचा निश्चित आकडा.

खरापणुं (ખરાપણું) (न.) – खरे असणे, सत्यता.

खरा बोलुं, – राबादी (वि.) – सत्यवादी.

खरुं लोढुं (न.) – पोलाद.

खरे (ખરે) (अ.) – (१) खरोखर, खचित. (२) नक्की.

– रे(-रो)खर, – रेखात (अ.) – खरोखर, खचित.

– रेखरुं (वि.) – खरेखुरे.

खरेटवुं (ખરેટવું) (स. क्रि.) – विकणे.

खरे(-रें)टी (ખરે-રેં-ટી) (स्त्री.) – चिखल सुकल्यानंतर भेगाळलेली जमीन.

खरे(-रें)टुं (ખરે-રેં-ટું) (न.) – (१) नुकत्याच व्यालेल्या गायी-म्हशीचा चीक. (२) देवाला संकट पडणे.

खरेटो (ખરેટો) (पु.) – (१) ओघळ, ओघळाचा डाग. (२) खरपुडी.

खरेडी (ખરેડી) (स्त्री.) – कप्पी, 'पुली,' गडगडी.

खरेरो (ખરેરો) (पु.) – खरारा.

खरो (ખરો) (पु.) – टाच (जोडयाची).

खर्व (ખર્વ) [सं.] (वि.) – (१) व्यंग - खोड असलेले, अपंग, अपुरे (२) टेंगणे.

खलक (ખલક) [अ.] (स्त्री.) – (१) जग, दुनिया. (२) संसार, मनुष्यजात.

खलको (ખલકો) (पु.) – फकिराचा पोषाख.

खलतो (ખલતો) (पु.) – कप्पे कप्पे असलेला थैला, मोठा बटवा.

खल(-ले)ल (ખલ-લે-લ) [अ.] (स्त्री. न.) – (१) हरकत, अडचण. (२) नुकसान.

– नाखवुं, - पहोंचाडवुं, - पडवुं – हरकत किंवा नुकसान होईल असे करणे.

—पडवुं, -पहोंचवुं—हरकत किंवा नुकसान होणे.
खलवां (ખલવાં) (न. ब. व.)—भजी.
खलवुं (ખલવું) (स. क्रि.)—खळणे.
खला (ખલા) [अ.] (पु.)—जेथे कोणी नाही असे - निर्जन स्थळ.
खला(-ळा)वुं (ખલા-ળા-વું) (अ. क्रि.)—(१) अडून राहणे, (२) खलले जाणे.
खलास, -सी (ખલાસ-સી) (पु.)—खलासी.
—सण (स्त्री.)—खलाशाची बायको.
खली (ખલી) (स्त्री.)—खार.
खली(-ळी) (स्त्री.)—(१) खळे (२) कडधान्याची डाळ करण्याची जागा.
खलीफात, -फी (ખલીફાત, ખલીફી) (स्त्री.)—(१) खलीफाचे पद (२) खलीफाची गादी किंवा सत्ता.
खलेची (ખલેચી) (स्त्री.)—कप्पे असलेली थैली.
खलेडी(-री) (ખલેડી-રી) (स्त्री.)—खार.
खलेलुं(-वुं) (ખલેલું-વું) (न.)—(१) खारीक (२) खजूर (३) खजूरी.
खले(-ळे)ळवुं (ખલે-ળે-ળવું) (अ. क्रि,)—मुतणे.
खवडा(-रा)ववुं (ખવડા-રા-વવું) } खाऊ घालणे, खायला
खवाड(-र)वुं } लावणे.
खवळवुं (ખવળવું) (अ. क्रि.)—(१) जमिनीवर किंवा बिछान्यावर लोळणे (२) खाजवून कातडे काढणे (३) खवळणे.
खवावुं (ખવાવું) (अ. क्रि.)—(१) खाल्ले जाणे (२) गंजणे किंवा कीड लागणे, क्षीण होणे.
खवास (ખવાસ) [म.] (पु.)—हुजऱ्या (२) एखाद्या वस्तूचे वैशिष्ट्य - विशेष गुणधर्म (३) स्वभाव.
—ण(-णी) - सी (स्त्री.)—दासी (२) हुजऱ्याची बायको.
खशकूलुं (ખશકૂલું) (वि.)—ठेंगणे.
खसि(-सि)याणुं (ખશિ-સિ-યાણું) (वि.)—शरमिंदे.
—पडवुं—शरमिंदे होणे.
खसकवुं (ખસકવું) (अ. क्रि.)—सरकणे.
खसको (ખસકો) (पु.)—खाच.
खसबो, -ई (ખસબો, ખસબોઈ) (स्त्री.)—सुगंध.
खसम (ખસમ) [अ. (पु.)—पती.
खसर (ખસર) (स्त्री.)—लहानशी चाच.
—को (पु.)—(१) खाच, चाच. (२) ओरखडा.
—वुं (स. क्रि.)—(१) तास मारणे, खाचरे पाडणे (२) निशाणी करणे, रेघ मारणे.
खसरियो (ખસરિયો) (पु.)—रेघणी
खसरो (ખસરો) (पु.)—(१) रेघ (२) ओरखडा.
खसलत (ખસલત) [अ.] (स्त्री.)—(१) सवय (२) वैशिष्ट्य (३) स्वभाव.
खसली (ખસલી) (स्त्री.)—जनावरांना खायला घालण्याचे वाळलेले गवत.
खसलुं (ખસલું) (न.)—गवत, गवताची काडी.
खसवुं (ખસવું) (अ. क्रि.)—(१) सरकणे, एका बाजूला होणे (२) निसरणे (३) (लाक्ष.) करार - वचन - मत इ. बदलणे.
खसी(-स्सी) (ખસી-સ્સી) (स्त्री.)—खच्ची करणे (अंड - वृषण)
खसूस, -न (ખસૂસ, ખસૂસન) [अ.] (अ.)—(१) अवश्य, खचित (२) विशेषेकरून.
खसेडवुं (ખસેડવું) (स. क्रि.)—दूर करणे, - सारणे.
खसोटी (ખસોટી) (स्त्री.)—टो (पु.)—ओटी.
खस्त (ખસ્ત) [फा.] (वि.)—अस्ताव्यस्त टाकलेले, विस्कटलेले.
खळ (ખળ) (वि)—लुच्चा, शठ.
—पण (नं.), -ताई (स्त्री.)—शठता, लुच्चेगिरी.
खळकवुं (ખળકવું) (अ. क्रि.)—(१) शोभणे, चमकणे (२) खडखडणे.
खळको (ખળકો) (पु.)—(१) उक्ती रकम, अमुक इतकी रकम (२) जत्था, समुदाय (३) खळखळ करीत जाणारा पाण्याचा प्रवाह.
खळभळ (ખળભળ) (स्त्री.)—(१) गडबड, गोंगाट (२) मनाची अस्वस्थता - चुळबुळ - घबराट.
—ती ऊठवुं—(१) क्षोभ होणे (२) घाबर - कंप सुटणे.
खळवुं (ખળવું) (अ. क्रि.)—(१) थबकणे, अटकणे (२) (स. क्रि.) खळ लावणे (३) खळणे.
खळियाण (ખળિયાણ) (न.)—आरडाओरडा, रडारड, दंगा.
खळुं (नं)—खळे.
—खळां मागवां—खळ्यावर जाऊन धान्याची भीक मागणे.
—खळुं करवुं—खळ्यात धान्य काढण्याची क्रिया करणे.
खाई—(ખાઈ) (स्त्री.)—(१) खोल खड्डा, खाई (२) खंदक (३) गावातले पाणी जाण्याकरिता खोदलेली नाली. (४) खाण्याची वस्तू, चरितार्थाचे साधन.
—बंधी (स्त्री.)—रक्षणाकरिता खंदक खोदणे.
खाई खपूसीने } (ખાઈખપૂસીને) } (अ.)—चिकाटीने, हात
खाईपीने } धुवून.
खाई बदेलु (ખાઈબદેલું) (वि.)—पक्के, अनुभवी, युक्तिप्रयुक्ती करण्यात वाकबगार.
खाउकड(-ण) (ખાઉકડ-ણ) (वि.)—खा खा करणारे.
खाउकी (ખાઉકી) (स्त्री.)—(१) लाच (२) आहाराचा पदार्थ.
—करवी—(१) खाण्याचा पदार्थ चोरणे (२) लाच घेणे.

खाउघर(-रुं) (ખાઉઘર-રૂં) (वि.)–(१) खा खा करणारे, खादाड (२) लाचखाऊ.
–रावेडा (पु. ब. व.)–खादाडपणा करणे.
खाउपात्र (ખાઉપાત્ર) (वि.)–(१) लोभी (२) लाचखाऊ.
खाएश (ખાએશ) (स्त्री)–इच्छा, अभिलाषा.
खाक(-ख) (ખાક-ખ) [फा.] (स्त्री.)–(१) राख, धूळ (२) जाळलेली धातू (३) नाश.
खाकसार (ખાકસાર) [फा.] (वि.)–(१) पायातळच्या धुळीसारखे, अंकित, नम्र (२) पामर, क्षुद्र.
खाकान (ખાકાન) [तुर्की] (पु.)–सुलतान, बादशहा.
–नी (वि.)–शाही.
खाकी(-खी) (ખાકી-ખી) (वि.)–(१) राख फासलेले, धूळ भरलेले (२) राखी रंगाचे (३) खाकी रंगाचे. (४) (लाक्ष.) ऐहिक, या मातीमधले.
खाखरी (ખાખરી) (स्त्री.)–(१) लहानसा गाकर, पोळी (२) तंबाखूची सुकलेली पाने.
–रो (पु.)–शेकून कडक केलेली पोळी.
खाखसूस (ખાખસૂસ) (अ.)–खचित.
खाखाबीखी (ખાખાવીખી) (वि.)–(१) छिन्नभिन्न (२) त्रस्त, दुःखी (३) (स्त्री.) धूळधाण.
खाखी (ખાખી) (वि.)–(१) निर्धन (२) (न.) खाकी रंगाचा कपडा.
–बंगाळी(-ळी) (वि.) पोट रिकामे पण मिशीला तूप लावून फिरणारा.
–बावो (पु.)–राख फासलेला बुवा.
खांखडियुं (ખાંખડિયું) (वि.)–(१) खोकला झालेले (२) (न.) खोकला, ढास.
खांखणी (ખાંખણી) (स्त्री.)–(१) क्रोधवचन (२) क्रोध (३) आत खडखड वाजणारा सुका बदाम.
खांखत,(-द) (ખાંખત,-દ) (स्त्री.)–(१) बारीकसारीक पंचाईत (२) सतत एकाद्या कामाविषयी काळजी बाळगणे, (३) तिटकारा, वीट.
खांखरोटवुं (ખાંખરોટવું) (स. क्रि.)–तेल थोडे थोडे चोळणे.
खांखांखोळा (ખાંખાંખોળા) (पुं. स. व.)–अगदी कोनाकोपऱ्यात शोधाशोध करणे.
खांग (ખાંગ) (पु.)–खापराचा गोल तुकडा, जिभली. (२) अतिशय उष्णतेने वितळलेला विटांचा किंवा खापरांचा रस.
–ड,-डको (पु.)–विटेचा-खापराचा तुकडा.
खांगडीथुं (ખાંગડીથું) (न.)–शंख-शिंपल्यात राहणारा जीव.
खांगडो (ખાંગડો) (पु.)–शंख-शिंपला-कवडीसारखे किड्याचे घर.
खांगु (ખાંગુ) (पु.)–गुप्तहेर (२) खड्डा.
खांगुं (ખાંગું) (न.)–(१) एका बाजूने उताणी (कवडी किंवा फासा) (२) टेबलाचा खाना.
खाज (ખાજ) (न.)–(१) खाद्यपदार्थ, खाजा (२) (स्त्री.) खरूज, खाज.
खाजली (ખાજલી) (स्त्री.)–एक खाद्यपदार्थ.
–लुं (न.)–(१) एक खाद्यपदार्थ (२) वर्तुळ, गोल, कोंडाळे.
खाजासरा (ખાજાસરા) (पु.)–हिजडा.
खाजुं (ખાજું) (न.)–एक खाद्यपदार्थ.
खांच (ખાંચ) (स्त्री.)–(१) खाच, चाच (२) अडचण, गुंत (३) खोट, नुकसान (४) हिसका (५) जमा आणि खर्च यांचा ताळा न मिळणे, बादतूट.
–को (पु.)–खाच (२) हिसका, धक्का.
–खूंच (स्त्री.)–(१) खाचखोच. (२) बारकावा.
–ड (स्त्री.)–(१) टेकडीच्या बाजूने जाणारी अरुंद वाट, (२) खिंड.
–रो (पु.)–खाच, खाचर.
खांचाखूंची (ખાંચાખૂંચી) (स्त्री.)–लहानसान खड्डे (२) गल्लीकुची, बोळकंड.
खांचो (ખાંચો) (पु.)–(१) चाच, खाडा. (२) अरुंद वाट, बोळकंड (३) कोपरा, वळण (४) (लाक्ष.) हरकत.
–आववो–हरकत येणे.
–करवो–खाच काढणे.
–काढवो–(१) बांधा उभा करणे, हरकत आणणे (२) कोपरा-वळण-काढणे. (गल्लीत, रस्त्यात वगैरे).
–पडवो–(१) हरकत उत्पन्न होणे (२) रस्त्याला एकदम वळण येणे (३) सुतकामुळे वगैरे विघ्न उत्पन्न होणे.
–पाडवो–(१) हरकत आणणे (२) खाच काढणे.
–राखवो–(१) वळण किंवा बोळ ठेवणे (२) हरकत किंवा संशय ठेवणे.
खांचवुं (ખાંચવું) (सं. क्रि.)–(१) ओढून-ताणून धरणे, मागे हटविणे (२) (सं. क्रि ) थबकणे.
खांज (ખાંજ) (न.)–लंगडेपणा.
खांजण (ખાંજણ) (स्त्री.)–खाजण, समुद्राचे पाणी भरतीच्या वेळी येऊन भरते ती जागा.
खांजरुं (ખાંજરું) (न.)–(१) कोपरा, एका कोपऱ्यातली (अप्रकट) जागा (२) कुंटणखाना (३) कोठार, धान्य साठविण्याची जागा.
–रे नाखवुं–कोपऱ्यात टाकून देणे, लक्ष न देणे.
–रे पडवुं–कोपऱ्यात पडणे; कोणाच्याही नजरेला न येणाच्या स्थितीत असणे.

खाट (ખાટ) (स्त्री.) – (१) झोपाळा. (२) लाभ.
खाटकी (ખાટકી) (पु.) – खाटीक.
खाट खटुंबटु (ખાટખટુંબટું) (वि.) – मधुर आंबट.
खाटली (ખાટલી) (स्त्री.) – (१) लहान खाट. (२) तिरडी.
– लो (पु.) – (१) खाट, पलंग, चारपायी. (२) (लाक्ष.) आजारीपण. (३) प्रसूती.
– ले पडवुं – आजारी पडणे.
– लेथी पाटले ने पाटलेथी खाटले – खाटेवरून पाटावर नि पाटावरून खाटेवर.
– लो आववो – प्रसूतीची वेळ येणे.
– उपरो थवो – आजारीपण संपल्याने खाट उभी करून ठेवणे.
– ढाळवो – (१) खाट टाकणे. (२) खाटेवर बिछाना करणे.
– ऊभो करवो – खाट उभी करून ठेवणे.
– करवो – आजार आणणे.
– खेंचवो, – ताणवो – खाटेची नवार किंवा दोरी ओढून तंग करणे.
– थवो – आजार येणे.
– पाथरवो – खाट टाकून तीवर बिछाना करणे.
– भरवो – खाटेला नवार दोरी गुंडाळणे.
– भोगववो – आजार काढणे.
– होवो – (१) आजारी असणे. (२) बाळंत असणे.
खाटलावश (ખાટલાવશ) (वि.) – (बाळंत होऊन किंवा आजारी पडून) अंथरुणावर खिळलेला - ली - ले.
खाटवुं (ખાટવું) (स. क्रि.) – फायदा मिळविणे.
खाटी जवुं – (१) कमावणे, मिळवून टाकणे. (२) चडफडाट होणे.
खाटसवादुं(-दियुं) (वि.) – आपला संबंध नसलेल्या बोलण्यात तोंड घालणारे, चोंबडे.
खाटीमीठी (ખાટીમીઠી) (स्त्री.) – मधुर आंबट चकती किंवा गोळी.
खाटुं (ખાટું) (१) आंबट. (२) आंबट तोंडाचे, नाराज.
– खारुं चाखवुं – जगातील सुखदुःखांचा अनुभव घेणे.
– थवुं – (१) बिघडणे. (२) मन नाराज होणे.
– मोळुं थवुं (थई जवुं) – बिनसणे.
– चड, - चूना जेवुं (वि.) – आंबटढाण.
खाड (ખાડ) (स्त्री.) – खंदक, खड्डा.
– डी (स्त्री.) – (१) खाडी (२) समुद्राच्या भरतीचे पाणी जेथपर्यंत नदीत घुसते तो भाग. (३) गटार, मोरी
खाडुं (ખાડું) (न.) – म्हशींचा घोळका.
खाडो (ખાડો) (पु.) – (१) खड्डा. (२) खोट, नुकसान.
– पडवो – नुकसान येणे, खड्डा पडणे.
– पूरवो – (१) नुकसान - खड्डा - भरून काढणे. (२) आत्महत्या करणे.
खाडामां उतारवुं, - नाखवुं – (१) नुकसानीत आणणे. (२) बाटोळे करणे.
– पडवुं – (१) चूक करणे. (२) नुकसान ओढवून घेणे. (३) देणे करून ठेवणे.
खाडा जाजरुं (ખાડાજાજરૂ) (न.) – घराचा - खड्ड्याचा संडास.
खाडाळुं (ખાડાળું) (वि.) – खळगे असलेले.
खाडो खडियो, – खैयो (ખાડો ખડિયો, - ખૈયો) खाचखळगे.
खाण (ખાણ) (स्त्री.) – (१) खाण (१) धान्य भरण्याकरिता केलेले पेव (३) उत्पत्तिस्थान (४) धारेवर पडणारी खाच, खांड; (५) (न.) जनावरांना शिजवून खाऊ घालण्याचे धान्य.
– नीकळवी, - मळवी – खाण सापडणे.
– कढाववी, काढवी – धारेवर पडलेली खांड घासून नाहीशी करणे.
– पडवी – खांड पडणे.
– पूरवी – ढोरांना शिजविलेले अन्न खाऊ घालणे.
खाणियो (ખાણિયો) (पु.) – खाणीतला मजूर.
खाणां (ખાણાં) (न. ब. व.) – मुलांचे उखाणे.
खाणीपीणी (ખાણીપીણી) (स्त्री.) – खानपान.
खाणुं (ખાણું) (न.) – (१) जेवण (२) मेजवानी (३) मरणाचा खाण्यापिण्यात पाळला जाणारा शोक.
– आपवुं – निमंत्रण देऊन भोजन घालणे, मेजवानी देणे.
– खराब थवुं – (१) आजीविका बंद होणे (२) मध्येच विघ्न येणे.
– पाळवुं – खाण्यापिण्यात शोक पाळणे.
खांट (ખાંટ) – (१) एक ज्ञाती (२) (वि) लबाड, धूर्त.
खांटु (ખાંટુ) (वि.) – लबाड, धूर्त, पक्के.
खांड (ખાંડ) (स्त्री.) साखर.
– खावी – वाजवीपेक्षा जास्त चांगले, किंवा खूष होण्याजोगे, मानून घेणे.
– पाथरवी, - पीरसवी, - भभराववी - भरवी, - बापरवी – गोड गोड बोलून खुशामत करणे, साखर पेरणे.
– खाजुं (न.) – साखरेत भरलेला खाऊ.
– नुं नाळियेर (न.) – ज्यातून काहीही काढून टाकण्याजोगे नाही अशी वस्तू किंवा गोष्ट.
खांडकूट (ખાંડકૂટ) (स्त्री.) (१) कांडणे-कुटणे, तसले किरकोळ काम (२) (लाक्ष.) मनाचा उच्चार, घबराट.
खांडणियुं (ખાંડણિયું) (न.) – मुसळ.
– यो (पु.) – उखळ.
– यामां घालीने खांडवुं – आपल्या पंजात घेऊन जुलूम करणे.
– यामां माथुं मूकीने सूवुं – धोक्यात राहणे.
खांडणी (स्त्री.) – लहान उखळ.

–पराई (स्त्री.)–उखळ आणि मुसळ.
–णुं (न.)–कांडणे, (२) कांडण्याची वस्तू किंवा काम (३) मुसळ.
–वुं (सं. क्रि.)–(१) कांडणे, (२) कुटणे (३) चकाचूर-सत्यानाश करणे.
खांडियुं (वि.)–तुटलेले-मोडलेले (२) व्यंग किंवा दोष असलेले (३) मोडक्या शिंगांचे (४) (न.) मोडक्या शिंगांचे ढोर (५) म्हैस, रेडकू.
खांडी (ખાંડી) (स्त्री.)–खंडी.
–बंध (वि.)–खंडोगणती, पुष्कळ (२) (अ.) खंडोगणती
खांडु (ખાંડું) (वि.)–खांड पडलेले, मोडलेले, तुटलेले.
खांडुं (न.)–(१) साधी किंवा दुधारी तलवार (२) (लाक्ष.) वराऐवजी त्याची तलवार घेऊन जाणारे वऱ्हाड-जानोसा.
–मोकलवुं–वराऐवजी त्याची तलवार घेऊन जानोसा पाठविणे.
–डाजंगी–(स्त्री.)–तलवारींनी द्वंद्व युद्ध, झपाझपी.
–डाधर (वि.)–खड्गधारी.
खांडेरुं (ખાંડેરું) (न.)–उंट
खात (ખાત) [स.] (वि.)–खोदलेले.
–मुरत,-मुहूर्त (न.)–पाया घालण्याचा मंगल मुहूर्त किंवा विधी.
खातमो (ખાતમો) (पु.)–(१) शेवट (२) मरण.
खातर (ખાતર) (न.)–खत.
–णी (स्त्री.)–गोवऱ्यांनी भरलेली गाडी.
–उपर,–(पाछळ), दिवेल–नुकसानीत आणखी नुकसान.
–नाखवुं–खत घालणे–देणे.
–भरवुं–गाडीने शेतात खत वाहून नेणे.
–पूंजो–खत होण्याजोगा गदाळा, शेण इ. चा ढीग.
खातर (न.)–(१) चोराने भिंतीला पाडलेले भोक किंवा भगदाड (२) चोरी.
–पडवुं–चोरी होणे.
–पाडवुं–(१) चोरीकरिता भिंत फोडणे. (२) चोरी करणे.
–पडो,-पाडु (पु.)–भिंत फोडणारा, चोर.
–रियुं (न.)–घर फोडण्याचे चोराचे हत्यार.
–री (पु.)–चोर
खातर (स्त्री.)–(१) चाकरी, सरबराई (२) समर्थन, तरफदारी (३) (अ.) करिता ('एनी खातर').
–जमा,-निशा–रुजुवात, शाबिती, पुरावा.
–दार (वि.)–(१) सेवाचाकरी करणारा (२) समर्थक, बाजू घेणारा.
–दारी (स्त्री.)–(१) सेवाचाकरी (२) समर्थन.
–बरदाश(-स) (स्त्री.)–आगतस्वागत, सरबराई.
खातरवुं (ખાતરવું) (स. क्रि.)–(१) जमिनीत खत घालणे. (२) शिव्या देणे.
खातरियो (ખાતરિયો) (पु.)–भूतपिशाच्या विद्येत तरबेज असलेला माणूस, मांत्रिक.
खातरी (ખાતરી) (स्त्री.)–(१) खात्री, विश्वास. (२) निःशंकपणा, निश्चितता (३) पुरावा.
–पडवी–खात्री पटणे.
–दार (वि.)–खात्री असलेला-ली-ले.
–बंध,-पूर्वक–खात्रीने.
खातांपीतां (ખાતાંપીતાં)–निर्वाहाचा खर्च काढताना.
खातुं (ખાતું) (न.)–(१) खातेवार जमाखर्च (२) देण्या-घेण्याचा हिशेब (३) विषय, प्रकरण (४) विभाग (कामकाजाचा).
–उघाडवुं,-खोलवुं–(१) नवा विभाग उघडणे (२) नवे खाते घालणे.
–चलाववुं–पैसा ठेवणे–काढणे चालू ठेवणे.
–चालवुं–(१) पैशाचा व्यवहार चालणे (२) स्वतंत्र विभाग म्हणून काम चालणे.
–चुकते करवुं,-चूकवी देवुं–देणे देऊन मोकळे होणे.
–पडाववुं,-पडावी लेवुं–येण्याबाबत कर्जदाराकडून लेखी कबुलायत करून घेणे.
–पाडवुं–(१) वहीखात्यात एखाद्याचे खाते नव्याने उघडणे (२) देण्याच्या करारावर सही करणे.
–मांडी वाळवुं–राहिलेली येण्याची रकम नुकसानखाते समजून देण्याघेण्याचा हिशेब बंद करणे.
–बंध करवुं–(१) देण्याघेण्याचा व्यवहार बंद करणे (२) आपल्या खात्यात जो पैसा निघत असेल तो काढून घेऊन खाते बंद करणे. (३) शेवटच्या हिशेब काढून तो नव्या खतावणीत लिहून चालू हिशेब बंद करणे. (४) कामाचा विभाग बंद करणे.
–सरभर करवुं–जमा-नावेच्या दोन्ही बाजू-आकडे-बरोबर करणे.
–तावंधी (स्त्री.)–जमीनमहसुलाची रयतवारी पद्धती.
–ताबाकी (स्त्री.)–खात्यावर बाकी निघते ती.
–तावही (स्त्री.)–खतावणी वही.
–तांपोतां (न. ब. व.)–(१) देण्याघेण्याचे हिशेब (२) त्याची वही.
–तापत्रं (न.)–(१) देण्याघेण्याचा व्यवहार (२) देण्या-घेण्यासंबंधीचे लिखाण.
खातुंपीतुं (ખાતુંપીતું) (वि.)–चरितार्थाचे साधन व्यवस्थित असलेले सुखवस्तू (घर).

खाते (ખાતે) (अ.)–(१) नावे, नावावर, हिशेबावर (२) ठिकाणी (जसे, 'मुंबई खाते').
खातून (ખાતૂન) [तुर्की] (स्त्री.)–मोठ्या घरची स्त्री, बेगम.
खाध (ખાધ) (स्त्री.)–(१) आहार, अन्न (२) खोट, नुकसान. (३) खोड, व्यंग (हिऱ्या-मोत्यात).
–खोराकी | (स्त्री.)–भरणपोषणाकरिता आवश्यक
–धाखोराकी | रकम, पोटगी.
–रुं (वि.)–खा खा करणारे, अधाशी.
–रो (पु.)–(१) खोल खड्डा (२) नुकसान.
–धाखर्च (वि.),–धाखाई, (स्त्री.)–निर्वाहखर्च.
–धागळो (पु.)–(१) गोडधाशा (२) अधाशी.
खाधावेध (ખાધાવેધ) (पु., स्त्री.)–शत्रुता, वैर, दुश्मनी.
खाधाळुं (ખાધાળું) (वि.)–व्यंग असणारे.
खाधुं (ખાધું) (स. क्रि.)–'खावुं'चे भूतकाळाचे रूप, खाल्ले.
–धेल(-लुं)–खाल्लेलें.
–धेल पीधेल (वि.)–(१) खाऊनपिऊन सुखी (२) हृष्टपुष्ट.
खाधुं पीधुं झेर थई जवुं, खाधेलुं कूतराने नाखवुं–खाल्लेले अंगाला न लागणे.
खान (ખાન) [फा.] (पु.)–अमीर, शहाजादा, गृहस्थ यांना दिले जाणारे मुसलमानी उपनाम.
–खाना, -खानान (वि.)–खानाचा खान-सर्वांत उच्च पदवी धारण करणारा.
–दान [फा.] (वि.)–(१) घरंदाज, कुलीन (२) प्रतिष्ठित (३) (न.) घराणे, कुटुंब.
–दानी (स्त्री.)–(१) कुलीनता, सज्जनता.
खानगी (ખાનગી) [फा.] (वि.)–(१) स्वतःचे, खासगी. (२) जाहीर नसलेले, गुप्त.
खानाखराब (ખાનાખરાબ) [फा.] (वि.)–सत्यानाश करणारे.
–बी (स्त्री.)–सत्यानाश.
खानाजंगी (ખાનાજંગી) [फा.] (स्त्री.)–यादवी, आपापसात लढाई.
खानाजाद (ખાનાજાદ) [फा.] (वि.)–(१) घरात जन्मलेले आणि वाढलेले (२) (पु.) तसा गुलाम, गुलामाचा मुलगा.
खानाबाद (ખાનાબાદ) [फा.] (पु.)–'घरकुटुंब सुखी असो' असा आशीर्वाद.
खानाशु-सु-मारी (ખાનાશુ-સુમારી) (स्त्री.)–खानेसुमारी.
खानि (ખાનિ) [स.] (स्त्री.)–खाण.
खानुं (ખાનું) [फा.] (न.)–(१) घर, घराचे दालन (२) भंडार, निधी (३) पेटीत, टेबलात किंवा कपाटात केलेला खाना (४) लिहिण्यासाठी वेगळा वेगळा पाडलेला खाना किंवा कोष्टक.
–करवुं, -मूकवुं, -राखवुं–पेटीत कपाटात खाना बसविणे.
–पाडवुं–पत्रकात कोष्टक पाडणे.
खानेआबाद (ખાનેઆબાદ) [फा.] (वि.)–सुखवस्तू घराचे.
खांध (ખાંધ) (स्त्री.)–(१) खांदा (२) खांद (जनावराची) (३) गाडी ओढणाऱ्या बैलाच्या मानेवर पडणारा घट्टा.
–आववी–खांद येणे.
–आपवी–काही उचलताना खांदा देऊन मदत करणे.
–पडवी–ओझे वाहून (जनावराच्या) मानेवर घट्टा पडणे.
–मारवी–उचलण्याला मदत करणे.
खांधियो (ખાંધિયો) (पु.)–(१) खांद्यावर उचलून नेणारा (२) प्रेत वाहणारा, (३) मदत करणारा, सोबती (४) खुशामत्या.
खांधी (ખાંધી) (वि.)–(१) खांद असणारे (२) (पु.) बैल.
खांधुं (ખાંધું) (न.)–हप्ता.
खांधो (ખાંધો) (पु.)–चिखल.
खाप (ખાપ) (स्त्री.)–(१) आरसा (२) अभ्रकाचा पत्रा.
–नुं भरत–काचेच्या किंवा अभ्रकाच्या टिकल्या लावून केलेले भरतकाम.
खापडुं (ખાપડું) (न.)–खापर, खापराचा तुकडा.
खापरी (ખાપરી) (स्त्री.)–मेकूड
खापरुं (ખાપરું) (वि.)–न फसण्याजोगे, कोणाच्या पंजात न सांपडण्याजोगे, चाणाक्ष.
–रो कोडियो (पु.)–(१) कोणी कोणाला फसणार नाही अशा दोन धूर्तांपैकी एक (२) समान प्रतिस्पर्धी.
–रो झवेरी (पु.)–(१) चांपानेरचा एक प्राचीन, अतिशय समर्थ आणि धूर्त झवेरी. (२) (लाक्ष.) महाठक (३) हिऱ्याचा वाकबगार पारखी.
खापवुं (ખાપવું) (सं. क्रि.)–वरवर साल काढणे.
खाब (ખાબ) (पु.)–(१) झोप (२) स्वप्न.
–गाह (स्त्री.)–झोपण्याची जागा.
खाबकवुं (ખાબકવું) (अ. क्रि.)–(१) (पाण्यात) उंचावरून पडणे (२) (लाक्ष.) मध्येच तोंड घालणे.
खाबड (ખાબડ) (न.)–पाण्याने भरलेला खड्डा.
–खूबड (वि.)–खाचखळग्यांचा-ची-चे.
–डुं (न.)–डबके.
खाबोचियुं (ખાબોચિયું) (न.)–डबके.
खाम (ખામ) (पु.)–(१) ठेपा, खांब (२) खांदा (३) (वि.) कच्चे, अपुरे.
खामची (ખામચી) (स्त्री.)–धीर, सबुरी.
खामचुं (ખામચું) (वि.)–काळजी असणारे (२) (अ.) काळजीपूर्वक.
खामणियुं (ખામણિયું) (न.)–मोटेचा दोर.

खामणुं (ખામણું) (न.) – पाण्याची कळशी - माठ वगैरे ज्यावर ठेवतात ती बैठक (२) पसरट आळे (३) आकार, अंगलट.
खामणो (ખામણો) (पु.) – (१) दालन, खंड (२) ठेंगणा माणूस.
खामी (ખામી) [फा.] (स्त्री.) – (१) खोड - कसर, व्यंग, उणीव. (२) खोट, घट, चूक, दोष.
– आववी – व्यंग, खोड किंवा खोट वाटणे, संपणे.
– रहेवी – खोट किंवा न्यूनता असणे, (पूर्ण व्हायला) थोडी कसर राहणे.
खामुखा (ખામુખા) (अ.) – (१) इच्छेने किंवा अनिच्छेने, नाइलाजाने (२) विशेषेकरून (३) मुद्दाम, जाणूनबुजून.
खामुं (ખામું) (न.) – (१) आकार, अंगलट (२) अनुकूल जागा किंवा दिशा (३) डबके.
खामोश (ખામોશ) [फा.] (अ.) – शांत राहा, थांबा ! (या अर्थाचा उद्‌गार)
– शी (स्त्री.) – धीर, शांती, सबुरी.
– शी पकडवी - राखवी – धीर धरणे.
खांप (ખાંપ) (वि.) – (१) लांबसडक होऊन - ताणून पडलेले, झोपलेले. (२) (स्त्री.) – लांबसडक होऊन पडणे - झोपणे. (३) साष्टांग नमस्कार.
खांप, - ण (ખાંપ,-ણ) (१) उणीव, व्यंग, खोड. (२) नुकसान. (३) प्रेतावर टाकण्याचां कपडा, कफन.
खांपवुं (ખાંપવું) (स. क्रि.) – (१) सोलणे, छिलणे (२) वरवर खोदणे.
खांपो (ખાંપો) (पु.) – कापल्यानंतर जमिनीत राहिलेले झाडाचे मूळ (२) तुटलेल्या फांदीचा खोडाला चिकटून राहिलेला बुट्ठा भाग (३) उणीव, व्यंग.
खांभ (ખાંભ) (पु.) – खांब.
– भी (स्त्री.) – (१) स्मारक स्तंभ (२) खोबण, कुस.
– भो (पु.) – शिवेची हद्द दाखविणारा दगड.
खांभुं (ખાંભું) (न.) – गवतकाडीचा कचरा टाकण्याचा खड्डा.
खायकी (ખાયકી) (स्त्री.) – कमाई, पैदास. (२) एखाद्याचे गुपचुप खाणे - मिळविणे.
खायो (ખાયો) [फा.] (पु.) – अंड, वृषण.
खार (ખાર) [फा.] (पु.) – (१) शल्य, द्वेष. (३) मत्सर, ईर्ष्या.
– राखवो – वैर बाळगणे.
खारे जवुं (ખારે જવું) – मत्सरी होणे.
– बळवुं – मत्सराने जळणे.
खारपाट (ખારપાટ) (पु. न.) – मीठ पिकणारी - क्षार असणारी जमीन.
– टियुं (वि.) – क्षारयुक्त जमीन असलेले.
खारभांजणुं (न.) – तोंड स्वादिष्ट करण्यासाठी खाण्याचा पदार्थ.
खारवां (ખારવાં) (न. ब. व.) – पाऊस नसल्याने सुकत चाललेली ज्वारी – बाजरीची ओढलेली ताटे.
खारस्ती (ખારસ્તી) (वि.) – कठोर हृदयाचा - ची - चे, क्रूर.
खारियुं (ખારિયું) (वि.) – (१) द्वेषी, (२) (न.) मीठ लावलेला शेंदाडाचा तुकडा.
खारीलुं (ખારીલું) (वि.) – द्वेषी, डाव धरणारे.
खारुं (ખારું) (वि.) – (१) खारट. (२) खारात टाकलेले. (३) द्वेषी स्वभावाचे.
खारी दाढ थवी – (१) खाण्याची इच्छा करणे. (२) लाच घेणे. (३) नफा मिळविणे.
– पूरी – मीठमसाल्याची पुरी.
– माटी थवी – बिघडणे, वाटोळे होणे, नाश पावणे.
– माटी – सज्जी माती.
खारुं अगर, - ऊस, – दव (वि.) – खारटघोट, अत्यंत खारट.
खाराई (ખારાઈ) (स्त्री.) – खारटपणा.
खाराट (ખારાટ) (पु.) – थोडा खारटपणा.
खाराश (ખારાશ) (स्त्री.) – थोडा खारट. (२) (लाक्ष.) बेबनाव.
खारो (ખારો) (पु.) – पापडखार.
खारोड (ખારોડ) (वि.) – खारा - री - रे (जमीन इ.)
खारोलो (ખારોલો) (न) – मऊ लोखंड.
खाल,-डी (ખાલ,-ડી) (स्त्री.) – (१) कातडे (कच्चे) (२) साल.
खालपी (ખાલપી) (स्त्री.) – चांभारीण.
– पो (पु.) – चांभार.
खालववुं (ખાલવવું) (स. क्रि.) – मोकळे–रिकामे करणे.
खालसा (ખાલસા) (वि.) – (१) स्वतःच्या सर्वस्वी मालकीचे, स्वतःचे. (२) सरकारी. (३) खालसा पंथाचा - ची - चे.
खालिक (ખાલિક) [अ.] (पु.) – विधाता.
खालिस (ખાલિસ) [अ.] (वि.) – (१) शुद्ध. (२) निष्कपट.
खाली (ખાલી) (वि.) – (१) रिकामा - मी - मे. (२) निर्धन, गरीब. (३) (स्त्री.) झिणझिण्या, मुंग्या. (४) (अ.) उगीच, व्यर्थ. (५) फक्त, मात्र.
– करवुं – (१) रिकामें करणे. (२) घर किंवा खोली सोडणे. (३) निर्धन करणे.
– थवुं – (१) रिकामे - वस्ती नसलेले - होणे. (२) जवळ दमडी नसणे.
– पडवुं – (१) वस्ती किंवा वापर नसलेले होणे. (२) रिकामे होणे. (३) शरीराने अशक्त होणे.
– हाथे – रिकाम्या हाती.
– चडवी – अंग आखडल्याने मुंग्या येणे.
– खम, - खंख (वि.) – पूर्णपणे रिकामा - मी - मे.
– पीली (अ.) – विनाकारण, निष्कारण, उगीच.

खालुं (ખાલું) (न.)–(१) जोड्याचे वरचें कातडें. (२) कुकडें भरण्याचा बोरूचा पोकळ तुकडा. (३) खळ्यातील धान्यावर झाकतात ते गवत. (४) पडित ठेवलेले शेत. (५) आळे.
खालां बाळवां–खळयातील धान्य गवताने झाकणे.
खावरुं (ખાવરું) (वि.)–अधाशी.
खावुं (ખાવું) (स. क्रि.)–(१) खाणे, जेवणे. (२) सहन करणे. (जसे, 'मार खावो'). (३) (न.) पक्वान्न (४) शिदोरी, खाऊ.
खाई जवुं–(१) खाऊन टाकणे. (२) उचापत करणे.
खाई जोवुं–खाऊन पाहणे.
खाईने खोदवुं–निमकहराम होणे.
खाई पी ऊतरवुं–संसारातली सुखे भोगून वगैरे निवृत्त होणे.
खाई पीने मंडवुं,-पाछळ पडवुं,-खपूसीने मंडवुं–हात धुवून, चिकाटीने मागे लागणे, पाठ न सोडणे.
खाई बगाडवुं–(१) निमकहराम होणे, (२) खातापिता अंग न धरणे, आजारी राहणे.
खाई लेवुं–खाऊन घेणे.
खाऊं खाऊं करवुं–खा खा करणे.
खातुं धन–ज्यावर वरचेवर खर्च करावा लागतो अशी मिळकत.
खावा धावुं–खायला धावणे, भीती वाटेल असे निर्जन असणे.
खावापीवानो दहाडो–(१) समारंभाचा-मेजवानीचा दिवस. (२) समृद्धीचा काळ.
खावुं तेनुं खोदवुं–खाल्ल्याघरचे वासे मोजणे, निमकहरामी करणे.
खावुंपीवुं–सुखाने राहणे.
खाश (ખાશ) (स्त्री.)–(१) खाण्याची शक्ती (२) हरळीसारख्या खोल मुळीच्या गवताचा टापू.
खास (ખાસ) [अ.] (वि.)–(१) स्वतःचे, स्वतःशी संबंधित. (२) विशेष, सामान्य नसलेला-ली-ले. (३) खरें, अस्सल.
–खवास (पु.)–बादशहाचा किंवा अमीर-उमरावाचा नोकर.
–गत,-गी (वि.)–(१) स्वतःचे (२) खाजगी, गुप्त (३) अगत्याचे, मुद्द्याचे.
–दान (न.)–पानाचा डबा.
–दार (पु.)–(१) सेवक, हुजऱ्या (२) मोतद्दार.
–नवीस (पु.)–खासगी चिटणीस, कारभारी.
–बजार–मोठा-मुख्य बाजार.
–बरदार (पु.)–सरदाराची हत्यारे बरोबर घेऊन फिरणारा अनुचर.
खासडुं (ખાસડું) (न.)–(१) वाहाणा, जोडा. (२) (लाक्ष.) ठपका.
खासडारात (ખાસડારાત)–जोडे उचलणारा म्हणजे तुच्छ मनुष्य. (उदा० 'मारे जाणे खासडारात' म्हणजे 'माझं खेटर अडलंय् समजून घ्यायला.')
खासडा खावां–जोडे खाणे, शिव्या खाणे.
खासडानी तोले (वि.)–तुच्छ.
खासडां मारवां–(१) जोडे मारणे. (लाक्ष.) (२) अवगणना करणे.
(-नुं शुं) खासडुं फाटी गयुं?–अमक्याचे त्यात काय बिघडले?
खासडांखाऊ, खासडकुट्टु,-कूटुं (वि.)–जोडेखाऊ.
खासडांखोर (वि.)–जोडे खाण्याची-शिव्या खाण्याची सवय असलेले, जोडे खाऊनसुद्धा सरळ न वागणारे.
खासडाबाजी (ખાસડાબાજી) (स्त्री.)–(लाक्ष.) जोडाजोडी.
खासडी (ખાસડી) (स्त्री.)–स्त्रीचे पायताण.
खासापीसी (ખાસાપીસી) (स्त्री.)–खुसपुस (कानगोष्टी) करणे.
खासा मंडळी (ખાસા મંડળી) (स्त्री.)–खाशांची मजलीस.
खासियत (ખાસિયત) [अ.] (स्त्री.)–(१) वैशिष्ट्य (२) स्वभाव, प्रकृती. (३) नेहमीची सवय.
खासियां (ખાસિયાં) (न. ब. व.)–कानात खुसपुस.
खासियुं (ખાસિયું) (न.)–(१) गाढवावर लादावयाची पडशी. (२) त्याखाली ठेवलेली गादी.
खासुं (ખાસું) (वि.)-(१) सुंदर, योग्य, बरोबर. (२) (अ.) वाहवा, शाबास!
–दीवा जेवुं–दिव्यासारखे दळढळीत.
खांसवुं (ખાંસવું) (अ. क्रि.)–खोकणे.
खांसी (ખાંસી) (स्त्री.)–खोकला, ढास.
खिचडियुं (ખિચડિયું) (वि.)–(१) मिसळ असलेले, (२) खिचडीच्या उपयोगाचे
खिजवाट (ખિજવાટ) (पु.)–राग.
खिज(-द)मत (ખિજ-દ-મત) (स्त्री.)–सेवाचाकरी.
–गार (पु.)–सेवक, नोकर, चाकर.
–गारी (स्त्री.)–सेवा.
खिजवणी (ખિજવણી) (स्त्री.)–चिडवाचिडवी.
खिजावुं (ખિજાવું) (अ. क्रि.)–चिडविले जाणे.
खिजाववुं (ખિજાવવું) (सं. क्रि.)–चिडविणे.
खिताब (ખિતાબ)–[अ.] (पु.)–पदवी, किताब.
खिमा (ખિમા) (स्त्री.)–क्षमा (जैन).
खियानत (ખિયાનત) [अ.] (स्त्री.)–बेइमानी.
खिराज (ખિરાજ) (स्त्री.)–खंडणी.
खिरोयुं (ખિરોયું) (वि. न.)–दुधाळ (ढोर).
खिलकोडी (ખિલકોડી) (स्त्री.)–खार.
खिल(-ल्ल)त (ખિલ્લત) (स्त्री.)–मानाचा पोशाख.
खिलवट,-णी (ખિલવટ,-ણી) (स्त्री.) फुलण्याची-फुलण्यासारखी-आनंदित होण्याची-होण्यासारखी कृती.
–टो (पु.)–फुलविणारा.

खिलवत (ખિલવત) [अ.] (स्त्री.) – (१) एकांत (२) खल्वत.
खिलाफ (ખિલાફ) [अ.] (वि.) – विरुद्ध.
खिलाफत (ખિલાફત) (स्त्री.) – खलीफाची गादी किंवा सत्ता.
खिलाववुं (ખિલાવવું) (स. क्रि.) – फुलविणे, प्रफुल्लित करणे.
– ट (स्त्री.) – फुलविणे, खुलावट
खिलावुं (ખિલાવું) (अ. क्रि.) – टांगते राहणे, अधांतरी राहणे.
खिलोणुं (ખિલોણું) (न.) – खेळणे.
खिसकाववुं (ખિસકાવવું) (स. क्रि.) – 'खीसकवुं'चे प्रयोजक, सरकविणे, बाजूस सारणे.
खिसकोली (ખિસકોલી) (स्त्री.) – खार.
खिसियाणुं (ખિસિયાણું) (वि.) – शरमिंदे.
खिस्सुं (ખિસ્સું) (न.) – खिसा.
खीखी (ખીખી) (स्त्री.) – (१) खीखी करून हसणे (२) (अ.) खी खी करून.
खीच (ખીચ) (वि.) – (१) गच्च. (२) (स्त्री) खिचडी.
खीचगाल्लुं (ખીચગાલ્લું) (न.) – खटारा.
खीचडी (ખીચડી) (स्त्री.) – खिचडी.
– खवराववी – भरणपोषण करणे.
– खूटवी – अन्न अपुरे पडणे.
खीचा(-चो)खीच (ખીચા-ચો-ખીચ) (सं.) – गच्चोगच्च, ठासून.
खीची (ખીચી) (स्त्री.) – ज्वारीचे - तांदळाचे उकडलेले पीठ.
खीज (ખીજ) (स्त्री.) – (१) चीड, राग. (२) खिजविण्याकरिता पाडलेले नाव.
– काढवी – एकाचा राग दुसऱ्यावर काढणे.
– पडवी – खिजविण्यासाठी दिलेले नाव पडणे.
खीजववुं (ખીજવવું) (स. क्रि.) – चिडविणे, खिजविणे.
खीजवुं (ખીજવું) (अ. क्रि.) – (१) चिडणे, रागावणे. (२) (स. क्रि.) रागे भरणे, दाटणे.
खीण (ખીણ) (स्त्री.) – खिंड.
खींटी (ખીંટી) (स्त्री.) – (१) लहान खुंटा. (२) खुंटी.
– खींटीए पोतियुं होवुं – चिंतेतून किंवा जबाबदारीतून मुक्त होणे.
– खींटीए मूकवुं – बाजूला सारणे, दूर करणे.
खींटडियाळुं (ખીંટડિયાળું) (वि.) – (१) अणकुचीदार (२) आकडी केलेले (३) वाकडे बळविलेले.
खीमणुं (ખીમણું) (न.) – वस्तूची बैठक.
खीर (ખીર) (वि.) – (१) निःसार, व्यर्थ. (२) (स्त्री.) खीर
खीरुं (न.) – (१) पिठात पाणी मिसळून भजी वगैरे करण्याकरिता केलेले घट्ट मिश्रण. (२) आंबविलेला पिठाचा लगदा (जिलबी इ. चा) (३) खिरे, एक जातीची कोवळी काकडी (४) एक प्रकारचा जाड कपडा.

खील (ખીલ) (पु.) – (१) तारुण्यात तोंडावर उठणाऱ्या पुटकुळ्या, मोड्या. (२) चामखीळ (३) जात्यामधला खिळा - खुंटा.
खीलववुं (ખીલવવું) (स. क्रि.) – (१) खुलविणे, फुलविणे. (२) जोडून शिवणे.
खीलवुं (ખીલવું) (अ. क्रि.) – (१) खुलणे, फुलणे, विकसणे. (२) उजळविणे. (३) खुषीत येणे. (४) रंगात येणे, उत्तेजित होणे. (५) दोन तुकडे मधोमध शिवण घालून शिवणे.
खीली (ખીલી) (स्त्री.) – चूक, लहान खिळा.
– चोडवी - ठाकवी - मारवी – (१) खिळा ठोकणे. (२) पडाव टाकणे. (लाक्ष.) (३) विघ्न आणणे.
– खटको (पु.) – (१) खिळा टोचावा तशी सल - वेदना (२) अडचण, विघ्न.
खीलो (ખીલો) (पु.) – मोठा खिळा, मेख, खुंट.
– चोडवो, - ठोकवो, - मारवो – खिळा मारणे.
खीले बांधवुं – (१) खिळ्याला बांधणे. (२) कायमचे जोडून टाकणे. (३) (लाक्ष.) लग्न करून टाकणे.
खीलाउपाड (ખીલાઉપાડ) (अ.) – मुळापासून, निर्वंश होईल अशा रीतीने.
– पाटी (स्त्री.) – पेच पाडण्याचे हत्यार.
– मूळ (न.) – मुख्य मूळ.
– रखुं (वि.) – (१) अमुक खुंटालाच बांधले जाण्याची सवय झालेले. (२) गोठ्यातच बांधून राहण्याची सवय झालेले. (३) वर उठलेल्या खिळ्याच्या आकाराचे.
खीश(-स)र (ખીશ-સ-ર) (पु.) – (१) थंडीचा दिवस (२) (पु. स्त्री.) मकरसंक्रात,
खीसकवुं (ખીસકવું) (अ. क्रि.) – सरकणे, निसरणे.
खीसुं (ખીસું) (न.) – खिसा.
– तर होवुं – खिसा गरम असणे.
– भरवुं – लाच देणे किंवा घेणे.
– खीसामां घालवुं, - मूकवुं – (१) आपल्या सत्तेखाली, पंज्यात आणणे. (२) हिशेबात न घेणे.
– खीसां तर करवां – खूप पैसा मिळविणे.
– खीसा खाली – निर्धन.
खुटाडवुं (ખુટાડવું) (१) खुटेल असे करणे, कमी करणे. (२) पुरे करणे.
खुटामण (ખુટામણ) (स्त्री.) – (१) खोट, घट. (२) फूट, दगा
खुड(-र)दो (ખુડ-ર-દો) (पु.) – खुर्दा.
– करवो – (१) खर्चून खलास करणे. (२) तोडून फोडून चुरा करणे.
– काढवो - काढी नाखवो – मोडून फोडून चुरा करणे.

खुणियाळुं (ખુણિયાળું) (वि.)–कोणी-कोपरा असलेले.
खुतबो (ખુતબો) (पु.)–(१) तारीफ, प्रशंसा. (२) मुसलमान पढतात तो खुतबा.
खुताडवुं (ખુતાડવું) (स. क्रि.)–(चिखलात) रुतविणे.
खुतावुं (ખુતાવું) (अ. क्रि.)–रुतणे.
खुद (ખુદ) [फा.]–(१) (सर्व.) स्वतः (२) (वि.) अस्सल, शुद्ध.
–अखत्यारी (स्त्री.)–स्वतःचा अधिकार-ताबा असणे.
–काश्ता(-स्ता) [फा.] (स्त्री.)–जातकसणुकीची (जमीन)
–कुशी [फा.] (स्त्री.]–आत्महत्या.
–गरजी [फा.]–(१) (वि.) स्वार्थी, आपमतलबी. (२) (स्त्री.) आपमतलबीपणा.
–पसंदगी (स्त्री.)–आपणच तेवढे चांगले अशी भावना, अहंकार.
खुदा (ખુદા) [फा.] (पु.)–ईश्वर, प्रभु.
–करे ने-ईश्वराची कृपा असेल तर, प्रभुकृपेने.
–ई (वि.)–(१) ईश्वराचे, ईश्वरासंबंधीचे. (२) पवित्र (३) दैवी. (४) (लाक्ष.) भोळे (५) (स्त्री.) ईश्वरत्व (६) सृष्टी.
–ताला [फा.] (पु.)–महान् प्रभू.
–परस्त (वि.)–प्रभुपरायण, आस्तिक.
–वंत(-द) [फा.] (वि.)–प्रभुतुल्य (मालकाला किंवा अन्नदात्याला उद्देशून).
–हाफेज–ईश्वर तुमचे रक्षण करो.
खुदी (ખુદી) [फा.] (स्त्री.)–मीपणा.
खुनकी (ખુનકી) [फा.] (स्त्री.)–नशा, धुंदी.
खुनामरकी (ખુનામરકી) (स्त्री.)–खुनाखुनी, कापाकापी.
खुन्नस (ખુન્નસ) (स्त्री., न.)–खुनशीपणा.
–राखवुं–खुनशीपणा मनात ठेवणे, वैरभाव बाळगणे.
–से भरावुं–सूड घेण्याच्या भावनेने भारून जाणे.
–सी (वि.)–खुनशी.
खुपावुं (ખુપાવું) (अ. क्रि.)–खुपसले जाणे.
खुपाववुं (ખુપાવવું) (स. क्रि.)–खुपसणे.
खुफिया (ખુફિયા) [अ.] (वि.)–गुप्त.
खुमारी (ખુમારી) [अ.] (स्त्री.)–(१) नजरेत दिसणारी धुंदी, नशा, मस्ती. (२) धन, वैभव, हुद्दा इ.
–राखवी–गर्व धरणे.
खुमावती (ખુમાવતી) (वि.)–क्षमावंत.
खुर [सं.]-री (ખુર, ખુરી) (स्त्री.)–खूर.
खुरचन (ખુરચન) (न.)–(१) खरवडून एकत्र केलेला खाण्याचा पदार्थ, खरपुडी. (२) काकडीची कोशिंबीर.
–नी (स्त्री.)–चांभाराचे कातडी खरडून काढण्याचे एक हत्यार.
खुरजी (ખુરજી) (स्त्री.)–(स्वारीत बरोबरचे सामान ठेवण्याची घोडेस्वाराची) थैली, पिशवी.
खुरदियो (ખુરદિયો) (पु.)–खुर्दा विकणारा मनुष्य.
खुरशी(-सी) (ખુરશી-સી) (स्त्री.)–खुर्ची.
खुरशेद (ખુરશેદ) [फा.] (पु.)–सूर्य.
खुरसुं (ખુરસું) (न.)–(१) मातीची बैठक (वस्तू ठेवण्याची), शेगडी ठेवण्याचा कट्टा. (२) कसली तरी खुर्ची (तुच्छार्थक).
खुरी (ખુરી) (स्त्री.)–खूर.
खुला(-ल्ला)ण (ખુલા-લ્લા-ણ) (न.)–मोकळी जागा.
खुलावुं (ખુલાવું) (अ. क्रि.)–(१) उघडले जाणे (२) उमलणे.
खुलाववुं (ખુલાવવું) (स. क्रि.)–उघडविणे (२) उमलविणे.
खुलासावार (ખુલાસાવાર) (अ.)–खुलासेवार.
खुलासो (ખુલાસો) [अ.] (पु.)–(१) खुलासा, स्पष्टीकरण. (२) सार, भावार्थ. (३) मार्ग, निकाल. (४) मोकळेपणा. (५) (लाक्ष.) शौच.
–आपवो, -करवो–खुलासा देणे-करणे.
–थवो–(१) स्पष्टता होणे. (२) शौच होणे.
खुलासेथी, -खुलासीने झाडो थवो–साफ शौचाला होणे.
खुल्लुं (ખુલ્લું) (वि.)–(१) उघडे (२) निखालस, चोखट. (३) स्पष्ट (४) उघडेनागडे (५) जाहीर, खुले. (६) असभ्य (७) न वेष्टिलेले (८) फिके.
–करवुं–(१) उघडणे (२) उघड करणे, प्रकट करणे.
–पाडवुं–बाहेर फोडणे.
–मूकवुं–(१) उद्घाटन करणे, उघडे करणे. (२) उघडून किंवा उघड्यात ठेवणे.
खुल्ली रीते–उघडउघड.
–हवा–स्वच्छ-मोकळी हवा.
खुल्ले चोक(-के)–उघडपणे, उघड उघड.
खुल्लो कागळ–(१) वृत्तपत्रातून लिहिलेले पत्र (२) न बंद केलेले पत्र.
खुल्लंखुल्ला (अ.)–उघडउघड.
खुल्लेखुल्लुं (वि.)–साफ उघडे, सताड उघडे
खुवार (ખુવાર) (वि.)–(१) त्रस्त, अतिःदुखी (२) नष्ट, दुर्दशाग्रस्त.
–री (स्त्री.)–नष्टचर्य, दुर्दशा.
खुश (ખુશ) [फा.] (वि.)–(१) प्रसन्न, आनंदित. (२) आरोग्यसंपन्न, निरोगी.
–करवुं–(१) प्रसन्न करणे (२) (लाक्ष.) बक्षिस देणे.
–रहेवुं–प्रसन्न किंवा निरोगी असणे.

–खुशाल–निरोगी व प्रसन्न, अतिशय प्रसन्न.
–दिली (स्त्री.)–आनंदीपणा.
–नवीस (वि.)–सुबक अक्षर काढून लिहिणारा.
–नुमा (वि.)–सुंदर, रमणीय.
–बखती, –बख्ती [फा.] (स्त्री.)–(१) सद्भाग्य. (२) आनंदाची भेट.
–बो, -बोई (स्त्री.)–सुगंध.
–बोदार (वि.)–सुगंधी.
–मिजाज (पु.)–(१) सात्त्विक-आनंदी स्वभाव (२) (वि.) आनंदी.
–मिजाजी (वि.)–(१) आनंदी (२) (स्त्री.) प्रसन्न अवस्था.
खुशी (ખુશી) (स्त्री.)–(१) आनंदी अवस्था (२) मर्जी, इच्छा, रुची (३) (वि.) राजी, खूष.
–नी बात–आनंद देणारी गोष्ट.
–नो सोदो–मर्जीची गोष्ट.
खुशकी (ખુશકી) [फा.] (स्त्री.)–जमीनमार्ग.
खुशहाल (ખુશહાલ) (वि.)–खुशाल, कुशल, क्षेम.
खुशामतनुं खोळियुं (ખુશામતનું ખોળિયું) (वि.)–अतिशय खुशामत करणारा-री-रे.
खुशामतखोर (ખુશામતખોર) (वि.)–खुशामत करण्याची सवय असणारा-री-रे.
खुसरो (ખુસરો) (वि.) (पु.)–मिशा काढलेला.
खुसियो (ખુસિયો) [अ.] (पु.)–(१) वृषण (२) (वि.) खच्ची केलेला.
खूंखारवुं (ખૂંખારવું) (अ. क्रि.)–(१) खाकरणे, घसा साफ करणे. (२) खिंकाळणे.
खूंखारो (ખૂંખારો) (पु.)–(१) खाकरणे. (२) त्याचा आवाज.
खूजली(-ळी) (ખૂજલી-ળી) (स्त्री.)–(१) खाज (२) खरूज.
खूंच, -खांच(ખૂંચ, ખૂંચખાંચ) (स्त्री.)–(१) कोपरा. (२) खुपसून पडणारे भोक. (३) (लाक्ष.) (मनाला) लागणे. (४) मनात राहाणे, वैर. (५) बारकाईने पाहण्याची दृष्टी. (६) वैगुण्य-खोड.
खूंचववुं (ખૂંચવવું) (स. क्रि.)–ओढून घेणे, हिसकून घेणे.
खूंचवुं (ખૂંચવું) (अ. क्रि.)–(१) खुपसणे (२) (मनाला) खटकणे (३) गुंतून जाणे, बंधनात सापडणे.
खूंचाववुं (ખૂચાવવું) (स. क्रि.)–हिसकावून-ओढून घेणे.
खूट (ખૂટ) (स्त्री.)–न्यून, आखुड पडण्याची अवस्था.
–को (पु.)–खोट, कमी.
खूटडुं (ખૂટડું) (न.)–(१) कोलीत, (२) पलिता.
-डो (पु.)–(१) अंगार, विस्तव. (२) कोलीत किंवा पलिता.

खूटल (ખૂટલ) (वि.)–अप्रामाणिक, लबाड.
खूटवुं (ખૂટવું) (अ. क्रि.)–(१) कमी पडणे. (२) पुरेसे होणे.
खूटेल(-लुं (ખૂટેલ-લું) (वि.)–(१) निर्धन झालेले, कंगाल. (२) दगाबाज, विश्वासघातकी.
खूड (ખૂડ) (स्त्री.)–गच्ची, धाबे.
खूण (ખૂણ) (स्त्री.)–(१) दिशा (२) निशाणी, चिह्न.
–णियुं (वि.)–कोन असलेले.
–णे खांचरे (अ.)–कुठेतरी कोपऱ्यात.
खूणो (ખૂણો) (पु.)–कोपरा, कोन.
–पाळवो–वैधव्य पाळणे.
–झालीने बेसी-बेठा रहेवुं–घरांत बसून राहणे.
–पडवो–कोन तयार होणे.
–मूकवो–शोक–सुतक पाळण्याचे संपणे.
खूणामां पडी रहेवुं–कोपऱ्यात-अंधारात-अप्रकट अवस्थेत पडून राहणे.
–होवुं–नुकत्याच आलेल्या वैधव्यामुळे कोपरा सोडून बाहेर न पडणे.
खूणोखांचरो (ખૂણો ખાંચરો)–कोनाकोपरा.
खूंट (ખૂંટ) (पु.)–(१) वळू, गोऱ्हा. (२) (स्त्री.) जमिनीची हद्द दाखविणारा दगड, हद्दीची खूण. (३) (अ.) बरोबर, प्रमाणशीर, पुरेपूर.
खूंटडुं (ખૂંટડું) (न.)–(१) मुळासकट उपटून काढण्याचे हत्यार. (२) बैल. (३) झाडाचे खोड.
खूंटवुं (ખૂંટવું) (स. क्रि.)–(१) मुळासकट उपटून काढणे. (२) निकंदन करणे. (३) तोडून टाकणे.
खूंटुं (ખૂંટું) (न.)–खुंट, खोड, (झाडाचे)
–टो (पु.)–(१) खुंट, मेख. (२) बंदरांत जहाजावर घेतला जाणारा कर. (३) जात्याचा मधला खुंटा.
–घालवो–(१) पाय घुसवणे. (२) पाया घालणे.
–जबरो होवो–जबरदस्त आधार-पाठबळ असणे.
–ठोकवो–(१) एके जागी स्थिरपणे राहणे. (२) पाया घालणे (३) तोड काढणे.
ढीलो थवो, -पडवो–तोरा कमी होणे, नक्षा उतरणे.
खूत (ખૂત) (स्त्री.)–हरकत, अडचण.
खूतवुं / खूंतवुं (ખૂતવું, ખૂંતવું) (अ. क्रि.)–रुतणे.
खूद(-ध)रुं (ખૂદ-ધ-રું) (न.)–मनात वैर ठेवून काहीतरी काढलेला दोष–छिद्र.
खून (ખૂન) [फा.] (वि.)–(१) रक्त (२) वैराची धुंदी (३) हत्या.
–खराबो (पु.)–कत्तल.

–खार [फा.] (वि.)–(१) रक्तपाती (२) घातकी, खुनी.
–रेजी (स्त्री.)–रक्तपात, कत्तल.
खूनस (ખૂનસ) (स्त्री., न.)–खुनाची-सूडाची लालसा.
–से-भरावुं–खून चढणे.
खूंता (ખૂંતા) (स्त्री.)–(१) मनःशांती, सुखसमाधान (२) खंबीरपणा.
खूंताडवुं (ખૂંતાડવું) (सं. क्रि.)–सतविणे. 'खूंतवुं'चे प्रयोजक.
खूंदणुं (ખૂંદણું) (न.)–(१) उड्या टाकीत-नाचत नाचत फिरणे. (२) धांगडधिंगा.
खूंदवुं (ખૂંદવું) (स. क्रि.)–(१) पायाने दाबून टाकणे, पायाखालीं चिरडणे (२) नाचत नाचत गरबा खेळणे. (३) त्रस्त करणे, त्रास देणे, सतावणे.
खूंदाखूंद (ખૂંદાખૂંદ) (स्त्री.)–(१) चेंदामेंदा (२) धांगडधिंगा.
खूंदाळवुं (ખૂંદાળવું) (अ. क्रि.)–खाऊनपिऊन मौज करणे.
खूंध (ખૂંધ) (स्त्री.)–(१) वशिंड (२) कुबड.
–धियुं-धुं (वि.)–कुबडे.
खूपववुं (ખૂપવવું) (स. क्रि.)–जम बसविणे.
खूपवुं (ખૂપવું) (अ. क्रि.)–(१) खुपसणे, भोक पाडणे. (२) रुतणे.
खूब (ખૂબ) [फा.] (वि.)–(१) सुंदर, साजरे (२) पुष्कळ.
–करी–'वाहवा' या अर्थाचा उद्गार.
खूबी (ખૂબી) (स्त्री.)–(१) विशेष गुण, वैशिष्ट्य. (२) रहस्य. (३) मजा, लज्जत. (४) चतुराई, चातुर्य. (५) सौंदर्य (६) भलाई.
–दार (वि.)–वरील गुण असलेले.
खूमचो (ખૂમચો) (पु.)–(१) फार मोठा थाळा. (२) विक्रीच्या वस्तूंनी भरलेला थाळा. (३) थाळ्यात भरलेल्या वस्तू, भेटीच्या वस्तू.
–चावाळो (पु.)–मोठ्या थाळ्यात भरून वस्तू विकणारा फेरीवाला.
खूंपडो (ખૂંપડો) (पु.)–इरल्यासारखी पानांची बनविलेली छत्री.
खूंपरुं (ખૂંપરું) (न.)–खुंट, खोड.
–रो (पु.)–(१) खुंट, खोड (२) धस (कपड्याला लागतो तो) (३) हजामत करताना खुंटासारखे राहिलेले केस.
खे (ખે) (पु. स्त्री.)–(१) क्षय (२) नाश.
–तिथि (स्त्री.)–क्षयतिथी.
खेंखली (ખેંખલી) (वि.)–गळून-जीर्ण होऊन गेलेले, अत्यंत अशक्त.
खेचरी (ખેચરી) (स्त्री.)–(१) देवी, योगिनी (२) एक योगमुद्रा.
खेंच (ખેંચ) (स्त्री.)–(१) ओढ, ताण. (२) आग्रह.
–ताण (स्त्री.)–ओढाताण.
–वुं (सं. क्रि.)–(१) खेचणे. (२) तंग करणे. (३) आग्रह करणे. (४) शोषून घेणे.
खेंची राखवुं–(१) ओढून धरणे. (२) आग्रह न सोडणे.
खेट (ખેટ) (न.)–(१) खेडे (२) (पु. न.) शिकार.
–क (पु.)–(१) शिकारी (२) (न.) व्यसन (३) झपाटणी. (४) खेडेगाव.
–की (पु.)–(१) शिकारी (२) शेतकरी.
खेटली (ખેટલી)–(स्त्री.) भांग (डोक्यात पाडतात तो)
खेड (ખેડ) (स्त्री.)–(१) शेती (२) (न.) खेडे.
–ण (न)–जमीन लागवडीस आणणे.
–णहार (पु.)–(१) शेतकरी (२) गाडी हाकणारा.
–तर (वि.)–नांगरता येईल-शेती वगैरे होईल असे.
–वायो–(पु.)–शेतकरी.
–वुं (स. क्रि.)–(१) (जमीन) नांगरून-वखरून वगैरे शेतीसाठी तयार करणे. (२) (लाक्ष.) सुधारणे, सुसंस्कृत करणे. (३) साहस करणे. (४) (गाडी) चालविणे, हाकणे.
–हक(-हक) (पु.)–जमीन करण्याचा हक्क.
खेडाण (ખેડાણ) (वि.)–(१) नांगरून वगैरे तयार केलेले, नांगरण्याची वगैरे क्रिया चालत असलेले (२) (न.) शेती (३) जमीन तयार करणे.
खेडु (ખેડુ) (वि.)–(१) जमीन शेतीसाठी तयार करणारा (२) (पु.) शेतकरी.
खेडूत (ખેડૂત) (पु.)–शेतकरी.
खेडुं (ખેડું) (न.)–(१) खेडेगाव (२) गेंड्याच्या कातड्याची ढाल (३) भाला.
खेडो (ખેડો) (पु.)–नट.
खेत (ખેત) (न.) शेत
–र (न.)–शेत.
–रपादर (न.)–जमीनजुमला.
–रपाळ (पु.)–(१) शेतीचे रक्षण करणारा देव (२) ग्रामदेवता.
–रवा (अ.)–एका बाबराच्या अंतरावर.
–राई (स्त्री.)–एके ठिकाणी असलेला शेतांचा समूह, जमीनीचा लांब पट्टा.
–राउ(-ड) (वि.)–(१) शेतीविषयक (२) शेतामधून जाणारी (वाट).
खेती (ખેતી) (स्त्री.)–शेती.
–कार (पु.)–शेतकरी.
–वाडी (स्त्री.)–शेतीवाडी. (२) शेतकऱ्यांचा कामधंदा.
खेदानमेदान (ખેદાનમેદાન) (वि.)–जमीनदोस्त, नष्टभ्रष्ट.

खेद्रो(-धो) (ખેદ્રો-ધો) (पु.) – पिच्छा.
खेन (ખેન) (न.) – (१) क्षयरोग (२) कटकट (३) अडचण, विघ्न.
– पडवुं – अतिशय मेहनत पडणे.
– वळगवुं – कटकट मागे लागणे.
– खाटलो (पु.) – (१) क्षयरोग (२) कटकट करणारा माणूस.
खेप (ખેપ) (स्त्री.) – (१) फेरा, हेलपाटा (२) दूरचा प्रवास, सफर. (३) फेऱ्याची मजुरी. (४) धोब्याकडे धुवायला दिलेल्या कपड्यांचे गाठोडे. (५) आयात (६) (एखाद्या गोष्टीच्या) मागे लागणे, चिकाटी (७) हप्ता.
– करवी – फेरा करणे, हेलपाटा खाणे.
खेपट (ખેપટ) (स्त्री.) – (१) धूळ, कचरा (२) (अ.) मुठी आवळून, झपाट्याने.
– पडवुं, - पडी जवुं – मुठी आवळून दौड ठोकणे, सरळ रस्ता गाठणे.
खेपन (ખેપન) (न.) – (१) फेकून देणे. (२) दुःख, पीडा.
खेपानी (ખેપાની) (वि.) – (१) मस्ती - दंगे - खोर (२) हिकमत्या
खेपियो (ખેપિયો) (पु.) – दूत, जासूद.
खेपी (ખેપી) (वि.) – (१) आक्षेप घेणारा - री - रे. (२) जागृत, सावध.
खेमकुशळ (ખેમકુશળ) (न.) – क्षेमकुशल.
खेर (ખેર) (अ.) – (१) बरे असो, चिंता नाही. (२) (स्त्री.) खैर.
– गुजरी – पीडा गेली !
खेर (न.) – खैराचे झाड.
– सार(-ल) (पु.) – (१) खैराच्या झाडातून निघणारा चीक. (२) कात, (खाण्याचा).
खेर (स्त्री.) – धूळ, केर.
खेरखट (ખેરખટ) (अ.) – एकदम, पाहतापाहता.
खेरखाह (ખેરખાહ) [फा.] (वि.) – शुभेच्छक, हितचिंतक.
खेरववुं (ખેરવવું) (अ. क्रि.) – (१) गळून पडेल असे करणे. (२) बाजूला सरकविणे, दूर करणे, काढून टाकणे. (३) सतावणे.
खेरसल्ला (ખેરસલ્લા) (स्त्री.) – (१) समाधान, क्षेमकुशल. (२) (अ.) बरे असो, (अशा अर्थाचा उद्‌गार).
– करवुं – उधळणे, उडविणे, खर्चून टाकणे.
खेरात (ખેરાત) [अ.] (स्त्री.) – दान, पुण्य.
– ती (वि.) – (१) दानाकरिता काढलेले, धर्मादाय. (२) दानी.
खेरियत (ખેરિયત) [अ.] (स्त्री.) – सुखरूप - क्षेम कुशल - असणे.
खेरियुं (ખેરિયું) (वि.) – (१) छिन्नभिन्न - तुकडे तुकडे झालेले. (२) लगेच विझणारे.
खेरीचो (ખેરીચો) (पु.) – सटरफटर वस्तूंचा डबा.
खेरो (ખેરો) (पु.) – दोरींनी विणून तयार केलेला जाळीदार थैला.
खेरो (पु.) – (१) तांदळाच्या पिठाची वडी (२) हुरडा पाडण्याचा दंडा (३) खाली पडलेला भुस्सा.
खेलखाना (ખેલખાના) (पु.) – (१) लष्कराचे सामानसुमान (२) अस्ताव्यस्त पडलेले सामान (३) खराबी.
खेलणी (ખેલણી) (स्त्री.) – नटलेली बाहुली.
– णुं, - वणुं (न.) – खेळणे.
खेलाडी (ખેલાડી) (वि.) – (१) हंसतखेळत काम करून घेणारा, चतुर, मुत्सद्दी (२) (पु,) खेळाडू, नट.
– डु (वि.) – खिलाडू.
खेवट(-टियो) (ખેવટ, ખેવટિયો) (पु.) – (१) मार्गदर्शक, नेता (२) सुकाणू धरणारा.
– टु (न.) – सुकाणू धरण्याचे – होडी हाकण्याचे काम.
खेवना (ખેવના) (स्त्री.) – काळजी, संभाळ.
खेश बिरादर (ખેશ બિરાદર) [फा.] (पु.) – आसेष्ट.
खेस (ખેસ) (पु.) – उपरणे, दुपट्टा.
– खंखेरवो, - खंखेरीने चालता थवुं, – खंखेरी नाखवो - उपरणे झाडून मोकळे होणे, जबाबदारी - अंग झाडून टाकणे.
– नाखवो – खांद्यावर उपरणे टाकणे.
– स पकडवो, खेसे वळगवुं – (१) गळ्यात पडणे (२) न सुटणारे लफडे गळ्यात पडणे.
खेसर (ખેસર) (पु.) – खेचर.
खेसववुं (ખેસવવું) (स. क्रि.) – बाजूला सारणे.
खेसी (ખેસી) (वि.) – निकटचे, जिवाभावाचे.
– सियुं (न.) – निकटचा आप्त.
खेह (ખેહ) (स्त्री.) – (१) धूळ, रजःकण (२) क्षय.
खेळ (ખેળ) (स्त्री.) – आर, पेज, खळ.
खेळो (ખેળો) (पु.) – नाटकात किंवा फार्सात स्त्रीचा वेष घेणारा पुरुष.
खैड (ખૈડ) (स्त्री.) – (१) पाणी न पाजता सुकू देणे (२) पुरता पाऊस न पडल्याने शेते सुकून जाणे. (३) दोराला पीळ देण्याचे अवजार.
– वाळवी – शेतात सुके होऊ न देणे - पाणी पाजणे.
– डियुं (वि.) – (१) बिन पाण्याचे. (२) (न.) सुकलेले शेत.
– डीयो गवार – समजावले तरी समजू न शकणारा जड मनुष्य.
खो(ખો) (स्त्री.) (१) – सवय (२) द्वेष, वैर, डाव.

–भुलाववी – सवय जाईलसे करणे, धडा शिकविणे.

–भूली जवी – (जन्माचा) धडा मिळणे.

–राखवी – द्वेष किंवा वैर बाळगणे, डाव धरणे.

खो (स्त्री.) – खाई, खिंड.

खो (पु.) – वंश, मूळ.

–काढी नाखवो – समूळ नाश करणे.

खोई (ખોઈ) – (१) मुलाला झोपविण्यासाठी बांधलेली झोळी. (२) खोळ.

खोख (ખોખ) (न.) – आकाराने मोठी पण आत रिकामी असलेली वस्तू.

खोखरुं (ખોખરું) (वि.) – (१) भरडा व पोकळ आवाज निघेल असे (२) अर्धमुर्धे फुटले - तुटलेले.

–करवुं – ठोकून काढणे.

–नाळियेर – निरर्थक काम.

खोखली (ખોખલી) (स्त्री.) – म्हातारे कोल्हे. (२) दात पडलेली म्हातारी.

–लुं (वि) – (१) जीर्ण झालेले, वृद्ध. (२) खोकला लागलेले.

–लो (पु.) – (१) खोकला, ढास. (२) जीर्ण - वृद्ध झालेला माणूस.

खोखुं (ખોખું) (न.) – (१) आतून पोकळ असलेली वस्तू. (२) खोके (३) भरपायी होऊन पावलेल्या हुंडीचा कागद. (४) नमुना, साचा (५) मसुदा, कच्चे लिखाण. (६) प्रेत, हाडांचा पिंजरा.

खोचरुं (ખોચરું) (वि.) – (१) पोकळ (२) खांड - खांच - पडलेले (३) वैर. (४) जुना जमाना.

–रेल (वि.) – खांच पडलेले.

खोचरे (ખોચરે) (अ.) – कोपऱ्यात लक्ष न जाईल अशा जागेत.

–पडवुं – उपेक्षिले जाणे.

खोचंडो (ખોચંડો) (पु.) – कोपरा, दुर्लक्षित ठिकाण.

खोज (ખોજ) (स्त्री.) – तपास, शोध.

–वुं (स. क्रि.) – शोधणे.

खोंच (ખોંચ) (स्त्री.) – (१) खाच, खांड (२) कसर, उणेपणा, (३) हरकत, विघ्न (४) अडचण.

खोट (ખોટ) (स्त्री.) – (१) कमी, घट, अपुरेपणा. (२) नुकसान, तोटा. (३) भूल, चूक.

–आववी, -जवी – नुकसान होणे.

–खावी – नुकसान सहन करणे.

–पडवी, –लागवी } – (१) अमक्याची उणीव भासणे. (२) घट येणे.

–भागवी – (१) नुकसान भरून येणे. (२) गरज भागणे.

–नुं छोकरुं – (१) प्रौढपणी झालेले अपत्य. (२) मुले जिवंत न राहाणाऱ्याचे जगलेले अपत्य.

खोटक(-का)वुं (ખોટક-કા-વું) (अ. क्रि.) – अडणे, थबकणे.

खोटको (ખોટકો) (पु) – (१) घट (२) अडणे.

खोटाई (ખોટાઈ) (स्त्री.) (१) खोटेपणा (२) आळशीपणा. (३) हरामी.

खोटाबोलुं (ખોટાબોલું) (वि.) – खोटे बोलणारे, बोललेले वचन बदलणारे.

खोटारवो (ખોટારવો) (पु.) – गोवऱ्या - शेणी जळून गेल्यानंतर राहिलेला राखेचा ढीग.

खोटारुं (ખોટારું) (वि.) – (१) खोटारडे (२) खोटे (३) (न.) खोटे बोलणे. (४) कारस्थान, कपट.

खोटारो (ખોટારો) (पु.) – विटेचा तुकडा. (२) विस्तव. (३) नखरा.

खोटी (ખોટી) – (१) (स्त्री.) विलंब (२) (अ.) विलंब होईल अशा रीतीने, उगीच थांबून राहावे लागेल असे.

–करवुं – वाट पाहायला लावणे, विलंब करणे.

–थवुं – वाट पाहणे, थांबून राहणे.

खोटीलुं (ખોટીલું) (वि.) – (१) अंग न मोडणारे, आळशी (२) वैगुण्य असलेले (३) (न.) संतान नसलेल्यास उशीरा झालेले अपत्य.

खोटुं (ખોટું) (वि.) – (१) खोटे (२) चुकीचे (२) वाईट, खराब (४) बेइमान (५) (न.) नुकसान, अन्याय, वाईट काम.

–करवुं – (१) अयोग्य गोष्ट करणे. (२) अन्याय करणे. (३) द्यावयाचे पैसे न देणे. (४) गमावणे, मनाला लागणे

–काटलुं – (१) उपयोगात न आणण्याजोगा काटा, तराजू. (२) आजारातून न उठण्याजोगा मनुष्य.

–थवुं – (१) खेदजनक घटना घडणे (२) पैसे हरणे.

–लागवुं – वाईट वाटणे, मनाला लागणें.

खोटा हाडकांनुं (वि.) – आळशी, हरामाचे खाणारे.

खोटी चाल – बदचाल, व्यभिचार.

–नजर – कुदृष्टी, वाईट नजर.

खोड (ખોડ) (स्त्री.) – (१) वाईट सवय (२) शारीरिक व्यंग. (३) चूक, दोष, कलंक. (४) (न.) झाडाचे खोड.

–आववी – न्यून - वैगुण्य राहणे.

–काढवी – (१) दोष काढणे. (२) निंदा करणे.

–भागवी – एखादी खोड सोडविणे.

–भुलाववी – (जन्माचा) धडा शिकविणे, वाईट सवय सोडायला लावणे.

–रही जवी – वैगुण्य राहणे.

–खांपण – खोड-दोष.

खोड्वुं (ખોડવું) (स. क्रि.) – (१) पुरणे (२) उभे करणे (३) मोडणे (४) अपंग करणे.
खोडसुं (ખોડસું) (न.) – झाडाचे जुने खोड.
खोडंग(-गा)वुं, खोडावुं (ખોડંગ-ગા-વું, ખોડાવું) (अ. क्रि.) – लंगडणे.
खोडियुं } (वि.) – अपंग, व्यंग असलेले.
खोडीलुं }
खोडो (ખોડો) (पु.) – (१) डोक्यातला कोंडा (२) खवडा (३) संहार, नाश.
–काढवो, -काढी नाखवो – संहार करणे.
–नीकळी जवो – महान् संहार होणे.
खोणियुं (ખોણિયું) (न.) – गुण्या.
खोतरणी (ખોતરણી) (स्त्री.) – (१) दात-कान कोरणे. (२) खुरपे. (३) छन्नी, कोरीव काम करण्याचे हत्यार (४) कोरीव काम, नक्षीकाम.
–णुं (न.) – (१) कोरीव काम करण्याचे हत्यार (२) खुरपे (३) द्वेषाने काढलेले दुसऱ्याचे छिद्र.
खोतरवुं (ખોતરવું) (क्रि.) – (१) कोरणे, (२) दुर्दशा करणे, मुळापासून उखडून काढणे.
खोतरामण (ખોતરામણ) (न.) – कोरीव कामाची मजुरी.
खोतरुं (ખોતરું) (न.) – बहाणा, निमित्त.
खोदणी (ખોદણી) (स्त्री.) – (लाक्ष.) निंदा, एखाद्याची छिद्रे-दोष शोधून काढणे.
–करवी, -खोदवी – दोष पाहात राहणे, निंदा करणे.
खोदुं(-धुं) (ખોદું-ધું) (न.) – (१) लाडाचा जाड ढलपा (२) (वि.) मूढ, ढ, बेअकली.
खोप (ખોપ) (पु.) – (१) वेत, बोरू (२) ढग.
खोपटुं (ખોપટું) (न.) – खोपटे.
खोपरी (ખોપરી) (स्त्री.) – खोपडी.
–मां पवन भरावो, -होवो – डोक्यात वारे शिरणे, गर्वाने फुलणे.
–(एक) खोपरी होवुं – वैशिष्टय दाखविणारा मेंदू असणे.
खोपी, -लुं (ખોપી, ખોપીલું) (वि.) – लटपट्या.
खोफ (ખોફ) [अ.] (पु.) – (१) भय, धोका (२) राग.
–नाक – (वि.) – धोक्याचें, भयानक.
खोबलो, खोबो (ખોબલો, ખોબો) (पु.) – (१) ओंजळ (२) ओंजळभर माप.
–भरवो – ओंजळीत मावेल तितके घेणे.
खोभण(-णी) (ખોભણ-ણી) (स्त्री.) – (१) गुहा, गुफा (२) खोब्रण.
खोभना (ખોભના) (स्त्री.) – खोड, दोष.
खोभरण (ખોભરણ) (स्त्री.) – ढिलाई, उशीर.
खोभरवुं (ખોભરવું) (अ. क्रि.) – खोटी-विलंब होणे, वाट पाहात राहणे, थांबणे.
खोयणी (ખોયણી) (स्त्री.) – फोडणी.
खोयणुं (ખોયણું) (न.) – (१) कोलीत (२) पलिता (३) (लाक्ष.) कोलीत लावणे, भांडणाची ठिणगी पाडणे.
खोयाण (ખોયાણ) (न.) – खोल गुहा.
खोरड, -डुं (ખોરડ-ડું) (न.) – (१) झोपडे, मातीच्या भिंती असलेले लहान घर (२) खोली.
खोरण (ખોરણ) (न.) – विझून गेलेली वस्तू (२) विस्तव हलवून सतेज करण्याचे साधन.
खोरणी (ખોરણી) (स्त्री.) – (१) विझत चाललेल्या विस्तवाला हलवून सतेज करण्याची क्रिया (२) चिथावणी (३) फोडणी.
खोरणुं (ખોરણું) (न.) – पाहा 'खोयणुं'.
खोरवावुं (ખોરવાવું) (अ. क्रि.) – विखरून जाणे.
खोरवुं (ખોરવું) (स. क्रि.) – विस्तव सतेज करण्यासाठी निखारे खालीवर करणे.
खोरसुं (ખોરસું) (न.) – तीन पायांची घोडी, तिपाई.
खोरंचे (ખોરંચે) (अ.) – कोनाकोपऱ्यात, दूर.
खोरंचो (ખોરંચો) (पु.) – अंतराय, विघ्न.
खोराक (ખોરાક) (पु.) – खाद्यपदार्थ.
–की (स्त्री.) – (१) निर्वाहाची वस्तू (२) तिचा खर्च.
–की पोशाकी [फा.] (स्त्री.) – (१) अन्नवस्त्र. (२) त्याचा खर्च.
खोरियुं (ખોરિયું) (न.) – कोलीत.
खोरीठ (ખોરીઠ) (वि.) – (खाण्याच्या बाबतीत) जबरा-री-रे, किंवा शोकीन.
खोरुं (ખોરું) (वि.) – बिटलेले (अन्न).
खोराट (ખોરાટ) (पु.), खोराश (स्त्री.) – बिटकेपणा.
खोल (ખોલ) (स्त्री.) – (१) उणीव (२) सुरकुती (३) ढोल (झाडाची) (४) लोंबू लागलेली जीर्ण कातडी. (५) सापाची कात (६) खोळ (गादी, तक्क्या इ. ची), (७) बिदी (काठी टेकण्याच्या टोकाला लोखंडाची बसवितात ती).
–आववी, -पडवी – खोळ पडणे, तंगपणात ढिलेपणा येणे.
–ऊतरवी, -ऊतरी जवी – चामडी किंवा कात उतरणे-निघून जाणे.
–चडाववी – अभ्रा चढविणे.
–भरवी – कपड्याचा ढिला पडणारा भाग शिवून घेणे.
खोलको (ખોલકો) (पु.) – गाढव.
खोलवणुं (ખોલવણું) (न.) – पेचकस, 'स्क्रू ड्रायव्हर'.
खोलवुं (ખોલવું) (स. क्रि.) – (१) उघडणे (२) काढणे, स्थापन करणे.
खोवुं (ખોવું) (स. क्रि.) (१) – गमावणे. (२) तोटा होणे.
खोई नाखवुं – गमावणे.

–बेसवुं – (१) गमावणे (२) हरणे.
खोवडा(-रा)ववुं (ખોવડા-રા-વ્વું) (स. क्रि.) – गमवायला लावणे, गमावेल असे करणे.
खोवावुं (ખોવાવું) (अ. क्रि.) – हरविले जाणे.
खोसवुं (ખોસવું) (स. क्रि) – खोचणे.
खोह (ખોહ) (स्त्री.) – गुहा.
खोहाण (ખોહાણ) (पु.) – नदीची दरड.
खोहो (ખોહો) (पु.) – (१) खोचणारा मनुष्य (२) लठ्ठ पण आळशी मनुष्य.
खोळ (ખોળ) (पु.) – तेल काढून घेतल्यानंतर राहिलेला तेलबियांचा चोथा, पेंड.
खोळ (स्त्री.) – तपास, शोध.
–वुं (स. क्रि.) – शोधणे, तपास करणे.
खोळंखोळा, खोळाखोळ(-ळी) (ખોળંખોળા, ખોળાખોળ-ળી) (स्त्री.) – शोधाशोध.
खोळंबो(-भो) (ખોળંબો-ભો) (पु.) – खोळंबा, विलंब.
खोळंबे नाखवुं – खोळंबा करून वाट पाहायला लावणे.
–पडवुं – खोळंबा होईल अशा प्रसंगात सापडणे.
खोळाधर (ખોળાધર) (पु.) – जामीन.
–री (स्त्री.) – जामीनगिरी.
खोळांखंखोळां, खोळांखांखां (ખોળખંખોળાં, ખોળાંખાંખાં) (न-ब. व.) – खूप बारकाईचा तपास.
खोळियुं (ખોળિયું) (न.) – (१) अभ्रा (२) शरीर, कलेवर.
–चडाववुं – अभ्रा घालणे.
–यामां जीव आववो – निश्चिंतता वाटणे, जीव भांड्यात पडणे.
–यामांथी जीव ऊडी जवो – जिवंत जीव नसणे, चिंता लागणे, घाबरगुंडी उडणे.
खोळी (ખોળી) (स्त्री.) – विटी (काठीच्या टोकाला बसवितात ती)
खोळो (ખોળો) (पु.) – (१) मांडी (२) काही घेण्याकरिता धोतराचा भाग झोळीसारखा करतात तो.
खोळामां घालवुं – (१) प्रेमाने मांडीवर घेणे. (२) आश्रय देणे.
खोळे घालवुं – मुलगी सासरी जाताना आप्तेष्टांनी तिला पैसे - भेट देणे.
–बेसाडवुं – (१) लग्न ठरण्याच्या वेळी मुलीला सासूसासऱ्याच्या मांडीवर देणे. (२) दत्तक घेणे. (३) विश्वास देणे.
–माथुं मूकवुं – शरण जाणे.
–लेवुं – (१) दत्तक घेणे. (२) स्वीकार करणे.
–सोपवुं – सुपूर्द-हवाली करणे, सोपविणे.
खोळो पाथरवो – आजीजी करणे, पदर पसरणे.
–भरवो – गर्भाधान करणे.
–धरवो, वाळवो – (१) काही घेण्यासाठी ओचा पुढे करणे. (२) मागणे.
ख्याल (ખ્યાલ) (पु.) – कल्पना, विचार, तर्क, स्मरण. (२) पाठ, पिच्छा. (३) गायनाचा एक प्रकार.
–करवो – कल्पना - विचार करणे.
–छोडवो – (१) विचार सोडून देणे. (२) पाठ सोडणे.
–बांधवो – तर्क करणे, कल्पना करणे.
–राखवो – ध्यानात किंवा स्मरणात ठेवणे.
–मां होवुं – लक्षात - स्मरणात असणे.
ख्यालियो (ખ્યાલિયો) (पु.) – ख्याल-टप्पा गाणारा गवई.
ख्याली (ખ્યાલી) (वि.) – (१) कल्पनाराज्यात रमणारा, (२) ख्याल जोडणारा.
ख्वाब (ખ્વાબ) [फा.] (पु. न.) – स्वप्न.
–बी (वि.) – (१) स्वप्नासंबंधीचे (२) स्वप्नाळू.

## ग (ગ)

गई (ગઈ) – (१) 'जवुं' या धातूचे भूतकाळचे स्त्रीलिंगी रूप, गेली (एक.), गेल्या (बहु.) (२) (वि.) गेलेली.
–ते गई – कायमची निघून गेली.
–काल – काल, 'आज'च्या अगोदरचा दिवस.
–काले (अ.) – (१) काल (२) (लाक्ष.) जणू नुकतेच.
–गुजरी (स्त्री.) – घडून गेलेली हकीकत - घटना.
गग्गो (ગગ્ગો) (पु.) – गकार.
ग(-ड)गडवुं (ગ-ડ-ગડવું) (अ. क्रि.) – गडगडणे.
ग(-ड)गडाववुं (ગ-ડ-ગડાવવું) (स. क्रि.) – (१) गडगडेल असे करणे (२) सपाट्याने – न थांबता – काम चालविणे.
ग(-ण)गणवुं (ગ-ણ-ગણવું) (अ. क्रि) – (१) नाकात बोलणे. (२) (लाक्ष.) आपली अनिच्छा अस्पष्टपणे दर्शविणे. (३) (स. क्रि.) आपणाशीच बडबडणे.
गगन (ગગન) नां कुसुम - फूल - वीणवां / –पक्षी झालवां – अशक्य काम करणे किंवा करण्याचा प्रयत्न करणे.
–मां उडवुं – (१) अदृश्य – गुप्त – होणे (२) व्यर्थ जाणे. (३) फुगणे (गर्वाने).
–मां गाजवुं – (१) दिगंती गाजणे. (२) मोठेपणाने राहणे.
–मां चडाववुं – अति स्तुती करून चढविणे.

नीचलुं (नीચલું) वि. – खालचे.
नीचाण (नीચાણ) (न.) – (१) उतार (२) खालची जागा.
नीचुं (नीચું) (वि.) – (१) उतरते (२) ठेंगणे, गिड्डे (३) नीच, हलके.
– घालवुं, -जोवुं – लज्जेने मान खाली घालणे.
– पडवुं – हलके ठरणे, खोटे ठरणे.
– लागवुं – अपमानकारक वाटणे.
नीचा बापचुं – हलक्या कुळाचे.
नीची गरदने,-मूंडिए – खाली मान घालून.
नीचे (अ.) – खाली.
नीठ (नीઠ) (अ.) – नक्की.
– वुं (अ. क्रि.) – (१) संपणे (२) काळ घालविणे. (३) शेवट येणे.
नीठियो (नीઠિયો) (पु.) – तुटवडा, दुष्काळ.
नीडर (नीડર) (वि.) – निर्भय.
नीतरवुं (नीતરવું) (अ. क्रि.) – (१) टपटप गळणे (२) कचरा खाली बसून पाणी नितळ होणे.
नीतर्युं (नीतर्युं) (वि.) – नितळ झालेले, स्वच्छ.
नींद, नींदर (नींદ,नींદર) (स्त्री.) – निद्रा, झोप.
नींदण (नींદણ) (न.) – निंदणी करून काढलेले तण.
नींदरवुं (नींદરવું) (अ. क्रि.) – झोपणे, निद्रा घेणे.
नींदवुं (नींદવું) (स. क्रि.) – तण काढणे, भांगलण करणे.
नींदामण (नींદામણ) (न.), -णी (स्त्री.) – कांगलण – निंदणी मजुरी.
नीपज नीપજ (स्त्री.) – निपज, पैदास.
– वुं (अ. क्रि.) (१) निपज होणे, उत्पादन होणे. (२) घडणे, परिणाम होणे. (३) लाभ होणे.
नीपट(-ड) (नीપટ-ડ) (वि.) – (१) निर्लज्ज (२) (अ.) अगदी, निव्वळ.
नीपनवुं (नीપનવું) (स. क्रि.) – उत्पादन करणे.
नीभवुं (नीભવું) (अ.क्रि.) – आहे तसेच चालू राहणे, टिकून राहणे.
नीभो (नीભો) (पु.) – कुंभाराची भट्टी, आवा.
नीम (नीમ) (वि.) – निम्मे, अर्धे.
– वैद (-द्य),– हकीम (पु.) – वैदू.
– मे (अ.) – अर्ध्या हिश्शाने.
– मे नीम (वि.) – निमेनिम.
नीम(-व)डवुं (नीમ-વ-ડવું) (अ. क्रि.) – (१) पक्के होऊन – ठरून प्रकट – जाहीर होणे (२) बनून अस्तित्वात येऊन पक्के होणे.
नीमवुं (नीમવું) (स. क्रि.) – नियुक्त करणे, नेमणे.
नीमी (नीભી) (स्त्री.) – हुंडी.
नीमो (नीમો) (पु.) – (१) नवरदेवाचा एक पोशाख, (२) आवा, कुंभाराची भट्टी.
नींभरवुं (नींભરવું) (स. क्रि.) – ताकाचे - दह्याचे - भांडे उकळत्या पाण्याने विसळणे - स्वच्छ करणे.
नीरख (नीરખ) (पु.) – निरख, चालू भाव.
– वुं (स. क्रि.) – निरीक्षणे, लक्षपूर्वक पाहणे.
नीरज (नीરજ) (वि.) – स्वच्छ.
नीरण (नीરણ) (न.) – ढोरापुढे टाकलेले गवत, चारा.
– वुं (स. क्रि.) – चारा टाकणे.
नीरम (नीરમ) (न.) – जहाज पाण्यात समतोल राहावे म्हणून ठेवण्यात येणारे वजन.
नीरो (नीરો) (पु.) – (१) चारा (२) नीरा (पिण्याची).
नीलवर (नीલવર) (पु.) – निळीची शेती करविणारा इंग्रज जमीनदार.
नीली (नीલી) (स्त्री.) – निळी.
नीलोपल (नीલોપલ) (पु.) – मोरचूद.
नीलम (नीલમ) [फा.] (न.) – नीलमणी.
नीवळ (नीવળ) (न.) – दह्याची निवळ – दह्यातून काढून घेतलेले पाणी.
नीवार (नीવાર) / नवार (नवार) } (पु.) – सावे (धान्य).
नीवि(-वी) (नीવિ-વી) (स्त्री.) – (१) साडीची कमरेला घातलेली गाठ (२) गूळ, तूप, दूध वगैरे न खाण्याचे श्रावकांचे व्रत (३) भांडवल, पुंजी.
– बंध (पु.) – घागऱ्याच्या नाडीची गाठ.
नीसरवुं (नीસરવું) (अ. क्रि.) – (१) बाहेर पडणे (२) पसार होणे.
नुक्ती (नुક્તી) (स्त्री.) – राजगिऱ्याच्या पिठात साखर मिसळून केलेले एक खाद्य.
नुक्तेचीन (नुકતેચીન) (वि.) – छिद्रान्वेषी, दुसऱ्याच्या उणीवा शोधणारे.
– नी (स्त्री.) – दुसऱ्याच्या दोषांची टीका-निंदा.
नुकसान (नुકસાન) [अ.] (न.) – (१) तोटा (२) बिघाड, हानि.
– जवुं,-पहोंचवुं – हानि होणे, तोटा होणे.
– उठाववुं – तोटा सहन करणे.
– मां आववुं,-उतरवुं,-पडवुं – बिघाड-हानि होणे, तोट्यात येणे.
– लागवुं – हानि होणे.
नुसखो (नुसખो) (पु.) – वैद्याने लिहून दिलेले औषध किंवा त्याचा कागद, 'प्रिस्क्रिप्शन'.

नुं (नुं) – षष्ठी विभक्तीचा प्रत्यय, 'चें'.
नूगरुं (नूगरुं) (वि.) – (१) गुण न जाणणारे, कृतघ्न (२) निर्लज्ज.
नूनम (नूनभ) (स्त्री.) – न्यूनता, कमीपणा.
नूर (नूर) (न.) – भाडे बोट, रेल्वे इ. तून माल नेण्या-आणण्याचे).
– बेसवुं – भाडे द्यावे लागणे.
– भरवुं – भाडे भरणे.
नूर² [अ.] (न.) – तेज.
– त (स्त्री.) – प्रकाश, तेज.
– री (वि.) – तेजस्वी.
– रेखुदा (न.) – दैवी तेज.
– रेचश्म (न.) – डोळ्यांचे तेज.
ने (ने) (अ.) – (१) आणि (२) द्वितीया व चतुर्थी विभक्त्यांचा प्रत्यय, 'ला'
नेक (नेक) [फा.] (वि.) – (१) प्रामाणिक, सच्चे, न्यायी, (२) नीतिमान (३) धार्मिक (४) (स्त्री.) प्रामाणिकपणा, न्यायीपणा (५) (पु.) हद्द, प्रमाण (६) भाव, दर.
– ठरावबो,-बांधवो – प्रमाण-भाव नक्की करणे.
– राखवो – हद्द संभाळणे.
– नजर (स्त्री.) – स्वच्छ नीती, दानत.
– नामी (स्त्री.) – कीर्ती, ख्याती.
– बख्त (वि.) – भाग्यवान.
– की (स्त्री.) – (१) प्रामाणिकपणा (२) सज्जनता (३) सदाचार.
– कीदार (पु.) – चोपदार.
– को (पु.) – (१) नियम, व्यवस्था (२) कायदा, (३) हद्द, प्रमाण.
नेखम (नेखम) (पु.) – खोल गेलेला खिळा.
नेचो [फा.] (पु.) – नेचा, हुक्क्याची नळी.
नेजवुं (नेजवुं) (न.) – छपराचे पाखे, पाणपट्टी. (२) डोळ्यांवर हाताचा पंजा छपरासारखा धरून पाहणे.
नेजरा (पु. ब. व.) – कटाक्ष, नजरा.
नेजुं (नेजुं) (न.), – जो (पु.) – (१) निशाण (२) बर्ची (३) भाला.
नेट (नेट) (अ.) – नक्की.
नेटां (नेटां) (न. ब. व.), नेटी (स्त्री.) – बारकाईने शोध.
– लेवां – चूक शोधण्याकरिता एकसारखे मागे लागणे.
नेठवुं (नेठवुं) (अ. क्रि.) – हटणे, हरणे.
नेठो (नेठो) (पु.) – शेवट, कड.
नेडु (नेडुं) (वि.) – जवळचे.
– डे (अ.) – (१) तोंडाला, पाठीशी, नजीक.

नेडो (नेडो) (पु.) – (१) प्रेम, लळा. (२) बारकाईचा तपास.
– लागवो – लळा लागणे.
– लेवो – मागे लागून शोध काढणे.
नेतर (नेतर) (न.) – वेत, वेताची छडी.
नेतरुं (नेतरुं) (न.) – (दही घुसळण्याच्या) रवीची दोरी.
नेता पहोंचवा – गुप्त बातमी मिळणे, अगोदर कळणे.
नेन (नेन) (न.) – नयन, नेत्र.
– नो तारो – डोळ्यांतली बाहुली.
नें (स्त्री.) – हुक्क्याची नळी.
नेपुर (नेपुर) (न.) – नूपुर.
नेम (नेम) (स्त्री.) – (१) निशाणी (२) आशय, हेतू (३) (पु.) नियम (४) अर्धा भाग.
– चूकवी – (१) निशाणी चुकणे (२) काम पार न पडणे.
– ताकवी – (१) निशाण धरणे, नेम धरणे (२) हेतू बाळगणे.
– लेवी – नेम धरणे.
– लेवो – व्रत घेणे.
नेमि(-मी) (नेमि-मी) (स्त्री.) – (१) विहिरीवरील गडगडी (२) चाकाचा परीघ.
नेरुं (नेरुं) (अ.) – जवळ.
नेव(-वुं) (नेव-वुं) (न.) – (१) कौल (२) त्यांतून पडणारे पाणी (३) नळा.
नेवां पडवां – कौलातून पावसाचे पाणी खाली पडणे.
नेवे मुकवुं – बाजूला सारणे, दूर करणे, उपेक्षा करणे.
नेवकुं (नेवकुं) (अ.) – बिलकुल, अगदी.
नेवर (नेवर) (न.) – नूपुर.
नेवल (-ळ) (नेवल-ळ) (स्त्री.) – (१) बेडी (२) एक दागिना.
नेवाणी (नेवाणी) (स्त्री.) – जेथे पावसाचे पाणी कौलांच्या नळांतून खाली पडते ती जागा, नळाखालची जागा.
नेस (नेस) (वि.) – (१) अपशकुनी (२) कमनशिबी (३) कंजूष.
नेस (-डो) (नेस, – डो) (पु.) – धनगरांनी रानात बांधलेल्या झोपड्यांचे गाव (२) धनगराची झोपडी.
नेस्ती (नेस्ती) (पु.) – धान्य, तूप, तेल, मसाला इ. चा व्यापारी, वाणी.
नेह (नेह) (पु.) – प्रेम, स्नेह.
– ही (वि.) – स्नेहशील.
नेह (स्त्री.) – हुक्क्याची नळी.
नेहारी (नेहारी) (स्त्री.) – न्याहारी.
नेळ (नेळ) (स्त्री.) – (१) बोळ (२) अरुंद तोंडाची नळी (३) – चो (पु.) – हुक्क्याच्या नळीचा तोंडात घालण्याचा भाग.

नैगम (નૈગમ) [सं.] (पु.) – (१) वाणी, व्यापारी (२) वेद समजावून देणारा (३) नागरिक (४) उपाय (५) उपनिषद.
नैड (નૈડ) (वि.) – शठ, लुचे.
नैयत (નૈયત) [अ.] (स्त्री.) – दानत, वृत्ती.
नैवेद, – द्य (न.) – नैवेद्य.
– धरवुं, – धरावयुं – नैवेद्य दाखविणे.
नो – षष्ठी विभक्तीचा पु. प्रत्यय. 'चा'
नोक(-ख) (નોક-ખ) (वि.) – (१) काही निराळे (२) सुंदर.
नोक(-ख) [फा.] (पु. स्त्री.) – (१) अणी, टोक, (२) अब्रू, ब्रीद (३) शोभा, छटा (४) नोकझोक.
– जाळववी, – राखवी, – साचववी – अब्रू राखणे, ब्रीद संभाळणे.
– लेवी – अब्रू घेणे.
– दार (वि.) – टोकदार.
नोकराणी (નોકરાણી) (स्त्री.) – स्त्री नोकर किंवा नोकराची स्त्री.
– रियाद(-त) (वि.) – (१) नोकरी करणारा-री-रे (२) पराधीन.
नोखुं (નોખું) (वि.) – वेगळे.
– पाडवुं – अलग करणे.
नोंगरवुं (अ. क्रि.) – नांगराला बैल जुंपून नांगरण्याला तयार करणे.
नोझणासांकळ (નોઝણાસાંકળ) (स्त्री.) – दाराची वरच्या चौकटीच्या फळीला लावण्याची कडी.
नोझणुं (નોઝણું) } (न.) – धार काढण्याच्या वेळी नाठाळ
नोंजणुं (નોઝ્જણું) }
गायीच्या मागच्या पायांना बांधण्याची दोरी.
नोतर (નોતર) (स्त्री.) – आमंत्रित पाहुण्यांचा समूह.
– वुं (स. क्रि.) – निमंत्रण देणे.
– रियुं (न.) – निमंत्रित मनुष्य.
– रियो (पु.) – निमंत्रणे द्यायला जाणारा माणूस.
नोतरुं (નોતરું) (न.) – निमंत्रण.
– करवुं – निमंत्रण द्यावयास जाणे.
– कापवुं – निमंत्रण पाठविण्याचे बंद करणे, निमंत्रण मिळण्याचा एखाद्याचा हक्क रद्द करणे.
– झीलवुं – निमंत्रण स्वीकारणे.
नोतरा काढवां – निमंत्रणे पाठविणे.
– करावबां,-फेरववां – निमंत्रणे करणे.
नोधडियो (નોધડિયો) (पु.) – मुलगा, छोकरा.
नोधडी (નોધડી) (स्त्री.) – मुलगी.
नोधलियुं (નોધલિયું) (वि.) – धाकटे.
नोधलुं (નોધલું) } (न.) – मूल.
नोंधलुं }
नोधारुं (નોધારું) (वि.) – निराधार.
नोंध (નોંધ) (स्त्री.) – (१) टाचण, टिपण (२) नोंदवही.
– लेवी – (१) टाचण करणे (२) लक्षात घेणे.
नोबत (નોબત) [अ.] (स्त्री.) – (१) मोठा नगारा. (२) अमुक निश्चित वेळी नगारा वाजण्याचे ठिकाण.
नोम (નોમ) (स्त्री.) – नवमी तिथी.
नोर (નોર) (न.) – (१) पहा 'कर'.
नोरतुं (નોરતું) (न.) – नवरात्रातला प्रत्येक दिवस.
– तां (न. ब. व.) – नवरात्राचे दिवस, आश्विन शुद्ध १ ते ९
नोरो (નોરો) (पु.) – आजीजी, गयावया.
– मानवो – मनापासून आभार मानणे.
नोळ (નોળ) (पु.) – मुंगूस (२) पहा 'नोर'.
नोळवुं (નોળવું) (स. क्रि.) – दही-दुधाचे मातीचे भांडे नारळाच्या शेंडीने घासून स्वच्छ करणे.
नोळियो (નોળિયો) (पु.) – मुंगूस.
नोळुं (નોળું) (न.) – दही-दुधाचे मडके धुण्याची नारळाची वगैरे शेंडी किंवा काथ्या.
नौतम (નૌતમ) (वि.) – अत्यंत नवीन.
नौशाह (નૌશાહ) [फा.] (पु.) – नवरदेव.
न्यक्कार (ન્યક્કાર) [सं.] (पु.) – अपमान.
न्यात (ન્યાત) (स्त्री.) – ज्ञाती, जात.
– नीलुं (वि.) – (१) स्वजातीचे (२) (न.) आपल्या जातीचा माणूस.
– तुं (न.) – नातें.
न्यामत (ન્યામત) (स्त्री.) – (१) धनदौलत (२) सुख (३) दुर्लभ वस्तू.
न्याल (ન્યાલ) (वि.) – (१) कृतार्थ (२) धनवान.
न्योछावर (ન્યોછાવર) (वि.) – (१) समर्पित, बलिदान केलेले, (२) (न.) भेट.

# प (५)

पई (પઈ) (स्त्री.) – छापखान्यात निकामी झालेला टाइप – ठसा
पकडी पाडवुं – (१) गाठणे (२) शोधून काढणे.
– राखवुं – (१) पकडून ठेवणे (२) चिकटून राहणे.
– लेवुं – (१) उचलून घेणे (२) एकदम पकडून ताब्यात घेणे किंवा लक्षात घेणे.
पक(-का) ववुं (પક-કા-વવું) (स. क्रि.) – स्वैपाक करणे, शिजविणे. (२) मातीचे वगैरे भांडे भट्टीत भाजून पक्के करणे (३) पिकविणे.
पकवान (પકવાન) (न.) – पकवान्न, तळून बनविलेला खाद्यपदार्थ.
– पाडवां(-वुं) – पक्वान्न बनविणे.
पकवासी (પકવાસી) (स्त्री.) – (१) लेथ, घाडा. (२) तक्तपोशीच्या खाली असलेल्या फळ्यांच्या सांध्याच्या चिरीवर मारलेली फळीची किंवा लोखंडी चीप.
– सुं (न.), सो – (पु.) – (१) कांबट (२) छपराच्या वाश्यांवर मारलेली पट्टी.
पक्कं (પક્કું) (न.) – (१) माहितगार, न फसण्याजोगे (२) धूर्त (३) पुरते (४) पक्के, खंबीर. (५) भ्रष्ट किंवा ओवळे न होण्याजोगे (अन्न).
– क्काई (स्त्री.) – धूर्तता, लुच्चेगिरी.
पक्वाशय (પક્વાશય) (पु.) – कोठा.
पक्ष करवो, – खेचवो – ताणवो – एका पक्षाची बाजू घेणे, पक्षपात करणे.
– लेवो – एखाद्या बाजूची किंवा मुद्द्याची वकिली – तरफदारी करणे.
– मंत्री – (पु.) – वकील.
पक्षापक्ष (પક્ષાપક્ષ) (पु.), – क्षी (स्त्री.) – तट पडणे, भेदभाव.
पक्षोत्पात (પક્ષોત્પાત) (पु.) – कोणत्याहि एका पक्षाकडे न झुकता दोन्ही पक्षांना संभाळून घेणे.
पक्ष्म (પક્ષ્મ) [सं.] (न.) – पापणी.
पख (પખ) (पु.) – पक्ष, बाजू.
– पखा (स्त्री.) – भेदभाव, तट.
पख(-ग)तुं (પખ-ગ-તું) वि.) – विशाल, मोकळे, ऐसपैस.
पखरावुं (પખરાવું) (अ. क्रि.) – पसरणे.
पखवाडीक (પખવાડિક) – (१) (वि.) पाक्षिक (२) (न.) पाक्षिक पत्र.
पखवाडुं(-डियुं) (પખવાડું-ડિયું) (न.) – पंधरवडा, पक्ष.
पखाज (પખાજ) (स्त्री.) – पखवाज.
– जी (पु.) – पखवाजी.

पखालची (પખાલચી)
पखाली (પખાલી) } (पु.) – पखालवाला.
पखाल (પખાલ) (स्त्री.) – (१) सर्व निर्माल्य वगैरे काढून टाकून संध्याकाळी देवस्थानाचे होणारे प्रक्षालन (२) प्रक्षालन
पखाळवुं (પખાળવું) (स. क्रि.) – पाण्याने धुणे.
पग (પગ) (पु.) – (१) पाय (२) (लाक्ष.) ये – जा (३) मूळ.
– आगळ धरवो – पाऊल पुढे टाकणे, पुढे जाणे.
– आववा – (१) पाय येणे, चालायला येणे. (२) स्वावलंबनाची शक्ती येणे (३) चालते होणे, अदृश्य होणे.
– उठाववा, – उपाडवा – (१) जलद जलद चालणे. (२) निघून जाणे, बाजूला होणे.
– उपर पग चडाववा – आळसात किंवा बेफिकीर होऊन बसणे.
– करवा – निघून जाणे, अदृश्य होणे.
– काढवो (१) ये – जा बंद करणे (२) बहिवाट बंद करणे. (३) काढता पाय घेणे. (४) बाजूला करणे – सारणे.
– घालवो – दाखल होणे, मध्येच घुसणे.
– चलाववा – जलद चालणे.
– चंपावो – पाय घाणीत पडणे.
– चालवा – पायांत बळ असणे.
– चांपवा – पाय दाबणे.
– चूंथावा – पायांत गोळे येणे, पाय वळणे.
– छुटो करवो – पाय मोकळे करणे.
– जोईने पाथरणुं ताणवुं – अंथरूण पाहून पाय पसरणे.
– टकवो – बूड स्थिर राहणे.
– टकावी राखवो – (१) येण्या-जाण्याचा संबंध चालू ठेवणे-टिकवणे (२) दम धरणे.
– टाळवा – पाय काढता घेणे, जाणे-येणे किंवा व्यवहार बंद करणे.
– ठोकीने ऊभा रहेवुं – पाय रोखून भक्कमपणे तोंड द्यायला तयार होणे.
– ढीला पडवा – बेहिंमत-निरुत्साही होणे.
– तळे घसी नाखवुं – अतिपरिचयाने अवज्ञा करू लागणे.
– तळे घालवुं – (१) दाबून ठेवणे (२) अंकुशाखाली-नियंत्रणात घेणे.
– तळे चांपवुं – टाचेखाली दाबून टाकणे-ठेवणे.
– तळेनी वाट – पायाखालची वाट.
– तळे मोत होवुं – मरण यायला वेळ न लागणे.
– तळे बळतुं होवुं – स्वतःमध्येच दोष असणे, आपल्या पायाखालीच जळणे.

–तळे वाटी नाखवुं–(१) चांगल्या परिचयाचे करून घेणे (२) तुच्छ गणणे.
–तोडवा–निरर्थक फेऱ्या मारणे.
–तोडाववा–(१) विनाकारण हेलपाटे घालायला लावणे. (२) पाय दाबून घेणे.
–थवा–(१) शक्ति किंवा समजूत यायला लागणे. (२) निघून जाणे, चालते होणे.
–थवो–शिरकाव होणे, येणे-जाणे-परिचय-वळण चालू होणे.
–थाकवा–निरुत्साही होऊन सोडून देणे.
–धोई पीवा–ऋणी राहाणे, उपकार-आभार मानणे.
–न ऊपडवा–(१) पाय न निघणे, (२) संकोच होणे.
–नीकळी जवो–येणे-जाणे-वळण बंद होणे.
–पाछा पडवा–हरणे, हिंमत न होणे.
–पाताळमां–पेटमां होवा–पोटात पाय असणे, आतल्या गाठीचे असणे.
–पेसवो–शिरकाव होणे, जाणे-येणे चालू होणे.
–बांधीने रहेवुं–एके जागी टिकून राहणे.
–भागवा–(१) पायांत अशक्तता येणे, (२) मध्येच अटकणे, निराश होणे. (३) पाय मोडणे, लंगडे करणे (४) नाउमेद करणे (५) हार खायला लावणे.
–मांडवो–(१) पाय रोवून उभे राहणे (२) पुढे कूच करणे (३) प्रवेश करणे (४) धंद्याची सुरुवात करणे.
–मोडवा–निराश होणे.
–वधारवो–वगवशिला वाढविणे.
–वाळवो–विसावा घेणे.
–वाळी बेसवुं–निश्चिंतपणाने आराम करणे.
–कह्यूं करता नथी–पाय पुढे चालतच नाहीत.
–नी चळ भागवी–पायाची खाज जिरविण्याकरिता-फिरण्याकरिता म्हणून फिरणे.
–नुं आखुं,–नुं भागेलुं–चालण्याचा आळस किंवा कंटाळा असलेले.
–नुं खरुं,-सबधुं,-साचुं,-सबळुं–मजबूत पायांचे, खूप चालू शकण्यासारखे.
–उपाडो (पु.)–जलद चाल.
–चंपी (स्त्री.)–पाय दाबणे.
–तोड (स्त्री.)–विनाकारण हेलपाटे.
–दोड (स्त्री.)–पायाचे श्रम.
–थियुं (न.)–पायरी.
–थी–(स्त्री.)–(१) पायवाट (२) पायी चालण्याकरिता रस्ता, 'फूटपाथ'
–दंडी (स्त्री.)–पायवाट
–दंडो–(१) हातात काठी वगैरे न घेता इकडेतिकडे फिरणे. (२) थोडाफार मदतगार (३) जंगलातील पायवाट.
–पाळुं (वि.)–पायी चालणारे.
–पेसारो (पु)–शिरकाव.
–भर (वि)–दुसऱ्याच्या आधाराशिवाय टिकून राहाण्याजोगे.
–भर थवुं–दुसऱ्याच्या आधार न घेता टिकून राहण्याजोगे होणे.
पगे करवुं,–बेसाडवुं–मुलाला हागविण्यासाठी पायांवर बसविणे.
–कमाड ठेलवां–अप्रत्यक्षपणे, युक्तीने काम साधणे.
–कीडिओ चडवी–काम करण्याचा कंटाळा असणे.
–पडवुं–(१) पाया पडणे (२) शरण जाणे.
–लागवुं–(१) पायावर डोके ठेवून नमस्कार करणे (२) माफी मागणे.
–लाग्या !–हरले ! थकले ! कंटाळले !
पगथार (પગથાર) (पु.)–जिन्याच्या पायऱ्यानंतर येणारा रमणा.
पगर (પગર) (पु.)–(१) ढीग, रास. (२) खळ्याकरिता केलेली कणसांची रास किंवा राशीवर बैल फिरविणे.
पगरखुं (પગરખું) (न.)–जोडा.
(-ना) पगरखामां पग मुकवो–ची बरताण करणे,–ची बरोबरी करणे.
पगरण (પગરણ) (न.)–(१) सुमूहूर्त (२) आरंभ.
–(नुं) पगरण करवुं,–मांडवुं–ची सुरुवात करणे.
पगरणियुं (પગરણિયું) (वि)–आरंभाच्या वेळचे.
पगरव–वो (પગરવ-વો) (पु.)–(१) चालण्याचा आवाज, चाहूल (२) (लाक्ष) वरचेवर येणे-जाणे.
पगरवट (પગરવટ) (स्त्री.)–पायवाट.
–टो (पु.) ये-जा.
पगलां (પગલાં) (न. ब. व.)–देव संत इ. च्या पाउलांचा पूजेकरितां ठेवलेला ठसा.
पगली (પગલી) (स्त्री.)–(१) पाउलांची पंक्ती (२) लहान पाउले.
–मांडवी–(लहान मुलाने) हळूहळू चालायला शिकणे.
पगलुं (પગલું) (न.)–(१) पायाच्या तळव्याचा छाप–आकृती (२) पाऊल (३) (लाक्ष.) उपाय.
–काढवुं–पायांच्या ठशांवरून चोराचा वगैरे माग काढणे.
–भरवुं–(१) इलाज–उपाय करणे (२) कायदेशीर फिर्याद करणे (३) एखाद्या कामात पुढे सरणे.
पगलां ओळखवां–(१) पायांची परीक्षा असणे, पाउलांवरून स्वभावाची वगैरे कल्पना करणे. (२) पाठीमागच्या गुप्त हेतूची माहिती–भान असणे.
–करवां,–थवां–देणे करणे, पायधूळ झाडणे (लाक्ष.)

**पगले पगले**–पाउलावर पाउल टाकून, बरोबर अनुकरण–अनुसरण करून.
**पगवाट** (પગવાટ) (स्त्री.)–(१) पायवाट (२) खुश्कीचा मार्ग.
**पगी** (પગી) (पु.)–(१) पायांच्या ठशांवरून चोरांचा माग काढणारा (२) पहारेकरी.
**पगेरुं** (પગેરું) (न.)–चोराचे पाऊल
–**काढवुं**–पहा 'पगलुं काढवुं'
**पंकावुं** (પંકાવું) (अ. क्रि.)–प्रख्यात होणे, वाखाणले जाणे.
**पंखवा** (પંખવા) (पु.)–पक्षघात, लकवा.
**पंखी–खेरुं** (પંખી,-ખેરું) (न.)–पक्षी, पाखरू.
**पंखो करवो**–पंख्याने वारा घालणे.
–**खावो**–पंख्याने वारा घेणे.
–**नाखवो**–पंख्याने वारा देणे.
**पचक** (પચક) (अ.)–(१) 'पचक' असा आवाज करून (थुंकणे) (२) अवचित.
–**डी** (स्त्री.)–पिचकारी.
**पचकण** (પચકણ) (वि.)–डरपोक.
**पचरकवुं** (પચરકવું) (अ. क्रि.)–धार सुटणे.
**पचरकी** (પચરકી) (स्त्री.)–पाण्याची धार.
–**वागवी**–पाण्याची धार सुटणे.
**पचरंग, -जियुं, -गी** (પચરંગ) (वि.)–(१) पंचरंगी (२) विविध वर्णांचे किंवा जातींचे.
**पचववुं** (પચવવું) (सं. क्रि.)–पचविणे.
**पचवुं** (પચવું) (अ. क्रि.)–(१) पचणे, जिरणे. (२) आत सामावणे. (३) रुतणे (४) (लाक्ष.) हरामाचे (पचनी पाडलेले) मिळणे (५) निश्चितपणे भोगण्यासाठी हाती येणे.
**पचारवुं** (પચારવું) (स. क्रि.)–वारंवार सांगणे, टोकणे (२) टोमणा मारून सांगणे.
**पचाववुं** (પચાવવું) (स. क्रि.)–(१) पचविणे (२) (लाक्ष.) बरोबर ग्रहण करून आत्मसात् करणे. (३) हरामाचे-अयोग्य रीतीने-मिळविणे.
**पचावी पाडवुं**–स्वतःच्या कमाईचे नव्हे तर हरामाचे घेऊन दाबून बसणे.
**पचीसी उडाववी**–फजीती करणे, हुर्रे उडविणे.
**पच्छम** (પચ્છમ) (वि.)–मागाहूनचे.
–**बुधियुं** (वि.)–पश्चात्‌बुद्धी.
**पछडावुं** (પછડાવું) (अ. क्रि.)–आपटणे, आपटले जाणे.
**पछताल(-ळ)** (પછતાલ-ળ) (स्त्री.)–अपशब्दांचा भडिमार.
**पछवाडी** (પછવાડી) (अ.)–पाठीमागे.
–**डुं**–(१) (वि.)–शेवटचे (२) (न.) पाठीमागचा भाग, पाठ (३) कड.
–**डे** (अ.)–(१) पाठीमागे, पाठीशी. (२) शेवटी.
–(**नी**) **पछवाडे पडवुं, -मंडवुं, -लागवुं**–(१)-च्या मागे लागणे, -चा धोशा घेणे (२) चिडविणे, सतावणे.
**पछाट(ड)** (પછાટ-ડ) (स्त्री.)–आपटणे.
–**खावी**–एकदम खाली आपटणे.
**पछाडवुं** (પછાડવું) (स. क्रि.)–(१) जोराने खाली फेकणे-आपटणे (जशी कुस्तीत).
**पछाडी** (પછાડી) (स्त्री.)–घोड्याचे मागचे पाय बांधण्याची दोरी.
**पछाडा खावा, -मारवा**–उंचावरून खाली खाली आपटत आपटत येऊन पडणे (२) उगीच तडफड करणे.
**पछात** (પછાત) (वि.)–(१) मागाहूनचे (२) मागे राहिलेले (३) (अ.) मागाहून.
–**वर्ग** (पु.)–मागस वर्ग.
**पछी** (પછી) (अ.)–नंतर, मागाहून.
**पछीत** (પછીત) (स्त्री.)–घराची मागील भिंत.
–**तियुं** (न.)–पिंजरागाडीची मागची फळी.
**पछेडी** (પછેડી) (स्त्री.)–पांघरण्याची जाडी चादर.
**पजवणी(-णुं)** (પજવણી) (न.)–त्रास, पीडा.
**पजववुं** (પજવવું) (स. क्रि.)–त्रास देणे, पीडा देणे, सतावणे.
**पजळवुं** (પજળવું) (अ. क्रि.)–ओले चिंब होणे.
**पजावो** (પજાવો) (पु.)–कुंभाराचा आवा.
**पजुसण** (પજુસણ) (न.)–पर्युषण, भगवान् महावीर जयंतीच्या वेळचे जैनांचे पर्व.
**पंच** (પંચ) (न.)–न्याय करण्याकरिता नेमलेले पंच.
–**भरावुं, -मळवुं, -बेसवुं**–पंचसभा भरणे, पंचायत भरणे.
–**बोलाववुं, -भरवुं, -मेळववुं**–पंचांची सभा बोलावणे
–**ईंटाळीं** (स्त्री.)–विटांचा मार देण्याची जाहीर शिक्षा.
–**क(-डुं)** (न.)–पंचकडी
–**कणकी** (स्त्री.)–वेगवेगळ्या धान्यांचे मिश्रण, अठरा धान्यांचे कडबोळे.
–**क्यास** (पु.)–(१) पंचांनी प्रत्यक्ष पाहून-तपासून नोंदलेला आपला कयास (२) तसा करावयाचा जाहीर तपास.
–**नामुं**–(न.)–पंचनामा
–**भाग** (पु.)–स्वैपाकाकरिता काढलेल्या सामानातून ब्राह्मणाला देण्याकरिता काढलेला (पीठ, तांदूळ, डाळ, तूप आणि मीठ यांचा) भाग.
–**म** (वि.)–जंगली, अस्पृश्य
–**मासी** (स्त्री.)–पहिलटकरणीला पाचव्या महिन्यात करण्यात येणारा संस्कार.
–**राउ** (वि.)–(१) किरकोळ (विक्री) (२) चारपाच जातींच्या मिश्रणाचे.

–वायका (स्त्री.)–अफवा, लोकांच्या तोंडी पसरलेली गोष्ट.
पंचात (પંચાત) (स्त्री.)–(१) तक्रारीचा निकाल करण्याकरिता नेमलेले पंच (२) पंचांचा तपास (३) पंचांनी दिलेला निर्णय. (४) (लाक्ष.) पंचाईत, भानगड (५) गुंतागुंत, अडचण.
पंचातियो (પંચાતિયો) (पु.)–पंचायत करणाऱ्यांतील एक पंच.
पंचाळ (પંચાળ) (पु.)–लोहार.
पंचियुं (પંચિયું) (न.)–पंचा.
पंची (પંચી) (स्त्री.)–(१) पची (२) (नं.) नथ.
पंजरीपाक (પંજરીપાક) (पु.)–(लाक्ष.) मार.
पंजेटवुं (પંજેટવું) (स. क्रि.)–पाच दाते असलेल्या दाताळाने ओढून एकत्र करणे.
पंजेळो (પંજેળો) (पु.)–फजीती.
पंजो (પંજો) (पु.)–(१) पंजा (२) पत्त्यांतील पंचा.
–खेंची काढवो,–चोंटी देवो–थप्पड मारणे.
–देखाडवो,–बतावबो–थप्पड मारतोसे दाखविणे.
पंजामां लेवुं–पकडीत धरणे.
पंझेटवुं (પંઝેટવું) (स. क्रि.)–सहन करून घेणे, निभावून घेणे.
पट (પટ) (न.)–(१) वस्त्र (२) चौकटी पाडलेला (सोंगट्यांचा वगैरे) कपड्याचा पट (३) पडदा (४) नदीचे पात्र (रुंदी) (५) विस्तार (६) लांब पट्टा (जमिनीचा) (७) फलक.
–खेंचवो,–ताणवो,–भरवो–मध्ये पडदा टाकणे.
पट–(पु.) (१) पुट (२) (संगतीचा) संस्कार, परिणाम (३) (अ.) पटकन.
–आपवो,–देवो–पुट देणे.
–बेसवो,–लागवो–रंग लागणें, संस्कार होणे.
पटकवुं (પટકવું) (स. क्रि.)–आपटणे.
पटक (स्त्री.)–फेकून आपटण्याची क्रिया.
पटकाववुं (પટકાવવું) (स. क्रि.)–(१) झोकात अंगावर घेणे–घालणे–नेसणे (२) आपटायला लावणे.
पटकूळ (પટકૂળ) (न.)–रेशमी–उंची–वस्त्र.
पटको (પટકો) (पु.)–(१) कपड्याचा लहान तुकडा. (२) टॉवेल, रुमाल.
पटपट (પટપટ)–(१) (अ.) जलद, झटपट (२) (स्त्री.) वटवट.
–वुं (स. क्रि.)–(१)जलदी करणे (२) वटवट करणे.
–टाववुं (स. क्रि.)–वेगाने हलविणे (शेपूट).
–टियुं (वि.)–(१) वटवटे (२) (न.) लाकडाचे एक खेळणे (३) हजामाची वस्तऱ्याला धार लावण्याची कातड्याची पट्टी–तुकडा.
पटलाई (પટલાઈ) (स्त्री.)–पाटिलकी.
–लाणी (स्त्री.)–पाटलीण.
पटवारी (પટવારી) (पु.)–तलाठी.
पटवो (પટવો) (पु.)–पटवेकरी.
पटह (પટહ) [सं.] (पु.)–पडघम.
पटंतर (પટંતર) (न.)–रो (पु.)–(१) अंतरपाट (२) विभक्तपणा.
पटा (પટા) (पु. ब. व.)–(१) पट्टा (२) पट्ट्याचे डाव–हात.
पटाउ (પટાઉ) (वि.)–फुसलावले–फसविले–जाण्याजोगे.
पटाक (પટાક) (अ.)–(१) फट्‌करून (२) लगेच.
–दईने,–लईने–एकदम, लगेच.
–डी (स्त्री.)–(१) चुटकी (२) पिस्तूल.
–को (पु.)–फटाका.
पटादार (પટાદાર) (मि.)–(१) पट्ट्यापट्ट्याचे. (२) (पु.) पट्ट्याने-अमुक वर्षांच्या कबुलातीने जमीन घेणारे कूळ. (३) जमीनदार. (४) पट्टेवाला.
पटा(-टो)पट (પટા-ટો-પટ) (अ.)–पटापट, एकामागून एक, जलद.
पटापटी (પટાપટી) (स्त्री.)–(१) बोलाचाली. (२) आडव्या-तिडव्या रेघा.
पटामणी (પટામણી) (स्त्री.)–फुसलावणी.
–णुं (वि.)–(१) फुसलावणारे. (२) (न.) फुसलावणी.
पटारी (પટારી) (स्त्री.)–पेटी.
–रो (पु.)–पेटारा.
पटाववुं (પટાવવું) (स. क्रि.)–(१) फुसलावणें. (२) युक्तीप्रयुक्तीने मन वळविणे–समजावणें.
पटावाळो (પટાવાળો) (पु.)–पट्टेवाला, चपरासी.
पटी(-ट्टी) पडवी–काम साधणे, जमणे, खूप फायदा होणे.
–पाडवी–(१) समजावून सांगून फायद्याच्या कामात घालणे (२) फायदा मिळविण्याचे साधणे.
–लगाड(-ब)वी–(१) खुशामत करणे. (२) लग्गा साधणे. संधी साधणे.
पटो-ट्टो (પટો-ટ્ટો) (पु.)–(१) पट्टा, सनद. (२) कापडाची किंवा चामड्याची लांब पट्टी. (३) कमर पट्टा. (४) रंगाचा लांबरुंद पट्टा. (५) चपराशाचा पट्टा.
–करी आपवो–करारपत्र करून देणे.
पटे लेवुं–कबुलात करून देऊन घेणे.
पट्ट (પટ્ટ) [सं.] (न.)–सिंहासन. (२) (वि.) मुख्य.
पट्टण (પટ્ટણ) (न.)–शहर.
पठाण (પઠાણ) (पु.)–(१) गलबताची पाठ. (२) वाकलेल्या तुळईला आधार देणारा ठेपा. (३) खलाशांचा नायक.
पठ्ठुं (પઠ્ઠું) (वि.)–(१) आपल्याच मस्तीत दंग असलेला. (२) पठ्ठा, पहेलवान.
पड (પડ) (न.)–(१) थर. (२) झाकण. (३) घडी.

पडउत्तर (પડઉત્તર) (न.) – प्रत्युत्तर.

पडकार (પડકાર) (पु.) – (१) ओरडून नावाने बोलावणे. (२) आव्हान.

–वुं (स. क्रि.) – ओरडून नावाने हाक मारणे, पुढे यायला सांगणे, उत्तेजित करणे, चिथावणे.

पडखुं (પડખું) (न.) – (१) कूस. (२) पक्ष. (३) मदत.

–खां ऊचकवां – निंदा करणे.

–खां जोवां – परीक्षा करणे, तपासणे.

–खां सेववां – आश्रयाला किंवा ताबेदारीत राहणे.

–खे रहेवुं – बाजूला – मदतीला राहणे.

–खियुं (वि. न.) – बाजूला – संगती राहणारा, सोबती.

पडगी-घी (પડગી-ઘી) (स्त्री.) – (१) भांड्याची बैठक (२) रोपाच्या किंवा झाडाच्या मुळाच्या भोवती केलेले आळे.

पडघो (પડઘો) (पु.) – प्रतिघोष, उलट आवाज.

–पडवो – (१) प्रतिध्वनी उठणे. (२) उलट उत्तर मिळणे.

–पाडवो – डंका वाजविणे, नाव गाजविणे.

–पडछंद(-दो) (पु.) – उलट आवाज, प्रतिध्वनी.

पडछो (પડછો) (पु.) – (१) पडछाया (२) तुलना.

–न लेवो – सावलीसुद्धा पडून न घेणे.

पडछे मूकवुं – नाखवुं, – तुलना करणे.

पडण (પડણ) (न.) – नमस्कार.

पडतर (પડતર) (वि.) – (१) मूळ किंमतीचे, नफा न चढविलेले. (२) पडिक. (३) न विकता राहिलेला. (४) मोकळे, इमारत नसलेले.

पडताळवुं (પડતાળવું) (स. क्रि.) – (१) पडताळणे (२) आपटणे. (३) खोदून खालवर करणे.

पडताळी (પડતાળી) (स्त्री.) – पत्रावळ.

पडताळो (પડતાળો) (पु.) – एकसारखी मागणी.

पडती (स्त्री.) – पतन, अवदशा

पडतुं (પડતું) (वि.) – (१) पडणारे (२) पडता-ती-ते (३) (न.) पाण्यात उडी.

–तो बोल झीलवो – पडता शब्द झेलणे.

–मूकवुं – उडी टाकणे (पाण्यात).

–नाखवुं – जोरात पडणे.

–तो (पु.) – (पाण्यात) उडी.

पड(-र)थार (પડ-ર-થાર) (पु.) – (१) रमणा (२) रुंद ओटा (३) चुनेगची जमीन.

पड(-र)दो (પડ-ર-દો) (पु.) – (१) पडदा (२) अंतरपाट (३) घुंघट (४) गुप्त गोष्ट.

–काढवो – घुंघट घेण्याचा रिवाज काढून टाकणे.

–उघाडवो, –खोलवो – पडदा दूर करून मन उघडे करणे.

–राखवो – (१) पडदा-बुरखा-घुंघट घेण्याचा रिवाज ठेवणे. (२) मन उघडे न करणे.

–फूटी जवो – रहस्य फुटणे.

–देनशीन, –देपोश (वि.) – पडद्यात राहाणारे.

पडधारा (પડધારા) (स्त्री.) – डोंगराची बाजू.

पडपुं (પડપું) (न.) – अतिशय शुष्क पदार्थ.

पडपूछ (પડપૂછ) (स्त्री.) – पूसतपास.

पडभीतियुं (પડભીતિયું) (न.) – भिंतीच्या आंत असलेलें गुप्त दालन.

पडवा(-वै)यो (પડવા-વૈ-યો) (पु.) – खुर्ची-टेबल इ. च्या पायाखाली घालण्याचा लाकडाचा तुकडा.

पडवुं (પડવું) (अ. क्रि.) – (१) पडणे. (२) जाणे, पळणे. (उदा. – 'आगळ पडवुं' 'रस्ते पडवुं') (३) पतन होणे, भ्रष्ट होणे. (४) हार होणे, युद्धात मरणे. (५) गैरहजेरी पडणे. (उदा. 'निशाळ पडवी', 'दिवस पडवो') (६) दुसऱ्या क्रियापदाच्या कृदंताशीं जोडल्याने 'लाचारी'चा किंवा 'सक्ती'चा भावदर्शविते (उदा. 'જવું પડશે' = जावे लागेल)

पड्या उपर पाटुं – मेलेल्याला मार.

पडी भागवुं – न चालणे, बंद पडणे (धंदा इ.).

–मूकवुं – सोडून देणे.

–रहेवुं – (१) पडून राहणे, झोपून राहणे (२) उपयोगात न येता पडून राहणे.

पडवो (પડવો) (पु.) – पाडवा.

पड-(र)साळ (પડ-ર-સાળ) (स्त्री.) – सोपा, ओसरी

पड(-र)सूदी (પડ-ર-સૂદી) (स्त्री.) – मैदा, गव्हाचे पांढरे पीठ.

पडळ (પડળ) (न.) – डोळ्यांवर येणारा पडदा, पटल.

–आववां, –फरी वळवां – डोळ्यावर पटल येणे, (२) बरोबर न दिसणे, न समजणे.

–उतराववां, –कढाववां – (१) डोळ्यावरचे पटल दूर करणे (२) भानावर आणणे, समजावून देणे.

पडाउ (પડાઉ) (वि.) – (१) काढून हिसकावून-घेतलेले (२) विक्री न होता पडून राहिलेले. (३) (न.) लहान होडी.

पडाक दईने – एकदम, पटकन.

पडा(-डी)दार (પડા-ડી-દાર) (पु.) – दवंडी देणारा, तराळ.

पडापड, -डी (પડાપડ-ડી) (स्त्री.) – उड्या पडण्याची क्रिया.

पडारो (પડારો) (पु.) – बढाई, शेखी.

पडाववुं (પડાવવું) (स. क्रि.) – (१) पडेल असें करणें, पाडायाला लावणे (२) हिसकावून घेणे (३) मर्जीविरुद्ध काढून घेणे - मिळविणे.

पडाळ (પડાળ) (स.) – छपराचे एक पाखे.
पडाळी (પડાળી) (स्त्री.) – मागे एकच भिंत असणारी ओसरी.
पडियुं (પડિયું) (न.) – जात्याचे पेड.
पडियो (પડિયો) (पु.) – द्रोण.
पडी (પડી) (स्त्री.) – (१) लहान पुडी (२) ढोल.
पडीकी (પડીકી) (स्त्री.) – (१) लहान पुडी (२) औषधाची पुडी.
– लखी आपवी, - लखाववी – औषध लिहून देणे.
– कुं (न.) – (१) पुडी, पुडा (२) औषधपुडी.
पडीपथारी (પડીપથારી) (स्त्री.) – मुक्काम.
पडो (પડો) (पु.) – (१) मोठा पुडा, मोठी जुडी. (२) ढोल (३) टिमकी.
– वग (-ज) डाववो – ढोल पिटून जाहीर करणें, दवंडी देणे.
पडोश (પડોશ) (पु.) – शेजार.
– ण (स्त्री.) – शेजारीण.
– शी (पु.) – शेजारी.
पड्युं पाथर्युं (वि.) – (१) मुक्काम टाकून पडलेले, (२) निश्चिंत असलेले.
पढवुं (स. क्रि.) – शिकणे, वाचणे.
पण(-न)घट (પણ-ન-ઘટ) (पु.) – (१) तलाव, (२) पाण्याचा घाट
पणछ (પણછ) (स्त्री.) – धनुष्याची दोरी.
पणी (પણી) (स्त्री.) – भाजीची जुडी.
पणे (પણે) (अ.) – त्या ठिकाणी.
पणो (પણો) (पु.) – रेतीने व धुळीने भरलेली जमीन.
पंड (પંડ) (पु.) – (१) पिंड, शरीर (२) स्वतः (३) पंडुरोग.
– डे (अ.) – जातीने, स्वतः
– डा [सं.] (स्त्री.) – (१) विद्या, ज्ञान (२) सुज्ञपणा, बुद्धी.
पंडाणी (પંડાણી) (स्त्री.) – भटीण, उपाध्यायीण.
पंडिताणी (પંડિતાણી) (स्त्री.) – पंडिता स्त्री, पंडिताची स्त्री.
पंडो (પંડો) (पु.) – क्षेत्रांतला पंडा, भटजी, उपाध्याय.
पंडोपंड (પંડોપંડ) (अ.) – स्वतःच, जातीनेच.
पंडोळुं (પંડોળું) (न.) – पडवळ,
पंड्यो (પંડ્યો) (पु.) – (१) पंतोजी (२) भटजी, उपाध्याय.
पंड्या (પંડ્યા) (पु.) – उपाध्याय.
पत करवुं – (१) मान राखणे (२) हुकूम मानणे, ऐकणे.
पत (પત) (स्त्री. न.) – (१) रक्तपित्त (२) साख, पत, विश्वास.
– करवी – विश्वास बाळगणे.
– खोवी, - जवी – साख किंवा पत गमावणे - जाणे.
– राखवी – अब्रू किंवा पत संभाळून असणे.
पतकाळुं (પતકાળું) (नि.) – कोहाळा.
पतजडी (પતજડી) (स्त्री) – शिशिरऋतु, हिंवाळा.
पत(-त्त)र वेलियुं (પત-ત્ત-ર વેલિયું) (न.) – (१) अळूचे पान (२) त्या पानाची भजी.
पतराज (-जी) (પતરાજ-જી) (स्त्री.) – पत्रास, बढाई.
पतराळी (પતરાળી) (स्त्री.) – (१) जेवणाचे पान. (२) पानांची रांग.
– मांडवी – (१) जेवणाचे पान मांडणे. (२) वाढण्याकरिता पान ठेवणे. (३) जेवणाकरिता पंगत बसविणे.
– मंगाववी – देवळातील प्रसादातून किंमत देऊन पान मागविणे.
– ळुं (न.) – पत्रावळ.
पतरी (પતરી) (स्त्री.) – पत्र्याचा लहान तुकडा.
पतरुं (પતરું) (न.) (१) पत्रा. (२) मोठी परात.
पत(-ता)ववुं (પત-તા-વવું) (स. क्रि.) – भागविणे, भागवून टाकणे, पुरे करून टाकणे, निकाल लावणे.
पतवुं (પતવું) (अ. क्रि.) – (१) पुरे होणे, शेवट होणे. (२) भागणे, निकाल होणे- (३) चुकते करणे.
पती जवुं – (१) मरून जाणे. (२) बरोबर तोड लागणे, चुकते होणे.
पतावट (પતાવટ) (स्त्री.) – तोड, भागवणूक.
पतळवुं (अ. क्रि.) – (१) पाघळणे. (२) रागावणे.
पतंग (પતંગ) (पु.) – (१) पतंग, एक फुलपाखरू. (२) पतंग (उडविण्याचा) (३) गुलाल ज्यातून बनतो असे लाकूड.
– उठाडवो, – चडाववो, – चगाववो – पतंग उडविणे.
– उतारवो – पतंग खाली उतरविणे.
– कटावो – कट्टा कट्टी होणे.
– छलकी जवो – पतंगाची कमान निसटणे.
– लोटवो – पतंग गोते खात खाली येणे.
– गियुं (न.) – एक फुलपाखरू किंवा उडते जीवाणु.
पतंगियानी माफक – ज्योतीवर झेप घेण्यासारखे अविचारीपणाने
पताकडुं (પતાકડું) (न.) – कागदाचा लहान तुकडा.
पतासुं (પતાસું) (न.) – बत्तासा.
– पाडवुं – बत्तासा बनविणे.
पतियाण (પતિયાણ), पतियार (પતિયાર), पतीज (પતીજ) (स्त्री.) – (१) अब्रू. (२) विश्वास, साख.
– करवी – विश्वास ठेवणे.
– खोवी, गुमाववी – विश्वास गमावणे.
– जवी – अब्रू जाणे.
– पडवी – साख पटणे.
पतीजवुं (પતીજવું) (अ. क्रि.) – विश्वास पटणे.
पतीरुं (પતીરું) – पांढऱ्या बकरीचे पिल्लू.

पतेती (પતેતી) (स्त्री.)–पारशी लोकांचा पाडवा.
पतेली (પતેલી) (स्त्री.)–पातेले.
–लुं (न.)–मोठे पातेले.
पत्तर (પત્તર) (न.)–(१) जेवणाचे पान. (२) भिक्षापात्र. (३) (स्त्री.) अब्रू.
–पूरवुं–पान वाढून तयार करणे (देण्याकरिता).
–उखाडवी, –ओखणवी, –खांडवी –फाडवी, –रगडवी–(१) अब्रू बिघडविणे. (२) सतावणे, छळणे.
पत्ति (પત્તિ) [सं.] (पु.)–पदाति, पायदळांतला सैनिक.
पत्तुं (પત્તું) (स.)–(१) पान (झाडाचे, पत्त्यांतले, कागदाचे) (२) पोस्टकार्ड.
पत्तो (પત્તો) (पु.)–(१) पत्ता, ठावठिकाणा. (२) बातमी, समाचार, शोध.
–खावो, –लागवो–(१) शोध–बातमी–, लागणे. (२) संधी मिळणे.
पथरणुं (પથરણું) (न.)–(१) सतरंजी, बिछायत. (२) मृत्यूबद्दल शोक करण्याकरिता आलेल्यांना बसण्याकरिता दिलेले जाजम (एक रिवाज).
–णे जवुं–शोक करायला जाणे.
पथराण (પથરાણ) (स्त्री.)–(१) माती वगैरे पसरून केलेली उंच जमीन. (२) पसरून मांडलेल्या वस्तू.
–ट (पु.)–पसरून केलेली मांडणी किंवा विस्तार, पसारा.
पथराळ(-ळुं) (પથરાળ-ળું) (वि.)–दगडांनी किंवा खड्यांनी भरलेले.
पथरी (પથરી) (स्त्री.)–(१) खडा (२) धार लावण्याचा दगडाचा तुकडा (३) मूतखडा.
–पर चडाववुं–हत्याराला वगैरे धार लावणे.
पथरो (પથરો) (पु.)–(१) दगड (२) फत्तर, (लाक्ष.) भावनाशून्य माणूस (३) विघ्न, आडखीळ.
–नाखवो, –मारवो–विघ्न–हरकत उभी करणे.
–पडवो–विघ्न–हरकत येणे. भुडे सरकवूण घेणे.
–पाकवो–पोटी कुसंतान जन्माला येणे.
–ने पहाणो–(बोलण्यातला शब्दप्रयोग) अमुक नि तमुक.
पथार, –रो (પથાર,-રો) (पु.)–(१) पसारा (२) मोठीं बिछाना.
पथारी (પથારી) (स्त्री.)–(१) बिछाना (२) (लाक्ष) मुक्काम. (३) आजार.
–ए जवुं–जेथे कोणी मेले आहे त्या घरात सोबतीला दहा दिवस भुईवर झोपण्यासाठी जाणे (एक रिवाज).
–ए पडवुं–आजारी पडणे.
–ए पडीने खावुं–वाईट कर्माचे वाइट फळ भोगणे.
–ए लेवुं–घोंगड्यावर काढणे (लाक्ष), मरताना खाली घोंगडीवर घेणे.
–करवी–(१) बिछाना करणे (२) मुक्काम करणे, (३) आजारी पडणे.
–वश (वि.) आजारी.
पथ्थर (પથ્થર) (पु.)–(१) फत्तर, पाषाण, खडक (२) मैलाचा किंवा हद्दीचा दगड.
–उपरनी जड–क्षणभंगुर.
–उपर पाणी–पालथ्या घड्यावर पाणी.
–एटला देव करवा–(१) पुष्कळ देवांची पूजा करणे (२) संतानप्राप्तीकरता वगैरे देवदेवतार्चन करणे.
–तरवो–अशक्य ते घडणे.
–नी छातीं–(१) भावनाशून्य अंतःकरण (२) दगडासारखे मजबूत हृदय.
–पाटी (स्त्री.)–स्लेटपाटी.
–पेन (स्त्री.)–त्या पाटीवर लिहिण्याची पेन्सिल.
–फोडो (पु.)–दगडफोड्या.
–रियुं (नं.)–(१) दगडाचे बनलेले (२) त्यासारखे कठीण (३) दगडी.
पद्टिप्पण (न.)–णी (स्त्री.) (પદટિપ્પણ,-ણી)–तळटीप, 'फूटनोट'.
पदरे पडवुं–शरण–आसऱ्याला येणे–जाणे.
–बांधवुं–गाठी बांधणे.
पदरनुं–स्वतःचे, पदरचे.
पदरखानुं (પદરખાનું)–भटारखाना, सार्वजनिक स्वैपाकघर.
पदारथ–(પદારથ) (पु.)–पदार्थ.
पदे(-दो) डवुं (પદે-દો-ડવું) (स. क्रि.)–(१) तांगडणे, पळापळ करायला लावणे (२) ताबलणे.
पधरामणी (પધરામણી) (स्त्री.)–(१) येणे (मानवाचक शब्द) (२) माननीय अतिथीला देण्यात येणारी भेट किंवा दक्षिणा.
पधरावचुं (પધરાવવું) (सं. क्रि.)–(१) मानाने घेऊन येणे किंवा पोचविणे (२) आपल्याला नको असलेली वस्तू दुसऱ्याच्या गळ्यात बांधणे.
पधारवुं (પધારવું) (अ. क्रि.)–(मानार्थी शब्द) येणे किंवा जाणे.
पनाई (પનાઈ) (स्त्री.) होडी.
पनारो (પનારો) (पु.)–नाइलाजाने–जबरदस्तीने पडलेली गाठ किंवा आलेला संबंध.
(कोईने) पनारे पडवुं–तशी गाठ पडणे, संबंध येणे.
पनाह (પનાહ) [फा.] (स्त्री.)–रक्षण.
–गाह (स्त्री.)–सुरक्षित मुक्काम.

पनियारी (પનિયારી), पनिहारी (પનિહારી) (स्त्री)–पाणी भरणारी बाई.
पनीर [फा.] (न)–दह्यातून पाणी काढून त्याचा बनविलेला खाद्य पदार्थ.
पनुं (પનું) (न.)–पन्हे.
पनो (પનો) (पु.)–पन्हा
पनादार (वि.)–मोठ्या पन्ह्याचे.
पनोती (પનોતી) (स्त्री.)–(१) शनीची दशा, पडती दशा. (२) भाग्यवती स्त्री, जिचे एकही मूल मेलेले नाही अशी स्त्री.
–ऊतरवी–ग्रहदशा संपणे.
–बेसवी–ग्रहदशा सुरू होणे.
–तुं (वि.)–(१) शुभ, मंगल. (२) भरभराटलेले, वंशविस्तार असलेले. (३) निरपत्य माणसाला फारा दिवसांनी झालेले (मूल).
पन्नुं (પન્નું) (न.)–एक जातीचा हिरा, पाचू.
पंतियाळुं (પંતિયાળું) (वि.)–(१) अनेकांशी भागीदारी असलेले. (२) (न.) भागीदारीचा व्यापार किंवा कारभार.
पंतूजी (પંતૂજી) (पु.)–(१) पंतोजी (२) (लाक्ष.) पढतमूर्ख मनुष्य.
पंथक (પંથક) (पु.)–पांथस्थ (२) जासूद (३) प्रदेश, देशाचा अमुक विभाग.
पंथवर (પંથવર) (पु.)–प्रथमवर.
पंथी (પંથી) (पु.)–(१) पांथस्थ (२) (वि.) पंथाचा–ची–चे.
पंदरा (પંદરા) (पु. ब. व.)–पंधराचा पाढा.
–रां (न. ब. व.)–(१) पंधरापंधेरांचा समूह. (२) पंधरवडा.
पपला(-ळा)मण (પપલા-ળા-મણ) (स्त्री.)–लाड लडिवाळ करण्याची क्रिया.
–वबुं (स. क्रि.)–लाड-लडिवाळ करणे.
पपेटी (પપેટી) (स्त्री.)–पहा 'पतेती'.
पपैयुं (પપૈયું) (न.)–पपया–ई.
–यो (पु.)–पपयाचे झाड.
पपैयो (पु.)–(१) भाजल्याने होणारा पाण्याने भरलेला फोड. (२) चातकपक्षी.
पमरवुं (પમરવું) (अ. क्रि.)–सुवास दरवळणे.
–राट (पु.)–घमघमाट.
पमाड(-व)वुं (પમાડ-વ-વું)–(१) ध्यायला लावणे, देणे. ('पामवुं'चे प्रयोजक) (२) कळेल–समजेल असे करणे.
पंपाळवुं (પંપાળવું) (स. क्रि.)–(१) लाडाने हात फिरविणे. (२) लाडावणे. (३) अतिशय काळजीपूर्वक जतन करीत राहणे.
पंपोयो (પંપોયો) (पु.)–विटेचा तुकडा.

पयगाम (પયગામ) (पु.)–(१) संदेश (२) ईश्वरी संदेश.
पयुं (પયું) (न.)–(विहिरीचा) वरवटा, बरोटा.
पर (પર) (अ.)–वर.
पर [फा.] (न.)–पीस.
परकम्मा (પરકમ્મા) (स्त्री.)–परिक्रमा, प्रदक्षिणा.
परकार (પરકાર) [फा.] (पु.)–कंपास.
परख (પરખ) (स्त्री.)–पारख.
–होवी–पारख करण्याची शक्ती असणे.
–ण (वि.)–पारखी.
–वुं (स. क्रि.)–(१) पारखणे. (२) ओळखून काढणे.
–खाववुं (स. क्रि.)–(१) पारखायला लावणे. (२) (लाक्ष.) देणे (३) सांभाळ घेण्याकरिता सोपविणे. (४) समजूत घालणे, समजूत पडेलसे करणे.
–खावुं (अ. क्रि.)–(१) ओळखले जाणे. (२) (लाक्ष.) योग्य वर म्हणून समजले जाणे.
–खियो (पु.)–पारखी.
परखाण (પરખાણ) (न.)–शीड बांधण्याची आडवी काठी.
परगजु (પરગજુ) (वि.)–परोपकारी.
परगणुं (પરગણું) (न.)–तालुका.
परगल (પરગલ) (वि.)–धैर्यवान्, खंबीर.
परचूट(-र)ण (પરચૂટ-ર-ણ) (वि.)–फुटकळ, सुटे, चिल्लर (२) (न.) चिल्लर, खुर्दा.
–णियुं (वि.)–(१) चिल्लर (२) (लाक्ष.) क्षुल्लक.
परचो (પરચો) (पु.)–प्रताप, चमत्कार.
–आपवो–चमत्कार करून आपले बळ दाखविणे.
परछंड (પરછંડ) (वि.)–भव्य, धष्टपुष्ट.
परज (પરજ) (पु.)–ढालीची मूठ.
परज (स्त्री.)–प्रजा, जमात, वर्ग.
परजळवुं (પરજળવું) (अ. क्रि.)–चेतणे, पेटणे, जळणे.
–जाळवुं (स. क्रि.)–पेटविणे, चेतविणे, जाळणे.
परठ (પરઠ), परठण (પરઠણ) (स्त्री.)–(१) कबुलात, करार. (२) वराला किंवा वधूला आहेर म्हणून ठरविलेली रक्कम.
–वुं (स. क्रि.)–(१) नक्की करणे, ठरविणे, करार करणे. (२) प्रस्थान करणे. (३) पकडणे. (४) जाणणे.
–ठो (पु.)–ठराव, कबुलात.
परड (પરડ) (स्त्री.)–(१) डोकेफोड, पंचाईत. (२) पीडा, उपाधी.
–मूकवी–डोकेफोड-पंचाईत-करण्याचे सोडून देणे.
परडो,-डियो (પરડો) (पु.)–बाभूळ शेंग.
–डी (स्त्री.)–कोवळी बाभूळ शेंग.
परण (પરણ) (न.)–लग्न.

–त (न.) – (१) लग्न (उदा. 'चोथुं परणत' = चौथे लग्न) (२) (वि.) – लग्न झालेले, परिणीत.
–वुं (स. क्रि.) – लग्न करणे. (२) (लाक्ष.) अभेद्य संबंध बांधणे.
–णाववुं (स. क्रि.) – (१) लग्न करून देणे (२) दुधात पाणी मिसळणे ('दूधमां पाणी परणाव्युं').
परा़णा(-णै)युं (પરણા-ણૈ-યું) – पणती, मातीचा पेला.
परणियत (પરણિયત) (वि.) – (१) विवाहित (२) (स्त्री.) पत्नी.
परणेत,(-र) (પરણેત,-ર) (न.) – (१) लग्न (२) (स्त्री.) पत्नी.
परण्यो (પરણ્યો) (पु.) – लग्न करणारा, वर.
परत (પરત) – (स्त्री.) भस्म, बारीक पूड. (२) (अ.) परत
परतवुं (પરતવું) (स. क्रि.) – घोटणे, वाटणे.
परती (પરતી) (स्त्री.) – (१) आसारी (२) पतंगाचा दोरा गुंडाळण्याची फिरकी.
परदादो (પરદાદો) (पु.) – पणजोबा.
परदेश खेडवो – कामधंद्यासाठी परदेशात जाण्याचे साहस करणे.
–सेववो – कष्ट सहन करीत परदेशात राहणे.
परधान (પરધાન) (न.) – विवाहापूर्वी वराला नारळ, कुंकुम-पत्रिका व पीतांबर देण्याचा विधी.
परनाळ (પરનાળ) (स्त्री.) – ळुं (न.) – (१) परनाळ (२) जात्याचा मधला खुंटा जिच्यात घालतात ती विळी.
परपारोंठ (પરપારેંઠ) (अ.) – गैरहजेरीत, दुसऱ्याच्या मार्फत.
परपोटो (પરપોટો) (पु.) – (१) बुडबुडा (२) (लाक्ष.) क्षणभंगुर जीवन.
–फूटवो – बुडबुडा फुटणे, ढोंग उघडकीला येणे.
–टियुं – वि. – क्षणभंगुर.
परब (પરબ) (स्त्री) – पाणपोयी.
–डी (स्त्री.) – पक्ष्याना दाणे टाकण्याकरिता एका खांबावर तयार केलेले सार्वजनिक घर.
–बियो (पु.) – पाणपोयीवर बसून पाणी देणारा.
परबा(-भा)रुं (પરબા-ભા-રું) (अ.) – लगेचच्या लगेच, न विचारता सवरता, परभारे.
परबीडियुं (પરબીડિયું) (न.) – पाकीट.
–डो (पु.) – मोठा लखोटा.
परभव [सं.] (पु.) – दुसरा जन्म.
–वुं (अ. क्रि.) – (१) विजयी होणे, सरशी होणे. (२) उत्पन्न होणे (३) (स. क्रि.), छळणे त्रास देणे. (४) हैराण करणे, दमविणे.
परभा (-वा) (પરભા-વા) (स्त्री.) – पर्वा, क्षिती.
परभातियुं (પરભાતિયું) (न.) – भूपाळी.
परभारुं (-युं) (પરભારું-યું) (वि.) – (१) बाहेरचे, त्रयस्थ

परम दहाडो (दिवस) (पु.) – परवाचा दिवस ('काल'च्या अलिकडचा किंवा 'उद्या'च्या पलिकडचा).
परमाण (પરમાણ) – (१) (वि.) प्रमाणासहित, पुराव्यासहित. (२) (अ.) निश्चितपणे, नक्की. (३) (न.) शीड बांधण्याची आडवी डोलकाठी.
परमाणुं (પરમાણું) (न.) – (१) परिमाण, माप. (२) प्रमाण
परमियो (પરમિયો) (पु.) – प्रमेह.
परली (પરલી) (स्त्री.) – पाल.
परव (પરવ) (न.) – पर्व, सण.
परवरवुं (પરવરવું) (अ. क्रि.) – जाणे.
परवरश(-शी) (પરવરશ-શી) (स्त्री.) – बरदास्त (२) पालन - पोषण.
परवरुं (પરવરું) (वि.) – वेष्टिलेले, वेढलेले.
परवल्ली (પરવલ્લી) (स्त्री.) – घोरपड.
परवश पडवुं – पराधीन होऊन राहणे.
परवाड (પરવાડ) (स्त्री.) – शिवाराचा भाग.
परवार (પરવાર) (पु., स्त्री.) – फुरसत, मोकळा वेळ.
–आववो – कामाचा शेवट होणे, मोकळीक मिळणे.
–वुं (अ. क्रि.) – काम आटोपून मोकळे होणें.
परवींटो (પરવીંટો) (पु.) – आसारी.
परसवुं (પરસવું) (स. क्रि.) – स्पर्श करणे, शिवणे.
परसंग (પરસંગ) (पु.) – (१) खाट (२) तीन मैल.
परसेववुं (પરસેવવું) (अ. क्रि.) – घामेजणे.
परसेवो (પરસેવો) (पु.) – घाम.
–उतारवो, - पाडवो – घाम काढणे.
–ऊतरवो, - पडवो – घाम फुटेल इतके मेहेनतीचे काम करणे.
परस्तार (પરસ્તાર) [फा.] (पु.) – (१) सेवक, गुलाम (२) परिचारक.
परस्ती (પરસ્તી) [फा.] (स्त्री.) – (१) पूजा, भक्ती. (२) प्रशंसा. (३) खुशामत.
परस्पर (પરસ્પર) [सं.] (अ.) – एकमेकांला,
परस्पर्शी (પરસ્પર્શી) [सं.] (वि.) – (१) दुसऱ्याला लागू पडणारे, परलक्षी. (२) दुसऱ्यावर परिणाम करणारे.
परह (પરહ) (स्त्री.) – प्रातःकाळी कुरणात चरणे.
परहरवुं (પરહરવું) (स. क्रि.) – टाकणे, सोडणे.
परहेज (પરહેજ) [फा.] (वि.) – (१) बंधनात पडलेले, कैद झालेले. (२) पथ्य पाळणारे. (३) दुष्कर्मापासून दूर राहणारे, संयमी. (४) (स्त्री.) पथ्य. (५) संयम.
–करवुं – कैद करणे.
–गार (वि.) – दुष्कर्मापासून दूर राहणारा-री-रे, संयमी.
–जी (स्त्री.) – (१) कैद. (२) पथ्य.

परंदुं (પરંદું)
परिंदुं (પરિંદું) } (न.) – पक्षी.
पराई (પરાઈ) (स्त्री.) – (१) पहार. (२) ऐदाण.
परागंदे (પરાગંદે) (वि.) – पळून गेलेले.
पराज (પરાજ) (स्त्री.) – परात.
पराणे (પરાણે) (अ.) – (१) जबरदस्तीने. (२) महामेहेनतीने, कसेबसे.
परात(-श) (स्त्री.) – ताकावरचे पाणी.
परापूर्व (પરાપૂર્વ) [सं.] (पु.) – फार जुना काळ.
परायुं (પરાયું) (वि.) – परके.
– ई (स्त्री.) – परकी (स्त्री.) (२) (वि. स्त्री.) दुसऱ्याची
परार (પરાર) (अ.) – गेलेले किंवा येणारे तिसरे वर्ष.
परास्त (પરાસ્ત) [सं.] (वि.) – पराभूत, हरलेले.
पराहत (પરાહત) [सं.] (वि.) – (१) आक्रांत, हल्ला चढलेले, (२) जखमी झालेले. (३) टाकलेले, तिरस्कृत.
पराळ (પરાળ) (न.) – पिंजर (भाताचे).
परांठुं (પરાંઠું) (न.) – तव्यावर तळून केली जाणारी एक प्रकारची जाड भाकरी.
परांत (પરાંત) (वि.) – शिल्लक राहिलेले, शेष.
परांतवुं (પરાંતવું) (अ. क्रि.) – काम संपविणे, काम संपवून मोकळे होणे.
परिखा (પરિખા) [सं.] (स्त्री.) – खंदक.
परिजन (પરિજન) (पु.) – नोकर.
परिणमवुं (પરિણમવું) (अ. क्रि.) – परिणाम निपजणे, परिणत होणे.
परिणाम (પરિણામ) (पु., न.) – अंत, शेवट, फळ.
– आणवुं, – लाववुं – फलित निष्पन्न करणे.
परिपत्र (પરિપત્ર) (न.) – फिरके, 'सर्क्युलर', फिरती नोटीस.
परिपंथी (પરિપંથી) [सं.] (पु.) – वाटमाऱ्या, लुटारू.
परिपाट (पु.) – टी (स्त्री.) (પરિપાટ,-ટી) – (१) प्रथा, रिवाज, नियम (२) शैली, रीत. (३) क्रम.
परिप्रश्न (પરિપ્રશ્ન) [सं.] (पु.) – पुनः पुनः प्रश्न करणे.
परियट (પરિયટ) (पु.) – परीट.
परियुं (न.), परियो (पु.) (પરિયું-યો) – (१) पूर्वज. (२) वंशज.
परिरंभ [सं.] (पु.), – ण (न.) (પરિરંભ) – आलिंगन.
परि(-री) वाद [सं.] (પરિ-રી-વાદ) (पु.) – नालस्ती.
– दी (वि.) – निंदक.
परिष्कार (પરિષ્કાર) [सं.] (पु.) – (१) साजशृंगार (२) संस्कार.
परु (પરુ) (न.) – पू.

परुं (પરું) (वि.) – (१) वेगळे, न्यारे (२) (अ.) दूर, अलग. (३) (न.) उपनगर.
परु(-रो)णो (પરુ-રો-ણો) (पु.) – अतिथी, पाहुणा.
– णागत – णाचाकरी (स्त्री.), – णाचार (पु.) – आतिथ्य, पाहुणचार.
– णी (स्त्री.) – पाहुणी.
परे (પરે) (अं.) – (१) प्रमाणे (२) प्रकारे (३) अमुक ठिकाणी (४) वर.
परे (स्त्री.) – प्रभात, उषःकालाचा प्रकाश, झुंझुरके.
– फाटवी, – फटवी – सकाळ होणे.
परेशान (પરેશાન) [फा.] (वि.) – (१) हैराण, त्रस्त. (२) व्याकुळ, उद्विग्न (३) धूर्त, लुच्चे, चतुर.
– नी (स्त्री.) – (१) अडचण, त्रास (२) उद्वेग.
परोग (પરોગ) (पु.) – शेवट, अंत.
परोढ (પરોઢ) (पु. न.) – सकाळ.
– ढियुं (न.) – पहाट.
परोणो (પરોણો) (पु.) – (१) पाहुणा (२) पराणी (टोच असलेली लांब काठी).
– णा जोगववा – पाहुण्याच्या जेवण्याखाण्याची व्यवस्था करणे.
– णी (स्त्री.) – (१) पाहुणी (२) सुईत ओवलेला दोरा.
परोत (પરોત) (पु.) – पुरोहित.
परोववुं (પરોવવું) (स. क्रि.) – (१) ओवणे (२) गोवणे.
पल (પલ) (न.) – चार तोळ्यांचे माप. (२) (स्त्री.) पळ, क्षणकाल.
पलक (પલક) [सं.] (स्त्री.) – (१) पळ, क्षण (२) [फा.] निमिष, पापणीची उघडझाक.
– दरियाव (पु.) – (१) थोडक्या वेळात पाणीच पाणी करून टाकणारा पाऊस. (२) परमेश्वर.
– वुं (अ. क्रि.) – (१) पापणीची उघड-झाक करणे (२) पापणीच्या उघडझापेइतकी गती असणे. (३) चमचमणे (४) चळणें, अस्थिर होणे.
पलको, – कारो (પલકો,-કારો) (पु.) – पापणीची उघड - झाक. (२) चमचम (३) इषारा.
पलटणियो (પલટણિયો) (पु.) – पलटणीतील शिपाई.
पलटवुं (પલટવું) (स. क्रि.) – बदलणे.
पलटापलटी (પલટાપલટી) (स्त्री.) – फेरफार, उलथापालथ.
पलटी (પલટી) (स्त्री.), – टो (पु.) – (१) बदल (२) कोलांटी, एकदम क्रांती (३) गाताना स्वर चढविणे, उतरविणे. (४) पट्ट्याच्या खेळांतला एक डाव.
– टो खावो, – मारवो – (१) बदलणे (२) कोलांटी घेणे.

**पलपलवुं** (પલપલવું) (अ. क्रि.) – चमचमणे, चकचकणे.
**पलवट** (પલવટ) (स्त्री.) – (१) कंबर बांधणे किंवा ती बांधण्याचा कपडा (२) पदर किंवा त्याचा लोंबणारा शेवट.
**पलवलिया** (પલવલિયાં) (न. ब. व.) – आसू.
**पलववुं** (પલવવું) (स. क्रि.) – रिझविणे, राजी करणे.
**पलवाड** (પલવાડ) (स्त्री.) – कुंपण.
**पलळवुं** (પલળવું) (अ. क्रि.) – (१) भिजणे (२) (लाक्ष.) मन विरघळणे – मऊ होणे.
**पलाकुं(-खुं)** (પલાકું-ખું) (न.) – पाढ्यातला प्रश्न.
 – **खी** (स्त्री.) – पाढ्याची ओळ.
**पलाण** (પલાણ) (न.) – (१) घोड्याच्या पाठीवर आवळण्याचे सामान (२) (घोड्यावर) स्वारी.
 – **करवुं** – स्वारी करणे.
 – **मांडवुं** – स्वारीचे सामान कसणे.
 – **वुं** (अ. क्रि.) – (१) स्वारी करणे (२) स्वारीचे सामान आवळणे.
**पलाळवुं** (પલાળવું) (स. क्रि.) – (१) भिजविणे (२) (लाक्ष.) मनावर परिणाम करणे (३) दाढी करण्याकरिता ती भिजविणे.
**पलाळियुं** (પલાળિયું) (न.) – आंघोळीकरिता भिजविण्याचा पंचा.
**पलांठी** (પલાંઠી) (स्त्री.) – मांडी (बसण्याची एक रीत).
 – **मारवी**, – **वाळवी**, – **वाळीने बेसवुं** – मांडी घालून बसणे, ऐसपेस बसणे.
 – **ठो** – मोठा मांडा (मांडीपेक्षा जास्त जागा व्यापून).
**पलांडु** (પલાંડુ) (स्त्री.) – कांदा.
**पलीत** (પલીત) (पु. न.) – भूतप्रेत.
**पलीतो चांपवो**, – **सूकवो**, – पलिता पेटविणे. (२) ठिणगी टाकणे, चिथावणे
**पलट्ट** (પલટ્ટ) (न.) – कच्चा कोवळा कांदा किंवा लसूण.
**पलेट** (પલેટ) (पु. स्त्री.) – कपड्याचा शिवताना मोड किंवा पट्टी घालणे.
**पलोट** (પલોટ) (स्त्री.) – अनुभव, शिक्षण, तालीम.
**पलो(-ळो)टवुं** (પલો-ળો-ટવું) (सं. क्रि.) – (१) कामात घालून वाकबगार करणे. (२) शिकवून स्वारीलायक करणे. (घोडे इ.) (३) दाबणे, चंपी करणे.
**पल्लुं** (પલ્લું) (न ) – (१) ताजव्याचे एक पारडे (२) वरातर्फे मुलीला देण्यांत येणारे स्त्रीधन.
**पल्लो** (પલ્લો) (पु.) – (१) पदर (२) आसरा (३) टप्पा, मजल.
**पवई** (પવઈ) }
**पवैयो** (પવૈયો) } (स्त्री.) – हिजडा, नपुंसक.

**पवन** (પવન) (पु.) – (१) वारा (२) (लाक्ष.) मिजास, दिमाख. (३) फॅशन.
 – **काढी नाखवो** – दिमाख उतरविणे.
 – **चालवो**,-**वावो** – फॅशन सुरू होणे.
 – **फूंकावो** – जोराने वारा वाहणे.
 – **भरावो** – (१) (शरिरात) वात होणे (२) (डोक्यात) वारे शिरणे.
**पवाडवुं** (પવાડવું) – (स. क्रि.) – पाजणे, प्यायला लावणे.
**पवाडी** (પવાડી) (स्त्री.) – सज्जावरील छोटी गच्ची.
**पवाडो** (પવાડો) (पु.) – (१) पोवाडा (२) निंदा, आक्षेप.
**पवा(-य)त** (પવા-ય-ત) – (१) पांजण (२) शेताला वगैरे पाणी देणे.
**पवाली** (પવાલી) (स्त्री.) – (१) लहान प्याला (२) उंच नळ्याच्या आकाराचे भांडे.
 – **लुं** (न.) – पेला.
**पवित्रां अगियारश(-स)** (પવિત્રાં અગિયારશ-સ) (स्त्री.) – श्रावण वद्य ११
 – **बारश(-स)** (स्त्री) – श्रावण शुद्ध १२
**पवित्रुं** (પવિત્રું) (न.) – (१) देवाला अर्पण केलेली रेशमाची माळ. (२) गळ्यात घालण्याचा मोत्यांचा सर.
**पशेमान** (પશેમાન) (फा.) (वि.) – पस्तावलेले, शरमलेले.
 – **नी** (स्त्री.) – खेद, पस्तावा.
**पस** (પસ) (स्त्री.) – ओंजळ.
**पसतागियो** (પસતાગિયો) (पु.) – काची, भाजीधंदा करणारा.
**पसली** (પસલી) (स्त्री.) (१) ओंजळ (१) आंगठी (३) आचमनाकरितां केलेला हाताचा खोलगट भाग. (४) भावाची बहिणीला भेट.
 – **लो** (पु.) – ओंजळ.
**पसवारवुं** (પસવારવું) (स. क्रि.) – लाड करणे.
**पसंद** (પસંદ) [फा.] (वि.) – (१) मनपसंत (२) निवडलेले, निवडून घेतलेले.
 – **आववुं**, – **पडवुं** – पसंतीला उतरणे, आवडणे.
 – **करवुं** – निवड करणे.
 – **गी** (स्त्री) – आवड-निवड.
**पसाय** (पु.) – (१) प्रसाद, कृपा (२) खुष होऊन दिलेले बक्षीस
**पसायतुं** (પસાયતું) (न.) – बक्षीस दिलेली जमीन.
**पसार** (પસાર) वि. – (१) ओलांडून गेलेले (२) (कसोटीत) उतरलेलें (३) (स्त्री.) शतपावली किंवा फेऱ्या.
**पसार** – **रो** (पु.) – (१) प्रसार, प्रचार (२) प्रवेश, शिरकाव.
 – **वुं** (स. क्रि.) – (१) पसरविणे (२) लांब करणे.
**पसूंदी** (પસૂંદી) (स्त्री.) – मैदा.

पस्तोपेश (પસ્તોપેશ) (पु.) (स्त्री.) – चिंता, विचार, मनाची व्यग्रता.
पस्तानुं (પસ્તાનું) (न.) – परगावी जायला निघणे, प्रस्थान. (२) मुहूर्त संभाळण्याकरितां आपल्या घराहून निघून दुसऱ्याच्या घरीं थांबणें.
पस्तावुं (પસ્તાવું) (अ. क्रि.) – पश्चात्ताप – पस्तावा करणे.
– वो (पु.) – पस्तावा.
पस्ताळ (પસ્તાળ)) (स्त्री.) – शब्दांचे एकामागून एक प्रहार.
– पडवी – टोमणे हाणणे.
पस्ती(પસ્તી) (स्त्री.) – (१) रद्दी कागद (२) बाजू, कैवार.
पस्तुं (પસ્તું) (न.) – (१) पिस्ता (२) कैवार, तरफदारी.
– ताणवुं – कैवार घेणे, तरफदारी करणे.
पहाण (-णो) (પહાણ-ણો) (पु.) – खडक, पाषाण, फत्तर.
पहाणवुं (પહાણવું) (स. क्रि.) – रंगविण्यापूर्वी धुणे (कोरा कपडा).
पहिरावबुं (પહિરાવવું) (स. क्रि.) – (भेटीचा - अहेराचा) पोषाख चढविणे.
पहेरछा (પહેરછા) (स्त्री.) – अंगावर घालण्याची रीत.
पहेरण (પહેરણ) (स.) – (१) कुडते, सदरा (२) पेहेरण्याची पद्धत.
– णुं – (न.) – (१) घाघराच्या ऐवजी कमरेला गुंडाळण्याचे वस्त्र (२) अंगावर घेण्याचे वस्त्र.
– वुं (स. क्रि.) – (१) अंगावर घेणें–धारण करणे. (२) पोटात घालणे ('अफीण पहेरवुं).
– वेश (पु.) – पोशाख (२) कपडे पेहेरण्याची रीत.
– रामणी (स्त्री.) – आहेर.
– रावबुं (स. क्रि.) – (१) पोशाक चढविणें - ल्यायला लावणें. (२) युक्ति प्रयुक्तीने दुसऱ्याच्या गळ्यात बांधणे (माल, वस्तू इ.), काही तरी करून फसविणे.
पहेरो (પહેરો) (पु.) – (१) पहारा, चौकी. (२) संभाळ, देखरेख.
– रामां राखवुं – पहाऱ्यात ठेवणे.
– भरवो – पहारा करणे.
– रेगीर (पु.) – पहारेकरी, संत्री.
पहेल (પહેલ) (पु.) – (१) फासा (खेळण्यातला) (२) पैलू.
पहेल (स्त्री.) – स्वतः आरंभ करून केलेले पुढारीपण.
– करवी – (१) पुढे होणे, पुढारीपण करणे, (२) मात करणे
– वहेलुं (वि.) – (१) पहिलेवहिले (२) (अ.) सर्वांत अगोदर.
– वाडो (पु.) – प्रारंभ.
– वाटकूं (वि.) – पहिल्या खेपेचे.
– वेतरी (वि. स्त्री.) – पहिल्या विताची (गाय इ.).
– लां (अ.) – पूर्वी, अगोदर.
– लुं (वि.) – (१) पहिले (२) पहिल्या नंबराचे, मुख्य. (३) (अ.) सर्वांत पुढे.
पहेला खोळानुं – (१) (स्त्रीचे) पहिलेच मूल (२) (लाक्ष.) फार लाडावलेले किंवा लाडके मूल.
– नंबरनुं – श्रेष्ठ दर्जाचे – नंबराचे.
– लेथी – पहिल्यापासून.
– ले घरथी – अगदी सुरुवातीपासून.
– ले पाटले – (१) आरंभी, (२) अगदी शेवटीं – टोकाला.
पहो (-हों) च (પહો-હોં-ચ) (स्त्री.) – (१) पोच (२) पावती (३) (लाक्ष.) समजशक्ती, अकल. (४) ऐपत, सामर्थ्य.
– वुं (अ. क्रि.) – (१) पोचणे, ठरलेल्या ठिकाणी दाखल होणे. (२) तसेच चालू राहणे, टिकणे (३) (तुलनेला किंवा चढाओढीत) बरोबरीचे होणे.
– ची वळवुं – अडचणीला पुरून उरणे – तोंड देऊन पार होणे.
– ची जवुं – वेळेवर जाऊन पोचणे.
– चाडवुं (स. क्रि.) – पोचवून देणे, पोचेल असे करणे.
– चेलुं (वि.) – पक्कं, न फसणारे.
पहोर (પહોર) (पु.) – प्रहर.
– रो (पु.) – पहारा.
पहोळावुं (પહોળાવું) (अ. क्रि.) – रुंद – पैस होणे.
पहोळुं (પહોળું) (वि.) – (१) रुंद (२) मोकळे, ऐसपैस. (३) बंद नसलेले, मोकळे. (४) सुटे, विखुरलेले.
– थवुं (१) आनंदणे. (२) फाजील उदार किंवा निष्काळजी बनणे.
– थई जवुं – जमीनदोस्त होणे.
– ळे हाथे – उदारहस्ते.
– ळाई (-श) (स्त्री.) – रुंदी.
पहोंची (પહોંચી) (स्त्री.) – पोची (मनगटाचा एक दागिना).
– चो (पु.) – मनगट.
– चा करडवा – (१) गोंधळून जाणे, मनगटे चावीत बसणे (२) पस्तावा करणे.
पळकवुं (પળકવું) (अ. क्रि.) – (न) तोंडाला पाणी सुटणे (२) खाण्याच्या आशेने नेहमी येणे.
पळको (પળકો) (पु.) – (१) पापणीची उघडझाप (२) चमचम.
पळवुं (પળવું) (अ. क्रि.) – (१) जाणे (२) पालन होणे (३) जमणे (४) केस पांढरे होणे (५) प्रकट होणे (६) (स. क्रि.) – (वचन) पाळणे (७) (जमिनीचा) भोगवटा कबजात असणे.
पळशी (-सी) (પળશી-સી) (स्त्री) – खुशामत, मन वळवण्याचे श्रम (झाझात).

**पळा** (પળા) (स्त्री.)–(१) पालन, परिचर्या, सेवाशुश्रूषा (२) ज्याचे पालन करायचे ते माणूस (मूल, म्हातारे इ.) (३) कंटाळा आणणारे काम.

**पळियुं** (પળિયું) (न.)–पांढरा झालेला केस.

**–यां आववां**–केस पांढरे व्हायला लागणे, म्हातारे होणे.

**पळिय(-ये) ल** (પળિય-યે-લ) (वि.)–पाळ काढलेले–घातलेले.

**पळोजण** (પળોજણ) (स्त्री)–(१) बरदास्त, ऊठबस, व्यवस्था (२) चिंता, उपाधी.

**पा** (પા) (वि.)–(१) पाव (२) बाजू.

**पाक** (પાક) (वि.)–पक्के, तुपांत तयार केलेले.

**पाक** [फा.] (वि.)–(१) पवित्र (२) प्रामाणिक.

**–दामन** (वि.)–पवित्र दानतीचे, शीलवान.

**पाक** [सं] (पु.)–(१) पक्वता (२) पीक (३) उत्पन्न (४) पिकणे (करट वगैरे) (५) स्वैपाक (६) हृदयंगम अर्थगांभीर्य

**–के चडवुं**–पिकत येणे.

**–के मूकवुं**–पिकत टाकणे, पिकेल असे करणे.

**–चट** (वि.)–अर्धवट पिकलेले.

**–ट** (वि.)–(१) पक्के (२) पोक्त, अनुभवी.

**–वुं** (अ. क्रि.)–(१) पिकणे, निपजणे, उत्पन्न होणे. (३) पू होणे. (४) (केस) पांढरे होणे. (५) (हुंडीची) ठरविलेली मुदत होणे. (६) फळास येणे, लाभ होणे ('आजनो दिवस पाक्यो')

**पाकी** (પાકી) (स्त्री)–हरताळ.

**–पडवी**–हरताळ पडणे.

**–खूलवी**–हरताळ संपणे.

**–पर जवुं**–हरताळ करणे.

**पाकुं** (પાકું) (वि.)–(१) पक्व, पिकलेले (२) पोक्त (३) मिष्टान्नाचे (जेवण) (४) तुपात बनविलेले–न विटाळण्याजोगे–पक्के अन्न (५) पक्के, न फसण्याजोगे. (६) हुषार, वाकबगार. (७) दृढ, खंबीर. (८) पक्के (कच्चे नसलेले).

**–घंट** (वि.)–अतिशय पक्के–जाणते.

**–पान**–पिकले पान, वृद्ध मनुष्य.

**–मकान**–चुना–विटेचे घर.

**–लखाण**–शेवटचा कायदेशीर लेख.

**पाके पाये**–खात्रीपूर्वक, निश्चित.

**पाको मारवाडी**–(१) महाकृपण (२) जबरदस्त ठग.

**पाख** (પાખ) (स्त्री.)–सहायता, पाठिंबा.

**–डुं** (न.)–सहायक पक्ष, वगवशिला.

**पाखर** (પાખર) (स्त्री.)–(१) घोड्यावर किंवा हत्तीवर चढविण्याचे सामान (२) फुलांची चादर, फुलांची पखरण.

**पाखाडो** (પાખાડો) (पु.)–बोंबाबोंब.

**–डा पडवा**–आरडाओरड–बोंबाबोंब–करणे.

**पाखी** (-खे) (પાખી-ખે) (अ.)–शिवाय.

**पाखो** (પાખો) (पु.)–चुलीवर चढविण्याच्या भांड्याला बाहेरून लावलेला मातीचा लेप.

**पागडुं** (પાગડું) / **पागढुं** (પાગઢું) (न.)–रिकीब, घोड्यावर बसल्यानंतर उजवा पाय ठेवतात ते.

**पागर** (પાગર) (स्त्री.)–(१) वारा पडल्यामुळे होडीला दोरीने ओढीस नेणे (२) होडी खेचणे (३) ती दोरी बांधून ठेवण्याचा जमिनीत पुरलेला लोखंडी आकडा.

**पागरण** (પાગરણ) (न.)–(१) अंथरूण पांघरूण (२) साज शृंगार (३) सुमुहूर्त, चांगली वेळ.

**पागियो** (પાગિયો) (पु.)–(१) सल्लागार, मदतगार. (३) जासूद, दूत.

**पाघ** (પાઘ) (स्त्री.)–(१) पगडी (२) (पु.) मोठे पागोटे.

**–डी** (स्त्री.)–(१) पगडी (२) (लाक्ष.) चांगले काम केल्याबद्दल दिलेले शेलापागोटे. (३) भाड्यानें घर घेताना आगाऊ चोरून द्यावी लागणारी रक्कम (४) (कटाक्ष.) लाच.

**–डी उछाळवी**–लोकांत फजीती करणे.

**–उतारवी**–गयावया करणे.

**–ऊंधी घालवी**–दिवाळे काढणे.

**–गमाववी** (१) अब्रू गमावणे. (२) फसविले जाणे.

**–नीची करवी**–(१) बदनाम करणे. (२) गयावया करणे, इकडे साक्ष घेणे.

**–फेरववी**–(१) बोल दिलेला फिरविणे, पगडी फिरविणें. (२) दिवाळे काढणे, पक्ष बदलणे.

**–बगलमां मारवी**–अब्रूची पर्वा नसणे.

**–बंधाववी**–(१) पगडी-पागोटे बांधून घेणे. (२) शेलापागोटे देणे. (३) शाबासकी देणे. (४) मेलेल्याबद्दलचा सुतकीपणा टाकून व्यवहार करायला लावणे.

**–लेवी**–अब्रू घेणे. (२) जिंतणे, ठकविणे, मार खायला लावणे.

**–संभाळवी**–अब्रू संभाळणे, सावध राहणे.

**–नो धणी**–व्यापार-व्यवहारात प्रतिष्ठित.

**–नो पेच संभाळवो**–अब्रू संभाळणे.

**–बंध**–(पुरुषानें) पुनर्विवाह करणे.

**पांउ** (પાંઉ) (पु.)–पावरोटी.

**पांकड** (-डुं) (પાંકડ-ડું) (वि.)–भाकड (ढोर).

**पांकवुं** (પાંકવું) (स. क्रि.)–(१) इच्छिणे, अपेक्षिणे (२) धरणे, पकडणे.

–बंधारण (न.)–राज्यघटना.

राड (રાડ) (स्त्री.)–(१) किंकाळी. (२) तंटा. (३) तक्रार, ओरडा. (४) आग्रह, आसक्ती.

–ऊठवी–ओरडा किंवा तक्रार होणे.

–करवी–(१) तक्रार करणे. (२) तंटा करणे. (३) हट्ट करणे.

–नाखवी, –पाडवी–(१) किंकाळी फोडणे. (२) फिर्याद करणे.

–लागवी–छंद लागणे.

राडुं (રાડું) (न.)–(१) ज्वारी-बाजरीचे थाट. (२) तीर. (३) बोरू.

राणीजायुं (રાણીજાયું)–राणीचे अपत्य.

राणीप (રાણીપ) (स्त्री.)–(१) राजीखुषी. (२) सलोखा.

राणुं (રાણું) (वि.)–मालविलेला (दिवा).

–घब (वि.)–गडद अंधार.

राणो करवो–दिवा मालविणे.

रांट (રાંટ) (स्त्री.)–(१) वळण, बांक. (२) बेबनाव.

रांडवुं (રાંડવું) (अ. क्रि.)–विधुर किंवा विधवा होणे.

रांडीछांडी (રાંડીછાંડી) (स्त्री.)–टाकलेली स्त्री.

रांढवुं (રાંઢવું) (न.)–दोर.

रात (રાંત) (पु.)–हजामाचे मानवाचक संबोधन.

रात (स्त्री.)–रात्र.

–आपणा बापनी छे–रात्रीचा वेळ आपलाच आहे.

–नो राजा–(१) चोर. (२) घुबड. (३) दिवसा झोपून रात्री काम करणारा मनुष्य.

–माथे लेवी–रात्रीचे जागरण करणे.

–रेवा (अ.)–रात्री लवकर–उशीरा केव्हातरी.

–वरत (अ.)–रात्री वाटेल त्या वेळी.

–वासो (पु.)–रात्रीचा शेतात राखणीसाठी मुक्काम

रातड (રાતડ) (स्त्री.)–(१) लालसरपणा. (२) गाजर.

रातब (રાતબ) (स्त्री.)–रतीब.

रातम (રાતમ) (स्त्री.)–विद्यार्थ्यांचा गृहपाठ.

रातुं (રાતું) (वि.)–(१) लाल. (२) आसक्त, रत.

–चटक, –चोळ (वि.)–लालभडक.

–पीळुं (वि.)–चिडलेले, भडकलेले.

–मातुं (वि.)–आरोग्यवंत आणि आनंदी असलेले.

रात्रे (રાત્રે) (अ.)–रात्री.

रानी परज (રાની પરજ) (स्त्री.)–जंगलात राहणारी आदिवासी जनता.

रांधवुं (રાંધવું) (स. क्रि.)–(१) स्वैपाक करणे. (२) (लाक्ष.) साधणे, फळ मिळविणे.

रापतो (રાપતો) (पु.)–रिवाज.

राफ,–डो (રાફ-ડો) (पु.)–(१) सापाचे किंवा उंदराचे बीळ. (२) वारूळ.

–डो फाटवो–(लाक्ष.) पेव फुटणे.

राब (રાબ) (स्त्री.)–(१) कांजी (२) उसाच्या रसाचा गूळ होण्यापूर्वीची अवस्था.

–ड (स्त्री.)–(१) दाट चिखल (२) (वि.) जडबुद्धी, मूर्ख.

राबेतो (રાબેતો) (पु.)–रिवाज, नियम.

राभुं (રાભું) (वि.)–असंस्कारी, गांवढळ.

रामनाम जपो–मुकाट बसून राहा, उगे राहून पाहात राहा.

रामनामनी आपवी–मरेस्तोवर मारणे.

राम बोलवा–राम म्हणणे, मरणे.

–रमी जवा–(१) मरणे (२) फुटून चकाचूर होणे. (३) सत्यानाश होणे (४) थंड पडणे, सत्त्वहीन बनणे.

–राम करो–ती गोष्ट सोडून द्या.

–रोटलो थवो–फुटणे, चकाचूर होऊन जाणे.

–कहाणी (स्त्री.)–दुःख कहाणी.

–कहाणी थवी–आपत्ती येणे.

–की (स्त्री.)–जोगीण, बैरागीण.

–कूंडाळुं (न.)–मोठे कुंड.

–कृष्णना वारानुं (वि.)–अति प्राचीन

–गलोलो (पु.)–चिंता नसलेला सुखी व निरोगी माणूस.

–गोवाळियो (पु.)–नागव्याने फिरणारे मूल.

–चकर (न.)–(१) मोठे कुंड, (२) मोठा रोट.

–ठाठियुं (न.)–मोडकीतोडकी जुनी वस्तू.

–डोळी (स्त्री.)–तिरडी.

–दवारो (पु.)–(१) राममंदिर (२) धर्मशाळा.

–दासियुं (वि.)–गरीब, कंगाल, दुःखी.

–नामियुं (न.)–रामनाम असलेला गळ्यातला एक दागिना.

–नामी (स्त्री.)–रामनाम छापलेली चादर–उपरणे.

–नोम (स्त्री.)–रामनवमी.

–भरोंसो (पु.)–ईश्वराधार

–रस (पु.)–(१) मीठ (२) रामभक्तीचा रस.

–राज(-ज्य) (न.)–सुखी व सदाचारसंपन्न राज्य.

–रोटी (स्त्री.)–(१) शिजविलेल्या अन्नाची भिक्षा. (२) मिष्टान्न.

–जणी(-नी) (स्त्री.)–गणिका, नर्तिका, नायकीण,

रामण (રામણ) (स्त्री.)–पीडा, आपदा.

–थवी–आपदा येणे

–वेरी नाखवी–अतिशय दुःख देणे.

–दीवो (पु.) – लामण दिवा.
रामायण (રામાયણ) (न.) – रामकथा. (२) दुःख कहाणी. (३) आपलीच लांबड (४) (स्त्री.) आपदा, त्रास.
– उकेलवुं – मालमसाला लावून गोष्ट सांगणे.
रामी (રામી) (पु.) – (१) माळी. (२) विधवांनी नेसण्याचे वस्त्र.
रामो (રામો) (पु.) – रामा गडी.
रांपडी (રાંપડી) (स्त्री.) – कोळपण.
रांपवुं (રાંપવું) (स. क्रि.) – कोळपण फिरवणे.
रांभो (રાંભો) (पु.) – खोदण्याचे एक अवजार.
राय (રાય) (स्त्री.) – मत, अभिप्राय.
राय आमळुं (રાય આમળું) (न.) – (१) मोठा आवळा, (२) राय आवळा.
रायजग (રાયજગ) (पु.) – (१) राजसूय यज्ञ (२) (लाक्ष.) कोणताही मोठा समारंभ.
रायत (રાયત) (स्त्री.) – (१) पीडानिवारण, आराम (२) पक्षपात, वशिला.
राल (રાલ) (स्त्री.) – राळ.
राव (રાવ) (स्त्री.) – (१) फिर्याद (२) मदतीसाठी काकुळत (३) चहाडी, चुगली.
– करवी, – खावी – फिर्याद करणे.
रावटी (-ठी) (રાવટી-ઠી) (स्त्री.) – (१) गोल गच्ची (२) राहुटी.
रावणियो (રાવણિયો) (पु.) – गावचा चौकीदार.
रावणुं (રાવણું) (न.) – (१) गावची जमात सभा–ज्ञातिसभा. (२) शिपायी लोकांचे राहण्याचे ठिकाण.
– करवुं – (१) नशापाणी करण्याकरिता बैठक भरविणे. (२) पंच बोलावणे.
रावत (રાવત) (वि.) – (१) हुषार. (२) शूरवीर. (३) (पु.) राऊत (४) घोडेस्वार योद्धा.
रावता (રાવતા) (स्त्री.) – राज – रीत, राजेपण.
रावती (રાવતી) (स्त्री.) – दागिन्यात वापरण्यात येणारे रेवण.
– काढवी – (१) दागिने बनविताना धातूचे कण चोरणे. (२) नकळत चोरुन काही हडप करणे.
रावल (રાવલ) (पु.) – (१) लहान रजपूत जहागीरदार किंवा राजा (२) बद्रीनारायणाचा पुजारी.
रावळुं (રાવળું) (न.) – (१) गावची जमातसभा. (२) राजदरबार. (३) जनानखाना.
राश (રાશ) (स्त्री.) – (१) (१६ हाती) दोर (२) लगाम (३) भागीदारी (४) व्याज अधिक मुद्दल मिळून होणारी. रास (५) सरासरी (६) (पु.) रास, ढीग.
– पडवुं – (काम) लागी लागणे, व्यवस्थित होणे.
– भागवी – पीळ देऊन दोर बनविणे.
बनती राश आववी – मेळ जमून येण्याजोगी परिस्थिती येणे, मेळ जमणे.
राशवा (રાશવા) (वि.) – सोळा हाती.
राशी (રાશી) (वि.) – वाईट (माल).
रास (રાસ) (स्त्री.) – (१) भूशिर (२) गाता गाता गोलाकार फिरत करतात तो नाच आणि त्यात गायिले जाणारे गीत.
– डी (स्त्री.) – (१) दोर (२) गळ्यात घालण्याची रुप्याची साखळी.
– डो (पु.) – एक प्रकारचा गरबा नाच (ज्यात घटनेचे वर्णन असते असा.)
रासो (રાસો) (पु.) – वीररसाच्या काव्याचा एक प्रकार.
राह (રાહ) [फा.] (पु.) – (१) रस्ता (२) (स्त्री.) रीत, चाल (३) वाट, प्रतीक्षा.
– जोवी – वाट पाहणे.
– मारवो – नाश करणे.
– दार – (१) (वि.) रस्त्याने चालणारे. (२) (पु.) वाटाड्या.
– दारी (पु.) – (१) वाटसरू (२) (स्त्री.) रस्त्यावरुन नेल्या जाणाऱ्या मालावर घेण्यात येणारा कर. (३) वाटाडेपण.
– बर (पु.) – वाटाड्या.
– बरी (स्त्री.) – वाटाडेपण.
– रसम (स्त्री.) – रिवाज, रूढी.
राहत (રાહત) [अ.] (स्त्री.) – सुख, विसावा, पीडा निवारणाची मदत.
राळ (રાળ) (स्त्री.) – 'डॉलर'.
राळवुं (રાળવું) (स. क्रि.) – गुळगुळीत करणे. (२) आपापसात मिटविणे (३) राळ भरणे.
रिझवट(-ण) (રિઝવટ-ણ) (स्त्री.) – मन रमविण्याची क्रिया किंवा कला.
रिझाववुं (રિઝાવવું) (स. क्रि.) – मन प्रसन्न करणे – रमविणे.
रिझावुं (રિઝાવું) (अ. क्रि.) – संतुष्ट होणे.
रिबावुं (રિબાવું) (अ. क्रि.) – छळणूक होणे, पीडले जाणे.
रिबाववुं (રિબાવવું) (स. क्रि.) – छळ करायला लावणे, त्रास द्यायला लावणे.
रिबामण(-णी) (રિબામણ-ણી) (स्त्री.) – छळ
रियासत (રિયાસત) [अ.] (स्त्री.) – (१) सत्ता, कारकीर्द (२) जहागीर (३) संस्थान.
रिश्तेदार (રિશ્તેદાર) [फा.] (पु.) – आप्त, संबंधी.
– री (स्त्री.) – नाते, संबंध.
रिश्वत (રિશ્વત) [अ.] (स्त्री.) – लाचलुचपत.
– खोर, – ती (वि.) – लाचलाऊ.

रिसामणी (રિસામણી) (स्त्री.) – रुसणे, रागावणे.
– णुं (वि.) – (१) रुसवे, रागीट. (२) (न.) रुसवा, राग.
रिसावुं (રિસાવું) (अ. क्रि.) – रागावणे.
रीखणुं (રિખણું) (न.) – रांगणे.
– वुं (अ. क्रि.) – (१) रांगणे. (२) भटकणें, रखडणे.
रीझ (રીઝ) (स्त्री.) – आनंद, खुषी.
– वुं (अ. क्रि.) – संतुष्ट होणे, खूष होणे.
– ववुं (स. क्रि.) – आनंदित करणे.
रीड (રીડ) (स्त्री.) – ओरड.
रीढुं (રીઢું) (वि.) – (१) मजबूत, पक्के. (२) दुःख सोसून कठीण बनलेले. (३) न सुधारण्यासारखे.
रीत (રીત) (स्त्री.) – (१) पद्धती (२) मुलीच्या लग्नप्रसंगी केलेली 'यादी.'
– करवी – (१) विधीप्रमाणे – रिवाजाप्रमाणे करणे. (२) विधीपुरते करणे. (३) यादी (लग्नाची) करणें.
– पडवी – रिवाज – रूढी पडणे.
– मां आववुं – गंभीर किंवा पोक्त होणे.
– मां – रहेवुं – रूढीप्रमाणे वागणे, व्यवहार संभाळणे.
– ते (अ.) – (१) प्रमाणे (२) पद्धतीप्रमाणे.
रीबवुं (રીબવું) (स. क्रि.) – छळणे.
रीस (રીસ) (स्त्री.) – राग.
– करवी – (१) राग करणे, (२) वाईट लागणे.
– चडवी, रीसे भरावुं – संतापणे.
– वुं (अ. क्रि.) – पाहा 'रिसावुं.'
रींगण (રીંગણ), – णुं (न.) – वांगे.
– णी (स्त्री.) – वांग्याचे झाड.
रींछ (રીંછ) (न.) – अस्वल.
– डी (स्त्री.) – मादी अस्वल.
– डुं (न.) – अस्वलाचे पिल्लू.
रुआब (રુઆબ) (पु.) – रुबाब, दबदबा.
– करवो – दाब-छाप-टाकण्यासारखे वर्तन करणे.
– पडवो – दुसऱ्यावर दाब-छाप-पडणे.
रुकावट (રુકાવટ) (स्त्री.) – अडथळा, अटकाव, प्रतिबंध.
रुक्को (રુક્કો) (पु.) – छोटी चिठी.
– करवो; – करी आपवो – कामानिमित्ताने चिठी लिहून देणे.
रुख (રુખ) [फा.] (पु.) – (१) गाल (२) चेहेरा (३) रोख, पक्षपात.
रुखसत(-द) (રુખસત-દ) (स्त्री.) – बडतर्फी, रजा.
– आपवी – नोकरीवरून किंवा कामावरून कमी करणे.
– लेवी – मुक्त होणे, रजा घेणे.
रुचवुं (રુચવું) (अ. क्रि.) – रुचणे.

रुज(-जा) (રુજ-જા) (स्त्री.) – रोग, पीडा.
रुझाववुं (રુઝાવવું) (स. क्रि.) – जखम भरेल असे करणे.
रुझावुं (રુઝાવું) (अ. क्रि.) – जखम भरणे, खपली बसणे.
रुमाडो (રુમાડો) (पु.) – आरडाओरड.
रुवांटी (રુવાંટી) (स्त्री.) – रोम, कोवळे केस.
रुयेल(-लुं) (રુયેલ-લું) (वि.) – रूने भरलेले.
रुसवा (રુસવા) (वि.) – फजीत पावलेला, बदनाम झालेला.
– ई (स्त्री.) – फजिती, अपकीर्ती.
रूइयो (રૂઇયો) (पु.) – पिंजारी.
रूए (રૂએ) (अ.) – च्या आधारे किंवा प्रमाणे किंवा कारणे.
रूख (રૂખ) (स्त्री.) – (१) पाहा 'रुख' (२) अटकळ. (३) विचार, मत. (४) बाजाराचा रोख, भावमान. (५) योग्य संधी, मोका.
– जोवी – मोका किंवा संधी पाहणे.
– बांधवी – (१) रोख पाहणे (२) अटकळ करणे.
रूझवुं (રૂઝવું) (अ. क्रि.) – जखम भरून येणे, खपली बसणे.
रूठवुं (રૂઠવું) (अ. क्रि.) – रागावणे.
रूडप (રૂડપ) (स्त्री.) – (१) देखणेपणा, सुंदरता. (२) सज्जनपणा, भलेपणा.
रूडुं (રૂડું) (वि.) – चांगले, छान, सुंदर.
रूडां वानां थवां – शुभ – चांगले – होणे.
रूतवुं (રૂતવું) (अ. क्रि.) – चिकाटीने मागे लागणे.
रूपण (રૂપણ) (न.) – अभिनय.
रूप रूपनो अंबार (રૂપ રૂપનો અંબાર) – सौंदर्याची अतिशयता
रूप रूपनी मणि – अतिशय सुंदर स्त्री.
रूपाळुं (રૂપાળું) (वि.) – सुंदर, देखणे.
रूपामहोर (રૂપામહોર) (स्त्री.) – रुपया.
रूपांदे (રૂપાંદે) (स्त्री.) – सुंदर अंगाची स्त्री.
रूपुं (રૂપું) (न.) – रुपे.
रूबरू (રૂબરૂ) [फा.] (अ.) – समक्ष.
– थवुं – जातीने हजर होणे.
– मां (अ.) – समक्ष, हजुराहुजूर.
रूवुं (રૂવું) (न.) – रोम, शरिरावरील लहान केस.
रूवां ऊभां थवां – रोमांच उभे राहणे.
रूवुं न फरकवुं – यत्किंचितही परिणाम न होणे.
रूवो (રૂવો) (पु.) – जात्याचा मधला खुंटा किंवा खिळा.
रूह (રૂહ) [अ.] (पु. न.) – आत्मा.
– हानी [का.] (वि.) – आत्म्यासंबंधीचे
रूंगुं (રૂંગું) (न.) – रुदन.
रूंध (રૂંધ) (स्त्री.) – ण(-न) (न.) (१) अटकाव, प्रतिबंध. (२) पेच.

–वुं (अ. क्रि.)–(१) रोकणे, अटकाव करणे.
(२) गुदमरविणे.
रूंधामण (રૂંધામણ) (स्त्री)–गुदमरणे.
रेखमाल (રેખમ લ) (पु.)–धातू वगैरेची कठीण पूड, पॉलीशची पूड.
–नो कागळ–पॉलीश पेपर'
रेखीलुं (રેખીલું) (वि.)–रेखीव, स्पष्ट.
रेगिस्तान (રેગિસ્તાન) [फा.] (पु. न.)–वाळवंट, रेताड प्रदेश.
रेंकडी (-ळी) (રેંકડી-ળી) (स्त्री.)–(१) छोटी बैलगाडी, रिंगी. (२) भारवाहक हातगाडी किंवा लॉरी.
रेंकवुं (રેંકવું) (अ. क्रि.)–गाई म्हशींचे हंबरणे.
रेचकुं (રેચકું) (न.)–दोघांच्या भांडणात तिसऱ्याची चिथावणी.
रेजगी (રેજગી) (स्त्री.)–सुटी-किरकोळ-मोड (मोठ्या नाण्याची).
रेंचको (રેંચકો) (पु.)–चिखल, रेंदा.
रेंजीपेंजी (રેંજીપેંજી) (वि.)–(१) नेभळट (२) निरुत्साही
रेडववुं (રેડવવું) (स. क्रि.)–(१) निभावून घेणे, (२) लोळायला लावणे.
रेडवुं (રેડવું) (स. क्रि.)–ओतणे.
रेढियाळ (રેઢિયાળ) (वि.)–(१) भटके, बिनवारशी (२) निरुपयोगी.
–गाडुं–रें रें करीत चालणारे (कामाचे) गाडे.
रेढियुं (રેઢિયું) (वि.)–दाट, घट्ट.
रेढुं (રેઢું) (वि.) (१) भटके, बिनवारशी, कोणी सांभाळ करीत नसलेले. (२) दाट, घट्ट.
–पडवुं–अनाथ–बिनवारशी होणे.
रेण (રેણ) (स्त्री.)–(१) रजःकण, धुळीचा-वाळूचा कण. (२) (न.) झारकाम करण्यास लागणारे द्रव्य.
–वुं (स. क्रि.)–झारकाम करणे.
रेंट (રેંટ) (पु.)–रहाटगाड्यासारखी रचना.
रेंटमाल (રેંટમાળ) (स्त्री.)–रहाटगाडग्यांची माळ.
रेंटियो (રેંટિયો) (पु.)–रहाट, चरखा.
रेंटो (રેંટો) (पु.)–उपरणे.
रेंड (રેંડ) (स्त्री.)–मादी वासरू, वासरी.
रेत (રેત) (स्त्री.)–बारीक रेती.
रेतडी (રેતડી) (स्त्री.)–लहान कानस.
–डो–(पु.)–मोठी कानस.
रेतवी (રેતવી) (वि.)–रेताड.
रेतवो (રેતવો)–(१) बारीक वाळूसारखी धूळ. (२) खणताना खूप रेती निघते अशी विहीर.
रेन (રેન) (स्त्री.)–रात्र.
रेफु (રેફુ) (पु.)–बातमीदार, गुप्तहेर.
रेबचो (રેબચો) (पु.)–पाण्याची खूप दवळादवळ, त्यायोगे झालेला चिखल.
रेबझेब (રેબઝેબ) (अ.)–घामाघूम, घाम निथळत.
रेल (રેલ) (स्त्री.)–(१) पूर (२) (लाक्ष.) रेलचेल.
रेल (स्त्री.)–रूळ (आगगाडीचे).
–गाडी (स्त्री.)–आगगाडी.
रेलवुं (રેલવું) (अ.)–(१) पूर येणे, वेगानें वाहणे. (२) जाणे (३) (स. क्रि.) जोराने ओतणे. (४) ओतणे. (५) पुरात वाहून जाणे.
रेलारेल (રેલારેલ) (स्त्री.)–पूरच पूर, रेलचेल.
रेलियुं (રેલિયું) (वि.)–(१) लहान लहान प्रवाह उपळावेत तसे (२) पुरातून वाहात आलेले (३) (न.) पुरातून वाहात आलेले लाकूड.
रेलो (રેલો) (पु.)–लहान प्रवाह.
रेव (–वं) त (રેવ-વં-ત) (पु.)–घोडा.
रेववुं (રેવવું) (स. क्रि.)–झारणे.
रेश (રેશ) (अ.) (वि.)–जरा, थोडेसुद्धा. (२) (न.) कण, लेश.
रेसो (રેસો) (पु.)–तंतु, रेषा. (वनस्पती, फळ इ. मधल्या).
रेसादार (રેસાદાર) (वि.)–रेषा असलेले.
रैयत (રૈયત) (स्त्री.)–प्रजा.
रो (રો) (पु.)–मर्यादा, सुमार.
रोक (રોક)–(१) (वि.) रोख. (१) (स्त्री.) प्रतिबंध, अडवणूक,
रोककळ (રોકકળ) (स्त्री.)–ळाट (पु.)–रडारड.
रोकटोक (રોકટોક) (स्त्री.)–काहीतरी हरकत किंवा विरोध.
रोकड (રોકડ) (वि.)–(१) नकद. (२) (स्त्री.) रोकड रक्कम.
–मेळ (पु.)–रोकड रकमा दिल्या-घेतल्याच्या हिशेबाची वही.
–डियुं (वि.)–(१) रोकड व्यवहार करणारे. (२) रोकठोक उत्तर देणारे.
–डी (स्त्री.)–दिवसाच्या नेहमीच्या मजुरीच्या वेळाव्यतिरिक्त ज्यादा वेळ कामाला ठेवून घेणे किंवा त्या ज्यादा वेळेच्या कामाची रोख मजुरी.
–डीए जवुं–ज्यादा वेळ कामाला जाणे.
–डुं (वि.)–(१) उधार न ठेवता लगेच रोख दिलेला (पैसा) (२) (नोट नव्हे) नगद पैसा. (३) रोकडे, स्पष्ट. (४) तसे उत्तर.
–डो जवाब–स्पष्ट नकार.
–डो हिसाब–(१) लागलीच व रोखीने केलेला हिशेब. (२) काही घोटाळा नसलेला निःसंदिग्ध हिशेब.
रोकणी (રોકણી) (स्त्री.)–कामावर गुंतवून घेणे. (२) गुंतविलेली रकम.

रोकवुं (રોકવું) (स. क्रि.)–(१) अडविणे, होऊ किंवा जाऊ न देणे. (२) नोकरीत ठेवणे, कामाला लावणे. (३) (पैसा) व्यापारधंद्यात गुंतविणे.
रोकाण (રોકાણ) (न.)–(१) गुंतवणूक. (२) अडवण.
रोकात (રોકાત) (स्त्री.)–रोकड पैसा.
रोकुं (રોકું) (वि.)–अमक्यासारखे, समान किंमतीचे.
रोकूट (રોકૂટ) (स्त्री.)–रडारड, शोक.
रोख (રોખ) (पु.)–(१) इच्छा, आकांक्षा. (२) दमाम, रुबाब.
रोखणुं (રોખણું) (न.)–तंटा, बखेडा.
रोखुं (રોખું) (न.)–जळणाची लाकडे.
रोग ऊपडवो–रोग होणे, रोगाची साथ येणे.
–ऊडवो–रोगाचा संसर्ग लागणे, रोग लागणे.
–काढवो–व्याधी दूर करणे.
–काढी नाखवो–(१) राग किंवा धुसफुस काढून टाकणे. (२) ठिकाणावर आणणे, सीधे करणे.
–चडवो–रोगाचा संसर्ग लागणे.
–चालवो–रोगाची साथ पसरणे.
–थवो, –भरावो–मनाला वाईट लागणे.
–मां बोलवुं–रागाच्या भरात बोलणे.
–चालो (पु.)–रोगाचा फैलाव, रोगाची साथ.
–दोग (पु.), –राई (स्त्री.)–रोगराथी.
रोगियुं, रोगीलुं (वि.)–रोगट, सदोदित आजारी.
रोगो (રોગો) (पु.)–चुना.
रोंक(-ख)णी (રોંક-ખ-ણી) (स्त्री.)–रंधा.
–वुं (स. क्रि.)–रंधा मारणे.
रोचुं (રોચું) (वि.)–(१) सुरकुतलेले (२) गांवढळ, जंगली, असभ्य.
रोज (રોજ) [फा.]–(१) (पु.) दिवस (२) एका दिवसाची मजुरी (३) [अ.] नेहमी.
–ऊठीने [अ.]–दररोज.
–पडवो–खाडा पडणे.
–भरवो } रोजीने काम करणे, रोज मजूर म्हणून
–रोजे जवुं } कामावर जाणे.
–दार (पु.)–रोजमजूर.
–नामुं (न.)–रोजमेळ.
–बरोज [फा.] (अ.)–रोजच्या रोज, दररोज.
रोजंदा (રોજંદા) (अ.)–नेहमी.
रोजिंदार (રોજિંદાર) (वि.) (पु.)–रोजमजुरीचे काम करणारा.
रोजिंदु (રોજિંદુ) (वि.)–रोजचे.
रोंचुं (રોંચું) (वि.)–गांवढळ, असभ्य.
–चो (पु.)–असंस्कृत मनुष्य.
रोटली (રોટલી) (स्त्री.)–पोळी.
–लो (पु.)–जाड भाकरी, रोट (२) (लाक्ष.) आजीविका.
–लो पडाववो, –खोवराववो–निर्वाहाचा धंदा गमावायला लावणे.
–लो जवो, –तूटवो–निर्वाहाचा धंदा जाणे, रोजी बंद होणे.
–लो थई जवुं–दबून चपटे होणे.
–लो बगाडवो–चरितार्थात व्यत्यय आणणे.
–लो वाळवो–(काम) बिघडवून टाकणे.
अडधो–आछो–पातळो–जाडो–सूको रोटलो–मीठभाकरी, गुजारा चालण्यापुरते अन्न.
रळीने रोटलो खावो–(१) मेहेनत करून प्रामाणिकपणे पैसे मिळवून खाणे (२) श्रीमंत नसेल तरी देणेकरी नसणे.
रोटला थवा–दोन पतंग एकात एक अडकून एक होणे.
–नुं भूख्युं–उपजीविकेचे साधन नसलेले, कंगाल.
–भेगुं थवुं–(१) जेवणापुरतें मिळणे (२) व्यवसाय मिळणे.
–वेळा–दुपारची जेवणाची वेळ.
–स्नान करवुं–ताटावर बसण्यांच्या वेळीच आंघोळ करणे.
रोटी (રોટી) (स्त्री.)–(१) पोळी (२) पावरोटी.
रोठुं (રોઠું) (न.)–(१) भरडी सुपारी (२) (लाक्ष.) असंस्कारी-जड मनुष्य.
रोडुं (રોડું) (न.)–विटेचा तुकडा.
रोण (રોણ) (न.)–बखेडा, दंगा.
–मांडवुं, –लेवुं–हट्ट धरून रडणे, रडून भांडणे.
रोण, -न (રોણ,-ન) (स्त्री.)–रात्रीची गस्त, रवण ('राउन्ड').
–करवी, –मारवी–गस्त घालणे.
रोण (स्त्री.)–रोहिणी नक्षत्र.
–दाझवी–रोहिणी नक्षत्र पावसावाचून जाणे.
–रेलवी–रोहिणी पडणे (त्या नक्षत्रावर खूप पाऊस पडणे).
रोणुं (રોણું) (न.)–रडणे.
रोंढुं (રોંઢું) (न.)–तिसरा प्रहर, सायंकाळची वेळ.
–ढो (पु.)–त्या वेळचे जेवण, सायंकाळचे जेवण.
रोतड (રોતડ)-डुं (वि.)–रडके.
रोतुं (રોતું) (वि.)–रडत असलेले.
रोदडुं (-णुं) (રોદડું-ણું) (न.)–(१) रडकथा (२) रडणे.
रोदणां रडवां–हताश होऊन रडकथा सांगत राहणे.
रोदो (રોદો) (पु.)–चाकोरीतील खड्डा.
रोनक (રોનક) [अ.] (स्त्री.)–चकाकी, तेज.
रोपवुं (રોપવું) (स. क्रि.)–(१) (रोप) लावणे (२) पुरुन उभे करणे.
रोपो (રોપો) (पु.)–रोप.

रोफ, (-ब) (રોફ-બ)(पु.)-(१) भपका, दबदबा (२) प्रताप, प्रभाव.
-करवो, -मारवो-(१) ऐट मारणे (२) वरचढपणा दाखविणे, दाब टाकणे.
-चलाववो, -पाडवो, -राखवो-प्रभाव टाकणे.
-बेसाडवो-धाक बसविणे.
रोबड (રોબડ) (वि.)-जड, मूर्ख, अरसिक.
रोमंथ (રોમંથ) [सं.] (पु.)-रवंथ.
रोल (રોલ) (पु.)-(जहाजात बसल्याबर येणारी) चक्कर, गरगरणे.
रोवुं (રોવું) (अ. क्रि.)-(१) रडणे (२) (स. क्रि.)-चे दुःख करणे. (३) (न.) रडणे.
रोवडाववुं (स. क्रि.)-रडायला लावणे ('रोवुं'चे प्रयोजक).
रोशन (રોશન) [फा.] (वि.)-(१) झळकणारे (२) प्रकाशित, जाहीर.
-थवुं-(सर्वांना) कळणे.
-वाळवुं-नुकसान करणे, धूळधाण करणे.
रोळ (રોળ) (पु.)-(१) पटकी, कॉलरा (२) दुर्दशा (३) मोठा समुदाय (४) आरडाओरड (५) झगडा, भांडण.
-चालवो-पटकीची साथ पसरणे.
-वळवो-दुर्दशा होणे, अतिशय नुकसान होणे.
-वाळवो-(१) भय-धाक पसरविणे (२) अतिशय नुकसान करणे. (३) दुर्दशा करून टाकणे. (४) अतिशय खर्च करणे.
रोळववुं (રોળવવું) (स. क्रि.)-लोळविणे.
रोळवुं (રોળવું) (स. क्रि.)-(१) चोळणे, तिंबणे (२) धुळीत लोळविणे. (३) (लाक्ष.) चिरडून मारून टाकणें.
रोळीकोळी (वि. स्त्री.)-संध्याकाळची वेळा.
रोळुं (રોળું) (वि.)-(१) अंधार असलेले, (२) मलिन झालेले. धुळीत लोळलेले. (३) (न.) तंटा, दंगा, धिंगाणा.
रोळो (રોળો) (पु.)-(१) भानगड. (२) गोंगाट, ओरडा. (३) कमाई.

## ल (લ)

लईने (લઈને) (अ.)-(१) घेऊन (२) अनुषंगाने.
लक (-क्क) डियुं (લક-ક્ક-ડિયું) (वि.)-(१) लाकडी (२) कठीण (३) झाडालासुद्धा कोळपून टाकण्याजोगे (हिम) (४) (न.) पंचपाळे.
लकवो (લકવો) (पु.)-अर्धांगवायू, पक्षाघात.
-मारवो-पक्षाघात होणे, अर्धे अंग लुले पडणे.
लकीर (લકીર) (स्त्री.)-रेघ
लकूटी (લકૂટી) (स्त्री.)-काठी.
लक्कड (લક્કડ) (न.)-लाकूड.
-कोट (पु.)-(१) लाकडी पडदी, 'पार्टीशन' (२) जहाजातून जेथे लाकडे उतरतात तो धक्का.
-धक्के (अ.)-कडकपणे, जोराने.
-धक्के लेवुं-निर्भर्त्सना करणे.
-फोडो (पु.)-लाकूडफोड्या.
-शी (-सी) (वि.)-लाकडासारखे कठीण.
लक्षणवंतु (वि.)-(१) सुलक्षणी (२) (कटाक्षार्थी कुलक्षणी).
लक्षवुं (લક્ષવું) (स. क्रि.)-(१) टकमक पाहणे (२) नजर लावून बसणे. (३) अंदाज करणे (४) शोधून काढणे, एकदा नजर टाकणे.
लख (લખ) (वि.)-(१) लाख, लक्ष (२) दृश्य (जगत) (३) छंद, नाद.
-चोराशी (स्त्री.)-चौऱ्यांशी लक्ष योनींचे चक्र.
-पति (पु.)-लक्षाधीश.
लखणी (લખણી) (न.)-(१) टिपण, यादी (दानाची किंवा वसुलीची).
-करवी-वसुली करणे.
-णुं (न.)-लिहिण्याची मजुरी.
-त (न.)-(१) करार, सही केलेले लिखाण. (२) ललाटलेख.
-त पत्तर (न.) (१) पत्रावरील लिखाण-मजकूर. (२) कांहीं तरी लिखाण (कच्चे, अनिश्चित).
लखलखवुं (લખલખવું) (अ. क्रि.)-(१) फाटणे, भेग पडणे, पीडा होणे. (२) झळकणे, चकचकणे. (३) वटवट करणे. (४) अतिशय भूक लागणे. (५) तीव्र अभिलाषा वाटणे.
-खाट (पु.)-लखलखाट, झगझगाट.
लखलूट (લખલૂટ) (वि.) -बेसुमार, पुष्कळ.
लखवुं (લખવું) (स. क्रि.)-(१) लिहिणे. (२) रेषा ओढणे, आलेख तयार करणे. (३) अवलोकन करणे, पाहणे.
लखी आपवुं-लिहून देणे.
-पाडवुं-जलद लिहून काढणे.
-मारवुं-असेल त्याहून वेगळे (चुकीने किंवा घाईने) लिहून काढणे.

लखाण (લખાણ) (न.) – (१) लिहिलेला मजकूर. (२) लिहिण्याचा मजकूर.
– पढाण (न.) – लिखित पुरावा.
– पट्टी (-डी) (स्त्री.) – एकसारखे लिहिणे.
लखारो (લખારો) (पु.) – (१) रिकामी बटबट (२) लाखेची चुडी बनविणारा.
लखावट (લખાવટ) (स्त्री.) – (१) लिखाण (२) लिहिण्याची शैली (३) धास्ती (४) बटबट.
लखितंग (લખિતંગ) (वि.) – (पत्र) लिहिणार (तृतीया विभक्तीतील कर्त्यांशी जोडून; 'अमूले लिखितंग').
लखोटवुं (લખોટવું) (स. क्रि.) – (मातीच्या भांड्यावर) लाख चढविणे.
लखोटी (લખોટી) (स्त्री.) – गोटी.
लख्या लेख – विधिलिखित.
लग (લગ) (स्त्री.) – लग, आढ्याचा आधार.
लगझूड (લગઝૂડ) (स्त्री.) – डोकेफोड.
लगट (લગટ) – (१) (वि.) लागून असलेले (२) (अ.) सलग्न, लागून.
लगण (લગણ) – (१) (पु.) बोजा, ओझे. (२) (अ.) पर्यंत.
लगत (લગત) (वि.) – (१) जवळचे (२) (स्त्री.) घरोबा, संबंध, नाते. (३) (अ.) लागून.
– ती (स्त्री.) – लाज, प्रतिष्ठा.
– तुं (वि.) – संबंधी, लागू पडणारे, जवळचे.
लगन (લગન) (न.) – (१) लग्न (२) (स्त्री.) छंद, नाद.
– उकेलवुं – लग्नाच्या बोजातून पार पडणे.
– लखावबुं – लग्नमिती निश्चित केल्याचे लेखी कळविणे.
– लागवी – छंद लागणे
– गाळो (पु.) – लग्नाचा मोसम.
– घडी (स्त्री.) – लग्नाचा मुहूर्त.
– पडो (पु.) – वराकडून वधूपक्षाला लग्नाचा शुभदिवस लिहून पाठविण्यात येणारी कुंकवाची पुडी.
– सरा (स्त्री.) – लगीनसराई.
– नियो (पु.) – वराला घेऊन येण्याकरिता जाणारा वधूकडील आप्त.
– नी (स्त्री.) – छंद, नाद.
लगभग (લગભગ) (अ.) – जवळजवळ (२) सुमारे.
लगवाड (લગવાડ) (स्त्री.) – संबंध, प्रीती.
लगवुं (લગવું) – (१) (न.) नक्की केलेल्या भावाने दररोज अमुक वस्तू घेणे (२) (स. क्रि.) लागणे, चिकटणे (३) पोचणे.
लगाडवुं (લગાડવું) (स. क्रि.) – (१) चिकटविणे (२) लावणे, स्पर्श करविणे (३) चोपडणे (४) पेटविणे.
लगातार (લગાતાર) (अ.) – सतत.
लगार, - रेक (લગાર-,રેક) – (१) (वि.) थोडेसे (२) (अ.) किंचित्काळ.
लगाव (લગાવ) (पु.) – मेण.
लगावबुं (લગાવવું) (स. क्रि.) – (१) पाहा 'लगाडवुं' (१), (२) व (३) (२) मारणे, ठोकणे.
लगी (લગી) (अ.) – पर्यंत.
लगीर, - रेक (લગીર,-રેક) (अ.) – पाहा 'लगार'.
लगोलग (લગોલગ) (अ.) – (१) निकट, चिकटून (२) जवळपास, जवळ.
लग्न लेवुं (- वां) – (१) लग्नाचा मुहूर्त ठरविणे. (२) लग्नाची तयारी करणे.
लग्ने लग्ने कुंवारा – सदोदित अतृप्त.
लघरा (લઘરા) (पु. ब. व.) – कपड्याच्या चिंध्या.
लघुवयी (લઘુવયી) वि.) – लहान वयाचे.
लंक (લંક) – (१) (वि.) धनवान (२) (पु.) ढीग (३) बारीक कमरेची लचक, कमरेचा बाक
– लागवो – (१) श्रीमंत होणे (२) यशस्वी होणे, पार पडणे.
लंका करवी – पेटविणे, मोठी आग लावणे.
– जीतवी – मोठा विजय मिळविणे.
– नी लाडी – फार दूर दिलेली मुलगी.
– बाळवी – गुप्त गोष्ट फोडणे.
– लूंटवी – अतिशय मोठा खजिना ताब्यात घेणे.
लंगडावुं (લંગડાવું) (अ. क्रि.) – लंगडत चालणे.
लंगर (લંગર) (न.) – (१) (बोटीचा) नांगर (२) सदावर्त, अन्नछत्र (३) एका टोकाला वजन बांधलेली दोरी (४) लांब रांग.
– लडाववां – (१) पतंगांचा कटाकटीचा वगैरे खेळ खेळणे. (२) आपापसात तंटा करणे.
– खानुं (न.) – सदावर्त, अन्नछत्र.
– वा (न.) – (१) एका टोकाला वजन बांधलेली दोरी (२) (अ.) नांगर जाईल तितके.
– वार (वि.) – हारबंद, ओळीने लावलेले.
– वार करवुं – ओळीने लावणे.
– वुं (स. क्रि.) – (१) नांगर टाकणे. (२) एकाला एक जोडून साखळी किंवा रांग करणे (३) (लाक्ष.) फंदात अडकविणे.
– रियुं (न.) – पैंजण.
लंगार (લંગાર) (स्त्री.) – लांबच लांब रांग. (२) साखळी.
लंगूर - ल (લંગૂર,-લ) (न.) – शेपूट.
– रियो (पु.) – वानर.
– वा (पु.) – पिच्छा.

लंघावुं (अ. क्रि.) – (१) लंगडत चालणे. (२) सुकून कमी होणे.
लचडवुं (लचडवुं) (स. क्रि.) – चोपडणे.
लचपच (लचपच) (अ.) – भिजून चिंब.
लचवुं (लचवुं) (अ. क्रि.) – माराने वाकणे.
लची जवुं, – पडवुं – (१) वाकणे (२) गयावया करणे.
लच्छो (लच्छो) (पु.) – मांजा.
लजववुं (लजववुं), लजावबुं, लजाडवुं (स. क्रि.) – लाजविणे, लाजेल असे करणे.
लजामणी (लजामणी) (स्त्री.) – लाजाळूचे झाड.
– णुं (वि.) – लाज वाटण्यासारखे, शरम वाटेल असे.
लंचावुं (लंचावुं) (अ. क्रि.) – (१) सुकून बारीक होणे, (२) संकोचणे.
लट (लट) (स्त्री.) – बट (केसांची झुलपे) (२) वडाची मुळी (३) सुताची १६० तारांची जुडी. (४) मोत्यांचा सर.
– पाडवी – सुताच्या १६० तारांची लट बांधणे.
लटक (लटक) (स्त्री.) – (१) लचक (२) मुरका (३) छटा (४) शैली.
– ण (वि.) – (१) लटकणारे, झुलणारे (२) (न.) झूल.
लटकुं (लटकुं) (न.) – नखरा.
– को (पु.) – चाळा, नखरा.
– कोझटको (पु.) – (१) काही थोडीशी फुरसद-सवडीचा वेळ (२) (अ). दैवयोगे, अचानक.
लटपट (लटपट) – (१) (वि.) चंचल, चपळ. (२) एकमेकांला चिकटलेले, प्रेमासक्त (३) (स्त्री.) चपलता, चलाखपणा. (४) मेळ, गट्टी. (५) प्रेमासक्ती. (६) घालमेल, कारस्थान. (७) (अ.) जलदी, झटपट.
– करवी – दुसऱ्याला फसविण्याकरिता लुच्चेगिरी - कारस्थान - घालमेल करणे.
– बनवुं – प्रेमासक्त होणे.
– वुं – स्नेहाने एकमेकांना बिलगणे.
– टियुं – (१) (न.) – वस्तरा घासण्याची चामड्याची पट्टी. (२) (वि.) चलाख, चपळ.
– टियां लेवां – (१) हजामाचा धंदा करणे. (२) बेकार रखडत राहणे.
लटवुं (लटवुं) (अ. क्रि.) – वाकणे.
लटार (लटार) (स्त्री.) – फेरा, हेलपाटा.
लटियर (लटियर) (वि.) – ऐटबाज, रंगेल.
लटी (लटी) (स्त्री.) – (१) वेश्या (२) गप्प, खोटी अफवा.
लट्टू (वि.) – (१) अतिशय नेभळट. (२) परवश (३) स्तब्ध (४) (पु.) भुंगा.
– थई जवुं – (१) खूप आसक्त होणे. (२) नेभळे - नरम - होऊन जाणे.
लठ्ठ (लठ्ठ), लठ (वि.) – (१) लठ्ठ, शक्तिमान. (२) (पु.) लाठी, सोटा.
– ठिं (– ठींगुं) (वि.) – (१) लठ्ठ (२) लुच्चे.
– ठ्ठो (पु.) – (१) गाडीच्या चाकांचा आस. (२) जाड मांजरपाट. (३) लठ्ठ मनुष्य. (४) सोटा.
लडकण (लडकण), – णुं (वि.) – भांडखोर, भांडकुदळ.
लडत (लडत) (स्त्री.) – लढाई.
लडथडवुं (लडथडवुं) (अ. क्रि.) – गोते खाणे, झोक जाणे.
लडवा (– वे) ड (लडवा-वेड) (स्त्री.) – झगडा, भांडाभांडी.
– डियुं (वि.) – भांडखोर, लढाईखोर.
लडवुं (लडवुं) (स. क्रि.) – (१) रागावणे, ठपका देणे. (२) (अ. क्रि.) – झगडा - वादविवाद - बोलाचाली - युद्ध - मारामारी करणे. (३) कोर्टात जाणे. (४) (लाक्ष.) बेबनाव होणे.
लडाक (– कु) (लडाक-कु) (वि.) – (१) लाडके (२) भांडखोर, तंटेखोर.
लडायक (लडायक) (वि.) – (१) लढाऊ. (२) लढू शकण्याजोगे. (३) भांडखोर.
लडालड(-डी) (लडालड-डी) (स्त्री.) – लढाई, तंटा.
लडाववुं (लडाववुं) – (१) लाड करणे. (२) (स. क्रि.) लढविणे, लढायला लावणे.
लडी (लडी) (स्त्री.) – एकाच जातीच्या वस्तूंची ओळ किंवा मालिका. (२) लट.
लढण (लढण) (स्त्री.) – (१) व्यसन, सवय (२) पद्धती
– पडवी – सवय पडणे.
लणणी (लणणी) (स्त्री.) – कापणी किंवा तिचा हंगाम.
लणवुं (लणवुं) (स. क्रि.) – (१) कापणी करणे, पीक उतरून घेणे (२) (लाक्ष.) फळ पदरी घेणे.
लत (लत) (स्त्री.) – (१) व्यसन (२) सवय (३) छंद.
लताड (लताड) (स्त्री.) – (१) लाथ (२) एकदा बोललेले बदलणे. (३) गोता (४) (पु.) सुस्ती.
– खवरावबी, – मारवी – (१) लाथ मारणे. (२) भ्रमात ठेवून फसायला लावणे. (३) नुकसान करणे.
लताडवुं (लताडवुं) (अ. क्रि.) – (१) दुर्दशेला आणणे, नुकसान करणे.
लतीफ (लतीफ) [अ.] (वि.) – सद्‌गुणी, चांगले.
– फो (पु.) – हास्यविनोद.
लत्तां (न. ब. व.) – कपडेलत्ते.
– लेवाई जवां, – लेवावां – (१) लुटले जाणे. (२) नुकसानीत येणे (३) हिंमत गमावणे.

—लेवां—दोष किंवा दुर्बळपणा उघडा करणे.
लत्तो (લત્તો) (पु.)—मोहोल्ला, पेठ.
लथडपथड (લથડપથડ) (अ.)—पाण्याने भिजून चिंब.
लथडवुं (લથડવું) (अ. क्रि.)—(१) ठोकर लागून झोकांडी जाणे. (२) बोलताना अडणे. (३) आजाराने दुबळे होऊन जाणे.
लथडियुं (લથડિયું) (न.)—झोकांडी.
लदावुं (લદાવું) (अ. क्रि.)—लादले जाणे, लादलेले असणे. ('लादवुं'चे कर्मणी रूप).
लप (લપ) (स्त्री.)—(१) पीडा, उपाधी, लफडे (२), (अ.) झटकन, जल्दी.
—दईने—झटकन.
लपकवुं (લપકવું) (अ. क्रि.)—झणकारा मारणे.
लप(-ब)कारो (લપ-બ-કારો) (पु.)—(१) जीभ एकसारखी आत बाहेर करणे. (२) वेदनेने किंवा भयाने एखाद्या अवयवांत सणका मारणे. (३) तुसडेपणाने टाकून बोलणे.
लप(-ब)काववुं (લપ-બ-કાવવું) (स. क्रि.)—(१) भेडसावणे, भीती दाखविणे, भिवविणे. (२) झटपट खाणे, चट्ट करून टाकणे.
लप(-ब)को (લપ-બ-કો) (पु.)—(१) घाणेरड्या पदार्थाचा लोंदा (२) डाग (भाजतात तो) (३) तुसडेपणाने टाकून बोलणे.
—करवो—तुसडेपणाने टाकून बोलणे.
—का करवा—टोमणे मारणे.
—का खावा—टोमणे सहन करणे.
—का चोंटाडवा, —देवा—डाग देणे.
—का तोडवा—बोलण्या—करण्यात किंवा कामात दोष काढीत राहणे.
—का लेवा—(१) धसका बसणे. (२) अतिशय वेदना होणे.
लपछप (લપછપ) (स्त्री.)—कारस्थान, घालमेल.
लपट (લપટ) (स्त्री.)—(१) वेग, झपाटा. (२) धडकणे. (३) फंद, फसवणूक. (४) सुगंध (५) (वि.) तल्लीन, मग्न.
—मारवी—झडप घालून हिसकून घेणे.
लपटावुं (લપટાવું) (अ. क्रि.)—(१) ओशट पदार्थात लिडबिडणे (२) लालूच लागणे, फसणे.
लपटुं (લપટું) (वि.)—(१) भक्कम नसलेले, पोचट, ढिले (२) लोभग्रस्त.
लपडाक (લપડાક) (स्त्री.)—थप्पड.
—चोडवी, —ठोकवी, —देवी—थप्पड-चपराक-मारणे.
—पडवी, —मळवी—(१) थप्पड लागणे. (२) ठपका मिळणे. पुढची धाव थांबणे.
लपरडवुं (લપરડવું) (स. क्रि.)—लेप घालणे.
लपरडो (લપરડો) (पु.)—जाड लेप.
लपलप (લપલપ) (स्त्री.)—(१) बकबक, बडबड. (२) (अ.) झरझप. (३) झणझण.
—पाट (पु. स्त्री.)—बडबड. (२) गडबड, धांदल.
लपसणी (લપસણી) (स्त्री.)—घसरगुंडी.
—णुं (न.)—(१) घसरून पडण्यासारखे. (२) (न.) निसरडे,
—वुं (अ. क्रि.)—(१) निसरणे. (२) घसरून पडणे.
लपाट (લપાટ) (स्त्री.)—थापट, थप्पड.
—टियो (पु.)—थप्पड मारणारा.
लपावुं (લપાવું) (अ. क्रि.)—(१) लपणे. (२) —च्या कुशीत किंवा आश्रयाला जाणे. (३) एकमेकाला चिकटून दाबून बसविणे.
लपियुं (લપિયું) (वि.)—(१) गप्पिष्ट. (२) डोकेफोड करायला लावणारे.
लपेटवुं (લપેટવું) (स. क्रि.)—(१) गुंडाळणे. (२) (लाक्ष.) सामील करून घेणे.
लपेटो (લપેટો) (पु.)—झाकण, आवरण. (२) खूप कलाकुसर असलेले रेशीम विणीचे कापड.
लपेडो (લપેડો) (पु.)—जाड लेप.
लप्पट (લપ્પટ) (वि.)—व्यवस्थित भक्कमपणे चिकटलेले.
लप्पनछप्पन (स्त्री. न.)—(१) लप्पंछप्पं, गुप्त कारस्थान. (२) अति शहाणपण.
लप्पी (લપ્પી) (वि.)—गप्पिष्ट, थापाड्या.
लफरुं (લફરું) (न.)—(१) मेकडाचा रपटा. (२) (लाक्ष.) विघ्न, लफडे.
—लेवुं—(नाकातील मेकूड काढून) नाक साफ करणे.
—वळगवुं—लफडे मागे लागणे.
लब (લબ) [फा.] (पु.)—(१) ओठ (२) (स्त्री.) लाळ.
लबडधक्के (લબડધક્કે) (अ.)—धमकावून, जबरदस्तीने.
लबडवुं (લબડવું) (अ. क्रि.)—लोंबणे.
—तुं मूकवुं—(१) लोंबत ठेवणे, अधांतरी ठेवणे. (२) लक्ष न देणे.
लबडी जवुं—(१) आजारी—अशक्त होणे. (२) पास न होणे.
लबदावुं (લબદાવું) (अ. क्रि.)—(दूध, रस, पाणी इ.ने) थबथबणे. (२) सापडणे, फसणे.
लबाचो (લબાચો) (पु.)—(१) मळलेल्या—फाटक्या कपड्यांचा ढीग. (२) तुटक्याफुटक्या सामानाचा ढिगारा.
—चा उठाववा—मुक्काम हलविणे.
लबाड(-डी) (લબાડ-ડી) (वि.)—खोटे बोलण्याची सवय असलेले.
लबोचुं (લબોચું) (न.)—मुस्कट.

लब्बेक (लब्बेक) (अ.) – 'जी साहेब' अशा अर्थाचा उद्‌गार.
लमणुं (लमणुं) (न.), – णो (पु.) – (कानाजवळचा) अंक, कानशीळ.
– णे हाथ देवा – हताश होणे.
लंबाण (लंबाण) (न.) – (१) दूरता, लांबी. (२) विस्तार.
– वुं (अ. क्रि.) – (१) लांबणे. (२) खूप वेळ चालणे.
– ई (स्त्री.) – लांबी.
लंबूश(-स) (लंबूश-स) (वि.) – लंबाट, फाजील लांबीचे किंवा उंचीचे.
लयाकत (लयाकत) (स्त्री.) – लायकी, योग्यता.
लयानत (लयानत) (स्त्री.) – (१) शरम, नामुष्की. (२) धिक्कार.
ललचावुं (ललचावुं) (अ. क्रि.) – (१) लोभात सापडून फसणे. (२) मोहित होणे. (३) लालसा ठेवणे.
ललोपतां (ललोपतां) (न. ब. व.) – गोडगोड बोलणे, खुशामत.
लल्लोपच्चो (लल्लोपच्चो) (स्त्री.) – दादापुता, खुशामत.
लव (लव) (वि.) – (१) किंचित, थोडे. (२) (पु.) अंश.
लवथव (लवथव) (स्त्री.) – मधुर व विवेकपूर्ण वाणी.
लवरी (लवरी) (स्त्री.) – बडबड, बटबट.
– ए चडवुं – वाटेल तसे बडबडणे.
लववुं (लववुं) (अ. क्रि.) – बटबट करणे, फार बोलणे.
लवी जवुं – (१) निष्काळजीपणाने रहस्य बोलून जाणे. (२) वाटेल तसे बोलणे.
लवाजम (लवाजम) (न.) – वर्गणी.
लवारुं (लवारुं) (न.) – (१) कोकरू (२) दूधपिते मूल.
लवारो (लवारो) (पु.) – बडबड, बटबट.
लविंग (लविंग) (स.) – लवंग.
लवूरो (लवूरो) (पु.) – ओरखडा.
– भरवो – ओरखडा काढणे, ओरबाडणे.
लव्वो (लव्वो) (पु.) – जिभेचा शेंडा.
लसण (लसण) (न.) – लसूण.
– णियुं (वि.) – (लाक्ष.) सत्त्वहीन, तेजहीन.
लसरको (लसरको) (पु.) – (१) फरफट (२) ओरखडा.
लसलसवुं (लसलसवुं) (अ. क्रि.) – (१) चमकणे (२) तूप किंवा तेल यांनी थबथबणे (३) हर्षभराने खेळणे किंवा नाचणे.
लसवुं (लसवुं) (अ. क्रि.) – (१) झळकणे, शोभणे. (२) खेळणे – नाचणे. (३) निसरणे.
लसंती (लसंती) (वि. स्त्री.) – झळकणारी.
लसोटवुं (लसोटवुं) (स. क्रि.) – खरडत वाटणे, (पाट्यावर – दगडावर).
लहाण (लहाण) (न.) – लाभ, नफा.
– काढवुं – नफा काढणे.
– नीकळवुं – फायदा मिळणे.
– णी (स्त्री.) – आनंदाने पेढे वगैरे वाटणे.
लहाव (-वो) (लहाव-वो) (पु.) – आनंदाचा उपभोग.
लहावुं (लहावुं) – (१) (स. क्रि.) आनंदप्रसंगाकरिता काही वाटणे.
लहियो (लहियो) (पु.) – कारकून, लेखन-काम करणारा मनुष्य.
लहे (लहे) (स्त्री.) – (१) धुंदी, छंद (२) लज्जत, आनंद.
लहेकवुं (लहेकवुं) (अ. क्रि.) – (१) झुलणे. (२) ठुमकत-मुरडत चालणे-बोलणे. (३) स्फुरण पावणे.
लहेको (लहेको) (पु.) – (१) शरिराचा नखरेल चाळा, मुरकण. (२) हेल काढून किंवा घसा फोडून बोलणे.
लहेजत (लहेजत) (स्त्री.) – (१) मजा (२) लज्जत, स्वाद.
लहेजो (लहेजो) [अ.] (पु.) – पळ, क्षण.
लहेर (लहेर) (स्त्री.) – (१) तरंग, लहर (२) गुंगी (३) गंमत (४) मौजमजा.
– आववी – (१) मौज येणे (२) लाटेप्रमाणे येणे. (३) बाई येणे (इंद्रिय आखडणे) (४) गुंगी येणे.
– उडाववी,-करवी,-मारवी – मजा करणे, चैन करणे.
– पडवी – गंमत वाटणे, गोडी वाटणे.
– मां होवुं – आनंदात असणे.
– रे चडवुं – (१) कल्पनातरंगात उडणे. (२) गंमत करीत उत्साहाने भरून जाणे. (३) स्वच्छंदीपणे बोलणे-चालणे-विहरणे.
– वुं (अ. क्रि.) – तरंग उठणे, एकामागून एक लहरी उठणे.
लहेवुं (लहेवुं) (स. क्रि.) – (१) लक्षपूर्वक ऐकणे. (२) लक्षात घेणे, मानणे, ओळखणे. (३) अवलोकन करणे. (४) मिळविणे.
लळकवुं (लळकवुं) (अ. क्रि.) – (१) चकचक करणे. (२) उल्हासात डुलतडुलत येणे. (३) लालसा ठेवणे.
लळवुं (लळवुं) (अ. क्रि.) – (१) नमणे (२) प्रेमाच्या भरात येणे.
लळी पडवुं – नमणे, वाकणे.
– लळीने – खाली वाकवाकून.
ला (ला) (स्त्री.) – ज्वाला, जाळ.
लाइलाज (लाइलाज) [अ.] (वि.) – निरुपाय – नाइलाज – झालेला.
लाओलाद (लाओलाद) [अ.] (वि.) – वांझ, विनापत्य.
लाकड (लाकड) (न.) – लाकूड.
– डी (स्त्री.) – काठी, लाठी.

-डीए पाणी सींचवुं - स्वतः करण्याचे काम दुसऱ्यावर सोपविणे (ज्यामुळे ते बरोबर होत नाही).
-डीओ ऊडवी - काठ्यांनी मारामारी होणे.
-डी करवी - बोट दाखविणे, चिथावणे. (२) काठीने झोडपणे.
-डी झालवी - (मारण्याकरिता) काठी हातात घेणे. (२) प्रहार करण्यापूर्वीच काठी पकडून धरणे. (३) मार्गदर्शन करणे. (४) म्हातारपण येणे.
एक लाकडीए हांकवुं - सर्वांवर सारखा दबाव ठेवणे.
लाकडुं (લાકડું) (न.) - (१) झाडाचे सुकलेले खोड, फांद्या वगैरे (२) जळण (३) (लाक्ष.) विघ्न, अडथळा.
-डानी तलवारे लडवुं - (१) पुरत्या साधनाशिवाय लढणे. (२) खोटे अवडंबर करून काम धकवीत राहणे.
-डां जोवां - घर किंवा कुल पाहणे.
-डां पहोंचवां - स्मशानात जाण्याच्या-मरणाच्या-पंथात असणे.
-डां संकोरवां - उगीच चिथावणी देणे, शांत झालेली लढाई पुनः सुरू करणे.
लाख टकानुं - बहुमोल किंवा फार महत्त्वाचे.
-नो पालनहार - लाखांचा पोशिंदा.
-रुपियानुं - (१) बहुमोल. (२) अत्यंत प्रामाणिक व भला (मनुष्य).
-वातनी एक वात - थोडक्यात-सारांश-की.
-लाखणुं - (वि.) - अत्यंत प्रतिष्ठित.
-पंचोतरी (वि.) - (१) अतिरंजित सांगणारा. (२) (स्त्री.) गप्प.
लाखवुं (લાખવું) - लाख चढविणे.
लाखेणुं (લાખેણું) (वि.) - (१) प्रतिष्ठित, अब्रूदार, सुलक्षणी. (२) लाख रुपये मोलाचे.
लाग (લાગ) (पु.) - (१) संधी, मोका. (२) आधार (३) युक्ती (४) मधली मोकळी जागा.
-आववो - संधी येणे.
-खावो - (१) संधी मिळणे. (२) बरोबर ताब्यात येणे.
(अमुक) लागनुं होवुं - (अमक्या कामाला) लायक असणे.
लागट (લાગટ) [अ.] - सतत, चालू, एकसारखे.
-टुं (न.) - (१) गाढ संबंध (२) परपुरुष किंवा परस्त्री यांचा संबंध.
लागणी (લાગણી) (स्त्री.) - (१) भावना (२) दया, सहानुभूती.
-प्रधान (वि.) - भावनाप्रधान.
लागत (લાગત) (स्त्री.) - (१) मूळ किंमत (२) जकात.
लागतुं वळगतुं (લાગતું વળગતું) (वि.) - कुटुंबी किंवा नात्यागोत्याचे.
लागभाग (લાગભાગ) (पु.) - नात्यामुळे आलेला हिस्सा.
लागलागट (લાગલાગટ) (अ.) - सतत, चालू, एकसारखे.
लागलुं (લાગલું) (अ.) - लागलीच.
लागवग (લાગવગ) (स्त्री.) - वगवशिला.
लागवुं (લાગવું) (स. क्रि.) - (१) वाटणे, मनांत येणे. (२) मनावर परिणाम होणे. (३) संबंध किंवा स्पर्श होणे. (४) संबंध किंवा विवाहसंबंध होणे. (५) दिसणे, भासणे. (६) इच्छा-जरुरी वाटणे. (भूक-तहान) (७) कामामागे पडणे-लागणे, कामात राहणे. (८) लागणे (मराठीतील सर्व अर्थी) (९) स्त्रीचा किंवा पुरुषाचा वाईट संबंध बांधणे. (१०) (अ. क्रि.) पेटणे.
पूठे लागवुं - च्या मागे लागणे, (-ला हैराण करणे).
हाथ लागवुं - सापडणे.
लाग्युं फोडी लेवुं, - भोगववुं - नशिबाला आलेले भोगणे.
लाग्यो भाग्यो दिवाळी - नफा होवो की नुकसान, काम करायचे आहे.
लागु (લાગુ) (वि.) - (१) लागू, संबंधित (२) अनुकूल, बरोबर बसणारे. (३) (अ.) चालू.
लागो (લાગો) (पु.) - (१) हक्काचे मागणे. (२) कर (३) विवाहसंबंध, लागाबांधा (४) पिच्छा.
-घालवो,-नाखवो - कर लावणे, हक्काची वर्गणी वसूल करण्याचा रिवाज सुरू करणे.
लांघण (લાંઘણ), लांघो (લાંઘો) (पु.) - लंघन, उपवास.
लांघणी (લાંઘણી) (स्त्री.) - गाडीच्या जुवाखाली ठेवण्याची घोडी, शिपायी.
लांघो (લાંઘો) (पु.) - ढांग.
लाचार (લાચાર) [फा.] (वि.) - (१) नाइलाज-निरुपाय-झालेला, अगतिक (२) गरीब, दीन.
लाछाकुंवर (લાછાકુંવર) (पु.) - (१) श्रीमंताचा मुलगा (२) श्रीमंत पती.
लाज (લાજ) (स्त्री.) - (१) शरम, लज्जा. (२) मर्यादा, मुलाहिजा, आदर. (३) अब्रू, पत.
-काढवी - पदर डोक्यावरून तोंडावर ओढून घेणे.
लाजा (લાજા) [सं.] (स्त्री.) - भाताची लाही.
लाजिम (લાજિમ) [अ.] (वि.) - योग्य, साजेलसे.
लांचवुं (લાંચવું) (अ. क्रि.) - वाकणे.
लांचुं (લાંચું) (वि.) - कमी.
लांझो (લાંઝો) (पु.) - हरकत.
लाटी (લાટી) (स्त्री.) - लाकूडबाजार.
लाटो (લાટો) (पु.) - (१) लाट, तरंग. (२) साबणाचा किंवा एखाद्या धातूचा लांबडा तुकडा.

लाटा काढवा – लाट लागणे, फायदा मिळविणे.
लाड (न.) – (१) लाड लडिवाळपणा (२) लडिवाळपणाचे वर्तन.
– लडाववां – लाड करणे, लाडिकपणा करणे.
– पहोचवां – पुरे झाले आता लाड अशा अर्थी.
– कणुं (वि.) – लाडके.
– कवायुं (वि.) – लाडांत वाढलेले.
लाडघेलुं (લાડઘેલું) (वि.) – फार लाडाने वाढविलेले.
लाडवायुं (લાડવાયું) (वि.) – लाडात वाढलेले, लाडके.
लाडलुं (લાડલું) (वि.) – लाडके.
लाडवण (લાડવણ) (स्त्री.) – लाडकी स्त्री.
लाडवो (લાડવો) (पु.) – लाडू.
लाडी (લાડી) (स्त्री.) – (१) कोवळी मुलगी (२) नवविवाहित वधू.
लाडु खावानुं काम – अगदी सहज होण्याजोगे-सोपे काम.
लाडो (લાડો) (पु.) – (१) वर (२) लाडोबा
लाणी (લાણી) (स्त्री.) – कापणी.
लांठ (લાંઠ), -ठियुं (न.) – (१) शठ, लुच्चे (२) दंगेखोर.
लात (લાત) (स्त्री.) – लाथ.
लाती (લાતી) (स्त्री.) – बंदरावर असलेली वखार-दुकान.
लाद (લાદ) (स्त्री.) – लीद.
लानत (લાનત) [अ.] (स्त्री.) – शरम.
लाप (-पो)ट (લાપ-પો-ટ) (स्त्री.) – थप्पड.
लापरवा (લાપરવા) [फा.] (वि.) – बेपर्वा.
लाफो (લાફો) (पु.) – (१) थप्पड (२) उथळ्या मनुष्य (३) अडसर.
– फावेडा (पु. ब. व.) – उथळेपणाचें वर्तन.
लांब (-बी) (લાંબ-બી) (स्त्री.) – (१) स्मरणशक्ती (२) स्मरण.
– भात (पु.) – भाताचे बी पडल्याने आपोआप उगवलेले रोप.
लांबीटूंकी (લાંબીટૂંકી) (स्त्री.) – (१) असंबद्ध बडबड (२) तक्रार, तंटा, भानगड.
लांबुं (લાંબું) (वि. – लांब, लांबडे.
लांबी खेंचवी – (१) ताणून देणे. (२) मरणे.
– फाळ भरवी – (१) मोठे साहस करणे. (२) आवाक्याबाहेरचे काम करणे.
– लेखणे लखवुं – मोठा व्यापार सुरू करणे. (२) पराणी घेऊन बैल हाकणे.
– सोडे सुवुं – मरणे.
लांबु करवुं – लांबविणे, पिंजत बसणे. (लाक्ष.)
– काढवुं – पुष्कळ जगणे.
– खेंचवुं – (१) पुष्कळ जगणे (२) टंगळमंगळ करणे, उगीच वेळ काढणे.
– चालवुं (१) फार वेळ चालू राहणे. (२) पुष्कळ दिवस टिकणे.
– थवुं, थई जवुं – (१) पाय पसरून झोपणे (२) लांबडे होणे. जमीनदोस्त करणे, अतिशय नुकसान सोसणे. (३) मरणे.
– पिंगळ करवुं – फुगवून सांगणे.
लांबे पाटे सुवुं – (१) दिवाळे काढणे, अतिशय नुकसानीत येणे. (२) मरण्याच्या स्थितीला पोचणे. (३) निश्चित होऊन किंवा बेपर्वा होऊन पडून राहाणे.
– साथरे सूवुं – (१) दीर्घदृष्टी ठेवून काम करणे. (२) निश्चितपणा बाळगणे. (३) मरण पावणे.
लांबो हाथ करवो – (१) मदतीचा हात पोचविणे किंवा मदतीकरिता हात पुढे करणे, मदत देणे किंवा मागणे. (२) भीक मागणे (३) लांच घेणे (४) विघ्न आणणे.
– छट (वि.) – लांबसडक.
– लच, -लसरक (वि.) – लांबलचक.
लांभ (લાંભ) (वि.) – आपोआप उगवलेले.
लांभवुं (લાંભવું), लांभुं (લાંભું) (नं.) – भाग, हिस्सा.
लाय – ह (લાય – હ) (स्त्री.) – (१) आग (२) अंतःकरणातील जळफळाट.
– थवी, -लागवी – आग होणे, जळफळाट होणे.
पेटमां लाय लागवी – पोटात आग पडणे, अतिशय भूक लागणे.
लायकात (લાયકાત) (स्त्री.) – पात्रता, योग्यता, लायकी.
लायरी (લાયરી) (स्त्री.) – (१) वटवट, बडबड (२) शेखी, प्रौढी.
लार (લાર) (स्त्री.) – लांब रांग.
लाल – (१) (वि.) तांबडें (२) (पु.) छेलछबेला (३) मुलगा, पुत्र (४) माणीक.
– घोडीए चडवुं – नशेंत जाणे.
लालजी (લાલજી) (पु.) – बाळकृष्ण.
लालपाणी (લાલપાણી) (स्त्री.) – (लाक्ष.) दारू.
लालबाई (લાલબાઈ) (स्त्री.) – आग, लाही.
– नी चोकी करवी – सगळीकडे आग लागणे.
लालमलाल (લાલમલાલ) (वि.) – (१) लालभडक (२) (लाक्ष.) फाकडे, नटवे.
लालच (લાલચ) (स्त्री.) – (१) लालूच, लोभ. (२) लाच; लालसा उत्पन्न करणारी वस्तू.
– चु (वि.) – लोभी.
लाला (લાલા) (पु.) – (१) फकड रंगेल-मनुष्य.
लालायित (લાલાયિત) [सं.] (वि.) – (१) स्वादाने तोंडाला पाणी सुटले आहे असे (२) आतुर, उत्कट.
लालाश (લાલાશ) (स्त्री.) – लाली.

लालियो (લાલિયો) (पु.)–(१) महार-बचर्ची (२) लाल कुत्रा किंवा बैल.
–या इंग्लिश–बबर्जीचे मोडकेतोडके इंग्रजी.
लावरुं (લાવરું) (न.)–कुत्र्याचा चावा (२) कुत्र्याचे भुंकणे.
–नाखवुं,-भरवुं–(१) चावा घेणे (२) रागाने बोलणे.
लावलश्कर (લાવલશ્કર) (नं.)–साऱ्या परिवारासह असलेले मोठे लष्कर.
लाववुं (લાવવું) (स. क्रि.)–आणणे, घेऊन येणे.
लाश (-स)–(१) (वि.) बरबाद, नष्ट, (२) (स्त्री.) मुडदा, प्रेत.
–जवुं–नष्ट होऊन जाणे.
लासर (લાસર) (स्त्री.)–टंगळमंगळ.
–रियुं (वि.)–उगीच वेळ काढणारे, बोलणारे पण न करणारे.
लासु (લાસુ) (वि.)–कोरडे, तूप-तेल नसलेले.
लाळी (લાળી) (स्त्री.)–(१) कानाचा चापा (२) घंटेच्या आतील लंबक (३) (पशु-पक्ष्याचे विशेषतः कोल्ह्यांचे) केकाटणे-ओरडा.
–करवी–कोल्ह्यांनी कुई कुई असा ओरडा करणे.
लाळो (લાળો) (पु.)–विस्तव.
लाळा उठवा (अंतरमां)–(अंतःकरणात) आग होणे, अतिशय चिंता लागणे.
लिखितंग (લિખિતંગ) (वि.)–लिहिणार (पत्राच्या शेवटी लिहिणारा असे लिहून आपली सही करतो.)
लिज्जत (લિજ્જત) (स्त्री.)–लज्जत, स्वाद.
लिबास (લિબાસ) [अ.] (पु.)–पोशाख.
लिंबण (લિંબણ) (स्त्री.)–लिंबूचे झाड.
लिलवट (લિલવટ) (न.)–कपाळ.
लिलाऊं, लिलाम (લિલાઉં,-મ) (न.)–लिलाव.
लिसोटी (લિસોટી) (स्त्री.)–लहानशी रेषा किंवा ओरखडा.
–टो (पु.)–मोठी रेषा.
लिहाज (લિહાજ) [अ.] (पु.)–शिष्टाचार, आदर.
लीक (લીક) (स्त्री.) (१) रेघ (२) सीमारेषा, हद्द.
लीखियुं (લીખિયું) (न.)–डोक्यातील लिखा काढण्याची बारीक दातांची फणी.
लीटी (લીટી) (स्त्री.)–(१) बारीक रेघ (२) ओळ, रांग. (३) पद, चरण (कवितेचा) (४) हद्द.
–करवी–(१) ओळी रचणे. (२) चरण पाठ करणे.
–खेंचवी; दोरवी,-पाडवी–रेघ ओढणे.
–टो (पु.)–(१) जाड रेषा (२) काट.
–टा ताणवा–(१) रेघोट्या ओढणे (२) वाटेल तसे लिहिणे.

लीटो मारवो–काट मारणे.
लींट (લીંટ) (स्त्री.)–मेकूड.
लीधुं (લીધું) (स. क्रि.)–'लेवुं'चें भूतकाळाचे रूप, 'घेतले.'
–धेल (-लुं)–घेतलेले.
लीधे (લીધે) (अ.)–च्या मुळे,–च्या कारणास्तव.
लीपण (લીપણ) (न.)–लिंपण, सारवण.
–वुं (स. क्रि.)–जमीन शेणामातीने सारविणे.
लीमडी (લીમડી) (स्त्री.)–लिंबूचे किंवा लिंबाच्या जातीचे कोणतेही झाड.
लीमडे लटकवुं–अवनति पावणे.
लीरो (લીરો) (पु.)–कपड्याचा लांब तुकडा, लांब चिंधी.
लील (લીલ) (स्त्री.)–(१) शेवाळ (२) जिभेवरचा चिकटा. (३) खच्ची न केलेला पाडा-गोऱ्हा.
–उतारवी–जिभेचा चिकटा घासून काढणे.
–परणवी–बायको मरून वर्षसुद्धा न होण्यापूर्वीच दुसरी बायको करणे.
–परणाववी–वर्ष पुरे होण्यापूर्वी मृताचे शेवटचे मासिक-श्राद्ध करणे.
–वळवी–(१) शेवाळ साचणे. (२) बिघडणे.
–वाळवी–दुर्दशा करणे, वाटोळे करणे.
लीलवण (લીલવણ) (न.),-णी (स्त्री.)–पालाभाजी, ताजा पाला.
लीलवय (લીલવય) (न.. स्त्री.)–कोवळे वय, बाळपण.
लीलववुं (લીલવવું) (स. क्रि.)–(१) हिरवेगार करणे. (२) सारविणे.
लीला विस्तारवी–(मोठ्या माणसाचे) परलोकी जाणे.
–विग्रह (पु.)–भक्तांची इच्छा पुरी करण्याकरिता देवाने घेतलेला देह.
लीलाण (લીલાણ) (न.)–हिरवागार प्रदेश.
लीलालहेर (લીલાલહેર) (स्त्री.)–(१) आनंद, सुख (२) समृद्धी.
लीलाश (લીલાશ) (स्त्री.)–हिरवेपणा.
लीलांपाणी (લીલાંપાણી) (न.ब.व.)–घोंटलेल्या भांगेचे पाणी.
लीली घोडी (स्त्री.)–(१) भांग (२) भांगेची नशा.
लीलीपीठ (લીલીપીઠ) (स्त्री.)–भाजीमंडई.
लीलीसूकी (લીલીસૂકી) (स्त्री.)–सुख व दुःख, चढता काळ पडता काळ.
लीलुं (લીલું) (वि.)–(१) हिरवे (२) ओले (३) ताजे (४) अतिशय श्रीमंत.
लीला झाडतळे भूखे मरवुं–(१) अतिशय संकोची असणे. (२) अतिशय आळशी असणे.

–सूकानो विचार–योग्य काय, अयोग्य काय याचा विचार.
लीली लेखण–(१) ताजे लिखाण (२) ताजा कारभार.
(३) व्यवस्थित चालत असलेला व्यापारधंदा.
–वाडी–(१) बहरणारे तारुण्य (२) मुलांबाळांचा विस्तार.
लीलुं करवुं–फायदा करणे, संपत्ती मिळविणे.
–घडपण भोगववुं–म्हातारपण असून तरुणाचा आनंद भोगणे.
लीलो दुकाळ–(१) अतिवृष्टीने आलेला दुष्काळ.
(२) कसलीही कमतरता नसतानाही योग्य खर्च हातून न होणे.
लीलुं कच,-कस (वि.)–हिरवेगार आणि रसभरित.
–छम (वि.)–हिरवेगार.
–पीळुं (वि.)–अतिशय क्रोधाविष्ट.
लीलोतरी (લીલોતરી) (स्त्री.)–(१) ताजी हिरवी वनस्पती.
(२) पालाभाजी, ताजी भाजी.
लीसुं (લીસું) (वि.)–(१) गुळगुळीत (२) निसरडे.
लुगाई (લુગાઈ) (स्त्री.)–बायको, पत्नी.
लुगात (લુગાત) [अ.] (न.)–शब्दकोश.
लुछणियुं (લુછણિયું) (न.)–अंग पुसणे, पुसण्याचे फडके, (टॉवेल इ.).
लुंची (લુંચી) (स्त्री.)–पळता पळता एकदम मागे फिरणे, गिरकी.
लुटणियुं (લુટણિયું) (वि.)–लूट करणारे.
लुटाउ (લુટાઉ) (वि.)–(१) लुटीचे (२) बिनवारशी, अनाथ.
लुटावुं (લુટાવું) (अ. क्रि.)–लुटले जाणे.
लुटाववुं (લુટાવવું) (स. क्रि.)–लुटविणे.
लू (લૂ) (स्त्री.)–उन्हाळ्यातील तापलेल्या वाऱ्याचा झपाटा.
–लागवी–तशा वाऱ्यामुळे आजार येणे.
–वावी–तसा गरम वारा वाहणे.
लूई (લૂઈ) (स्त्री.)–शेवाळ.
लूओ (લૂઓ) (पु.)–लाटण्याकरता घेतलेला कणकीचा लहानसा गोळा.
लूखरी (લૂખરી) (स्त्री.)–खाज, कोरडी खरूज.
लूखस (લૂખસ) (स्त्री.)–खरूज.
लूखियुं (લૂખિયું) (न.)–मातीची चिलीम.
लूखुं (લૂખું) (वि.)–(१) कोरडे, तेलातुपाशिवायचे. (२) नीरस (३) निर्धन, रंक.
–पडवुं–कोरडे असणे किंवा वाटणे.
–हसवुं–ओढून ताणून हसणे.
लूगडुं (લૂગડું) (न.)–(१) कपडा, वस्त्र (२) साडी.
लूगडां उतारवां–(१) आप्ताचा मृत्यू होताच स्नान करण्याकरता कपडे बाजूला काढून ठेवणे. (२) संबंध टाकणे. (३) लुटले जाणे.
–उतारीने वांचजो–मरणाच्या समाचाराचे सूचन (पत्रारंभी लिहितात).
–करवां–मुलीला–बहिणीला कपडे करणे.
–लेवावां–लुटले जाणे.
–बोळ–(१) (अ.) अंगावरच्या कपड्यासकट (२) (न.) तसे स्नान.
लूगदी (લૂગદી) (स्त्री)–लगदा.
लूछणुं (લૂછણું) (न.)–अंगपुसणे.
–वुं (स. क्रि.)–(१) कपड्याने घासून साफ करणे, एखाद्याला घासणे किंवा चिकटविणे.
लूडवुं (લૂડવું) (अ. क्रि.)–लोळणे, गडगडत जाणे.
लूण (લૂણ) (न.)–लवण, मीठ.
–हराम करवुं–निमक हराम होणे.
–हलाल करवुं–इमानदार राहाणे.
–चां (न. ब. व.)–लोणची.
लूणो (લૂણો) (पु.)–भिंतीला वगैरे ओली मुळे येणारा लोणा.
–लागवो–लोणा येणे.
लूंट (લૂંટ) (स्त्री.)–लूट.
–पाडवी–धाड घालून लुटणे.
–वुं–(स. क्रि.)–लुटणे.
लूंठ (લૂંઠ) (वि.)–जबरदस्त, दांडगट.
लूंडी(લૂંડી) (स्त्री.)–लौंडी, दासी.
–डो (पु.)–दास, गुलाम.
लूम (લૂમ) (स्त्री.)–फळांचा घोस.
–खुं (न.),–खो (पु.)–मोठा घोस, झुबका.
–लेवो–मोठा फायदा मिळविणे.
–लंटावो–फायदा गमावणे, नुकसान होणे.
–वुं } (अ. क्रि.)–(१) लोंबणे (२) वाकणे (३) खूप
लूंबवुं } प्रयत्न करणे.
लूलवुं (લૂલવું) (अ. क्रि.)–उष्णता लागणे, सुकणे.
लूली, लूलीबाई (લૂલી, લૂલીબાઈ) (स्त्री.)–जीभ.
–हलाववी–(१) जीभ टाळ्याला लावणे (२) 'हो हो' म्हणत राहणे.
लूलुं (લૂલું) (वि.)–(१) लंगडे (२) अपंग, अशक्त (३) पाया किंवा आधार नसलेले.
लेउवो (લેઉવો) (पु.)–लेवा पाटीदार.
लेखण (णी, -नी,) (લેખણ-ણી-ની) (स्त्री.)–कलम, लेखणी.
लेखववुं (લેખવવું), लेखवुं (स. क्रि.)–हिशेबात घेणे, मानणे, लेखी असणे.
लेखावटियो (લેખાવટિયો) (पु.)–(१) ज्योतिषी (२) हिशेब लिहिणारा कारकून.

लेखितवार (લેખિતવાર), लेखी – (१) (वि.) लिखित, (२) (अ.) लिहून.
लेखुं (લેખું) (न.) – (१) तोंडचा हिशेब. (२) हिशेब (३) (लाक्ष.) ऐपत, शक्ती.
लेखे (લેખે) (अ.) – (१) (अमुक) हिशेबाने, प्रमाणे (२) प्रीत्यर्थ, करिता.
– लागवुं – उपयोगाला येणे.
लेंघावुं (લેંઘાવું) (स. क्रि.) – थोडेसे लंगडत चालणे.
लेंघुं (લેંધું) (वि.) – बावळट, वेडसर
लेण (લેણુ) (न.) – घेणे, येणे.
– दार (पु.) – पैसे कर्जाऊ देणारा.
– देण (स्त्री.) – (१) देण्याघेण्याचा संबंध (२) देणेघेणे.
– णादेणी (स्त्री.) – (१) पूर्वजन्मीचे देणे किंवा घेणे असल्यासारखा संबंध, ऋणानुबंध (२) देण्याघेण्याचा संबंध.
– णुं (न.) – (१) दिलेले कर्ज परत घेणे. (२) ऋणानुबंध असल्यासारखा चांगला संबंध.
लेताण (લેતાણુ) (स्त्री.) – घाबरगुंडी.
लेपडुं (લેપડું) (वि.) – गळेपडू.
लेपडो (લેપડો) (पु.) – पोपडा.
लेफो (લેફો) (पु.) – चिकटलेला चिखलाचा रेंदा.
लेबास (લેબાસ) (पु.) – पोषाख.
लेभागु (લેભાગુ) (वि.) – (१) घेऊन पळून जाणारे (२) इकडून तिकडून दुसऱ्याची वस्तू घेऊन आपली म्हणून दाखविणारे.
लेमेल (લેમેલ) (स्त्री.) – (१) (धांदलीधांदलीत) वरचेवर घेणे आणि ठेवणे. (२) मरण्यापूर्वी खाली घोंगड्यावर घेण्याची तयारी (३) मनाची बावरलेली अवस्था.
लेलूंट (લેલૂંટ) (वि.) – (१) बेसुमार (२) बिनमालकीचे.
लेलूर (લેલૂર) (वि.) – झोपेने घेरलेले.
लेवड (લેવડ) (स्त्री.) – उधार घेण्याचा व्यवहार.
– देवड (स्त्री.) – उसने देण्या-घेण्याचा संबंध.
– डाववुं (स. क्रि.) – (१) उसने घ्यायला लावणे. (२) धमकावणे, निर्भर्त्सना करणे
लेवा देवा (લેવાદેવા) (पु., स्त्री.) – घेण्या-देण्याचा किंवा दुसऱ्या कसल्याही प्रकारचा संबंध.
लेवाल (લેવાલ) (न.) – खरीदणारा (शेअरबाजारात).
लेवावुं (अ. क्रि.) – (१) घेतले जाणे ('लेवुं'चे कर्मणि रूप) (२) (शरीरनुं) सुकणे, फिके पडणे (३) शरमणे, हिरमुसणे.
– ई जवुं – (१) खजील होणे, (२) वाळणे, सुकणे (शरीर).
लेवुं (લેવું) (स. क्रि.) – घेणे. (२) हाती घेणे. (३) धमकावणे.
खबर लेवी – (१) संभाळ ठेवणे. (२) समाचार घेणे (सूड घेणे)
खोळे लेवुं – दत्तक घेणे.
नाम लेवुं – चिडविणे, त्रास देणे.
मनमा लेवुं – (१) मनावर परिणाम करून घेणे, वाईट वाटून घेणे, (२) लक्षात घेणे.
माथे लेवुं – जबाबदारी किंवा जोखीम पत्करणे.
हाथमां लेवुं – (१) पकडणे (२) मारणे (३) ताब्यात घेणे (४) नियंत्रणाखाली घेणे.
लई लेवुं – (१) हाती घेणे, पकडणे (२) हिसकून घेणे. (३) संग्रह करणे, ठेवून घेणे. (४) परत घेणे. (५) उचलून घेणे. (६) पचनी पाडणे.
– आववुं – आणणे, घेऊन येणे
– जवुं – (१) नेणे (२) घेऊन जाणे. (३) चोरणे.
– नाखवुं – (१) धमकी देऊन काढणे. (२) ठपका देणे (३) नावडीने किंवा जबरदस्तीने ग्रहण करणे.
– पडवुं – (१) अंगावर ओढून घेणे (२) गळ्यात पडणे, अडकले जाणे.
– बेसवुं – (१) आरंभ करणे. (२) गृहीत धरणे. (३) पचनी पाडणे.
– मूकवुं – अगोदरच घेऊन ठेवणे.
– राखवुं – अगोदरच आणून ठेवणे.
लोक लागणी (લોકલાગણી) (स्त्री.) – लोकभावना.
– वायका (स्त्री.) – अफवा, लोकात बोलली जाणारी गोष्ट.
– वार्ता (स्त्री.) – लोककथा.
– वृत्त (न.) – समाजजीवन.
लोकाई (લોકાઈ) (स्त्री.) – परकेपणा.
लोकालोक (લોકાલોક) (वि.) – सामान्य लोकाप्रमाणे, विशेष संबंध नसलेले, जेवढ्यास तेवढे असे.
लोकि (-की)क (લોકિ-કી-ક) (पु. न.) – दुखवटा.
लोकियुं (લોકિયું) (वि.) – सामान्य, प्राकृत.
लोच (લોચ) (पु.) – (१) (जैनांत) डोक्याचे केस उपटून काढण्याची क्रिया (२) (न.) अश्रू.
लोचक (લોચક) [सं.] (न.) – (१) गोळा, पिंड (२) काजळ (३) सुताराचे एक अवजार (४) सापाची कात.
लोचना (લોચના) (स्त्री.) – तडफड.
– वुं (अ. क्रि.) – (१) तडफडणे (२) बेचैन होऊन गडबडा लोळणे.
लोचवावुं (લોચવાવું) (अ. क्रि.) – (१) घोटाळ्यात पडणे, अडकणे.
– ई पडवुं – जवुं – (१) गुंतून-अडकून-पडणे, (२) नुकसानीत सापडणे.
लोचावुं (લોચાવું) (अ. क्रि.) – (१) समान पातळीत न राहता

एका बाजूला गोळा होणे. (२) अडकणे. (३) घाबरून जाणे. (४) (डोळे) जड होणे.

**लोचो** (લોચો) (पु.)–(१) लचका (२) दट्ट्या, बूच. (३) (लाक्ष.) घोटाळा (४) तक्रार, हरकत.

–**करवो**–कागदाचा किंवा कपड्याचा गोल गुंडा(बुचासारखा) करणे. (२) बिघडविणे.

–**काढवो**–(१) गडबड घोटाळा दूर करणे. (२) देणे भागवून टाकणे.

–**पडवो**–बांधा येणे, तक्रार उत्पन्न होणे.

–**पाडवो**–हरकत उत्पन्न करणे.

–**देवो,-मारवो**–दट्ट्या किंवा बूच मारणे.

–**वाळवो**–कागदाचा किंवा चिंधीचा गोल घट्ट गुंडा करणे.

–**पोचो**–(१) लचका (२) दट्ट्या, बूच.

–**लापशी**–(१) गडबड घोटाळा. (२) थोडेबहुत.

**लोट** (લોટ) (पु.)–पीठ.

–**ऊडवो**–(१) बिघडून जाणे. (२) भिकारी होणे.

–**फाकवो**–(१) वेड्यासारखे भकणे. (२) भयभीतपणा दाखविणे. (३) कंगाली –साधनहीनता दाखविणे.

–**फाके छे**–(१) झक मारतो. (२) जवळ खायला काही नाही.

–**मागवो**–भीक मागणे.

**लोटण** (લોટણ) (वि.)–गोते खाणारा (पतंग).

**लोटपट** (લોટપોટ)–(१) (वि.) पार थकलेले (२) (अ.) मुस्कट मारून.

**लोटवुं** (લોટવું) (अ. क्रि.)–(१) बिछान्यावर पडणे, लोळणे. (२) निजणे (३) कोलांटी खाणे.

**लोटियुं** (લોટિયું) (क्रि.)–(१) साफ केस काढलेले, मुंडन केलेले, लोट्याच्या बुडासारखे तुळतुळीत. (२) (न.) जात्यातून पीठ पुसून काढण्याचे फडके.

–**करावबुं**–डोके तुळतुळीत करायला लावणे.

**लोटुं** (લોટું) (न.)–मातीची लहान कळशी, मडके (२) (लाक्ष.) डोके.

**लोटा लई लेवा**–(१) हिसकून घेणे. (२) फसवून घेणे.

**लोटे जबुं**–शौचास जाणे.

**लोडाववुं** (લોડાવવું)–(१) गरगर फिरविणे. (२) डोलविणे.

**लोढ** (લોઢ) (पु.)–पाण्याची मोठी लाट (२) झोपाळा (३) गरमीने वितळून घट्ट झालेला मातीचा रस–लोखंडाचा गोळा (४) हरकत, तक्रार.

–**नाखवो,-पडवो**–तक्रार किंवा हरकत उत्पन्न करणे किंवा होणे.

**लोढवुं** (લોઢવું) (स. क्रि.)–कापूस वठणे.

**लोढां** (न. ब. व.)–लोखंडाची अवजारे.

–**ढी** (स्त्री.)–(१) लोखंडाचा लहान तवा (२) (वि.) लोखंडी.

**लोढुं** (લોઢું) (न.)–लोखंड.

**लोथ** (લોથ) (स्त्री)–(१) प्रेत, मुडदा. (२) पीडा, उपाधी. (३) (वि.) अतिशय थकून गेलेले. (४) मूर्ख, ढ (५) निरुपयोगी.

–**थवुं**–अतिशय थकून जाणे.

–**पडवी**–मुडदा पडणे.

–**वहोरवी**–पीडा ओढून घेणे.

–**वळवी**–दुर्दशा होणे.

–**वाळवी**–(१) वाटोळे करणे (२) दुर्दशा करणे (२) भानगड मिटविणे. (३) मुडदा पाडणे.

–**पोथ** (वि.)–थकून लोळागोळा होऊन जाणे.

**लोथवुं** (લોથવું) (अ. क्रि.)–बेचैन होऊन गडबडा लोळणे.

**लोधो** (લોધો) (पु.)–धिप्पाड मनुष्य.

**लोंदो** (લોંદો) (पु.)–चिकट मऊ पदार्थाचा गोळा.

**लोपडचोपड** (લોપડચોપડ) (वि.)–(१) खूप तेल किंवा तूप घातलेले (२) (लाक्ष.) अतिशयोक्तिपूर्ण (३) (न.) तेलकट पदार्थ; तूप, तेल इ. (४) (लाक्ष.) अतिशयोक्ती (५) खुशामत.

**लोपवुं** (લોપવું) (स. क्रि.)–उल्लंघन करणे, न मानणे.

**लोब** (લોબ) (स्त्री.)–(१) स्मरणशक्ती (२) सवय.

**लोबडी(-री)** (લોબડી-રી) (स्त्री.)–बारीक लोकरीचे कांबळे.

**लोभामणुं** (લોભામણું) (वि.)–लोभस, लोभावणारे.

**लोभावुं** (લોભાવું) (अ. क्रि.)–लोभात सापडणे.

**लोमविलोम** (લોમવિલોમ) [सं.] (वि.)–(१) उलटेसुलटे (२) अनिश्चित.

**लोरवुं** (લોરવું) (स. क्रि.)–नख मारून जखमी करणे.

**लोला** (લોલા) [सं.] (स्त्री.)–(१) जीभ (२) वीज.

**लोवडा (-रा) बवुं** (લોવડા-રા-વવું) (स. क्रि.)–'लोहवुं'चे प्रयोजक, स्वच्छ पुसायला लावणे.

**लोवणियुं** (લોવણિયું) (न.)–स्वच्छ पुसण्याचे साधन (फडके इ.)

**लोवावुं** (લોવાવું) (अ. क्रि.)–पुसले जाणे.

**लोहर** (લોહર) (पु.)–(१) ढ, मूर्ख मनुष्य (२) फुकट वेळ काढणारा-भटक्या-तरुण.

**लोहवुं** (લોહવું) (स. क्रि.)–स्वच्छ पुसणे.

**लोहियाळ (-ळु)** (લોહિયાળ-ળું) (वि.)–रक्ताळलेले.

**लोहियुं** (લોહિયું) (न.)–कढई.

**लोही** (લોહી) (न.)–(१) रक्त (२) (लाक्ष.) कुळ.

